






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






# अनुक्रम

हम आह भी भरते हैं तो हो जाते हैं बदनाम
वो कत्ल भी करते हैं तो चर्चा नही होता !

मायबोली मराठीच्या सेवत एक सरदारजी
प्रीतमसिंग जुनेजा लिखित.

# महाबँकेत एक भिकारी

एक प्रांजळ आत्मनिवेदन

वाचक मित्रा,

हे आत्मनिवेदन जरी माझे असले
तरी व्यथा तुझीच आहे !

**– प्रीतमसिंग जुनेजा**

जनवाणी प्रिंटिंग प्रेस, ४५, बुधवार पेठ,पुणे ४११ ००२.

प्रकाशन दिनांक २ ऑक्टोबर १९८९

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २५०– जुलै–सप्टेंबर १९८९

(म. रा. साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत)

संपादक : **शंकर सारडा**

संपादक मंडळ : डॉ. गं. ना. जोगळेकर,
डॉ. वीणा देव, डॉ. वसंत सावंत,
प्रा. चंद्रकुमार नलगे

**या अंकाची किंमत १० रुपये**
वार्षिक वर्गणी (संस्थांसाठी : ४० रुपये)

मुखपृष्ठ : लक्ष्मीकांत तोष्णीवाल, पुणे

मुद्रक–प्रकाशक : श्री. राजा फडणीस कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०
मुद्रणस्थळ : संजीव मुद्रणालय, ४६९ सदाशिव, पुणे ४११ ०३०

अनुक्रमणिका

# संपादकीय

मुंबई येथे दिनांक १२–१३ ऑगस्ट रोजी भरणाऱ्या जागतिक मराठी परिषदेचा मुहूर्त साधून म. सा. पत्रिकेचा हा अंक प्रसिद्ध होत आहे. ही परिषद म्हणजे साहित्य संमेलनाचा जागतिक अवतार नव्हे; देशापरदेशातील मराठी भाषिकांना एकत्र आणणे, विविध क्षेत्रांतील मराठी माणसाच्या कर्तृत्वाचा गौरव करणे, महाराष्ट्राच्या भावी प्रगतीच्या दृष्टीने आपल्या ज्ञानाचा व कौशल्याचा उपयोग व्हावा या दिशेने सहकार्याचे नवे पर्व सुरू करणे, मराठी भाषेचा देशापरदेशात प्रसार करणे, मराठी माणसाला अस्मितापूर्ण आत्मभान देणे अशा महत्त्वाकांक्षी संकल्पनेतून या परिषदेचा घाट घालण्यात आला आहे. मुख्यमंत्री ना. शरद पवार यांच्या नेतृत्वाखाली, कार्याध्यक्ष माधव गडकरी, कार्यवाह डॉ. रवी बापट व भा. कृ. देसाई तसेच त्यांचे सहकारी यांनी चारपाच महिने या परिषदेची जोरदार तयारी चालवली आहे, परदेशातून दोनशे व परप्रांतातून सातआठशे मराठी भाषिक प्रतिनिधी या परिषदेला येणार आहेत; महाराष्ट्रातील प्रतिनिधींची संख्याही अमाप होणे शक्य होते; परंतु ज्या सभागृहात ही परिषद भरणार आहे त्याची क्षमता फक्त तीन हजार आसनांची असल्याने प्रतिनिधी संख्येवर आपोआपच बंधन पडले आहे. जुलैच्या शेवटच्या आठवड्यात तुफान पाऊस आणि वादळी वारे यांमुळे हजारावर माणसे मृत्युमुखी पडली आणि शेकडो घरे जमीनदोस्त झाली हे लक्षात घेऊन या परिषदेतला उत्सवी भाग कमी करण्याचे जाहीर करण्यात आले आहे. काही वृत्तपत्रांनी या परिषदेचे आयोजन कशासाठी असा प्रश्न उपस्थित करून ती भरवूच नये असा सूर काढला आहे. मराठी भाषेचा व्यापक संदर्भात विचार करणे, मराठी माणसामध्ये अस्मिता निर्माण करणे, या दृष्टीने अशा परिषदेची उपयुक्तता वादातीत ठरते. इंग्रजीचे व हिंदीचे जे आक्रमण आपल्यावर होत आहे, त्यामुळे मराठी भाषेच्या भवितव्याविषयी चिंता वाटावी अशी आजची अवस्था आहे. मातृभाषेचा रास्त अभिमान आणि भाषेविषयीची अस्मिता हीच हे आक्रमण थोपवू शकेल.

या परिषदेच्या निमित्ताने ग्रंथप्रदर्शन, चित्रपट व नाट्य उत्सव, तंत्रज्ञानविषयक परिसंवाद, परदेशातील मराठीच्या अभ्यासकांचे मनोगत, परप्रांतातील मराठी भाषिकांचे प्रश्न, विविध सामाजिक स्तरांच्या अपेक्षा – अशा अनेक उपक्रमांची आखणी करण्यात आली आहे. आम्ही या परिषदेला शुभेच्छा देतो.

### नवे विश्वस्त

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे एक विश्वस्त श्री. वि. ग. तथा राजाभाऊ माटे यांनी आपल्या विश्वस्तपदाचा राजीनामा दिल्यामुळे परिषदेच्या कार्यकारिणीने श्री. म. श्री. दीक्षित यांची त्यांच्या जागी नियुक्ती केली आहे. राजाभाऊंचा मुद्रण-प्रकाशनक्षेत्रातील प्रदीर्घ अनुभव, 'निवारा'सारख्या वृद्धाश्रमाच्या नीटनेटक्या विकासप्रकल्पाला त्यांनी दिलेली कल्पक चालना, कुठलेही काम हाती घेतले की त्यात सर्वस्व ओतण्याची त्यांची आंतरिक निष्ठा—यांचा परिषदेला खूपच फायदा झाला. त्यामुळे राजीनाम्याचा विचार त्यांनी मागे घ्यावा अशी अनेकांची इच्छा होती. परंतु राजीनाम्याचा आग्रह त्यांनी धरल्यामुळे, नाइलाजाने त्याचा स्वीकार करणे भाग पडले.

श्री. म. श्री. दीक्षित हे म. सा. परिषदेशी वेगवेगळ्या नात्यांनी गेली ४०।४५ वर्षे संबंधित आहेत. परिषदेचे कामकाज सुरळीत चालण्यात त्यांचा मोठाच सहभाग आहे. परिषदेच्या सर्व उपक्रमांची त्यांना सर्वांगीण कल्पना आहे. त्यामुळे विश्वस्त म्हणून त्यांचे नाव सहजपणे समोर आले. त्यांनीही जबाबदारी स्वीकारण्यास संमती दिली याचा आनंद वाटतो.

नेपोलियन, जिजामाता, तात्या टोपे वगैरे १७ पुस्तके त्यांच्या लेखणीतून उतरलेली असून, वसंत व्याख्यानमाला, पुणे नगर वाचन मंदिर, इत्यादी अनेक संस्थांशी ते संबंधित असून, साहित्यविषयक विविध उपक्रमांबद्दल त्यांना आस्था आहे. वय वर्षे पासष्ट असूनही उत्साह दांडगा आहे. म. सा. परिषदेत सेवक म्हणून लागलेले दीक्षित तिच्या विश्वस्तपदी आरूढ होतात ही एक वेगळीच यशोगाथा आहे. त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन.

### जन्मशताब्दीच्या निमित्ताने

महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार यांच्या जन्माला यंदा १०० वर्षे होतात. त्यांच्या ग्रंथसंग्रहाचे आणि त्यांच्या कागदपत्रांचे व्यवस्थित वर्गीकरण करून, त्यातील निवडक मजकूर प्रसिद्ध करण्याच्या दिशेने काही अभ्यासकांची योजना करता आली तर त्यायोगे दत्तो वामनांचे अपुरे राहिलेले कार्य मार्गी लावल्याचे समाधान मिळू शकेल. पुणे विद्यापीठाचे ते माजी कुलगुरु, त्यांच्या कागदपत्रांचा अभ्यास करण्यासाठी तीनचार संशोधकांना दोनतीन वर्षांच्या मुदतीची पाठ्यवेतने देऊन ती कागदपत्रे संपादित केली जावीत असा प्रयत्न का होऊ नये ?

कादंबरीकार ना. ह. आपटे यांची जन्मशताब्दी यंदा संपन्न होत आहे. कोरेगाव-सारख्या छोट्या गावी राहून त्यांनी दीर्घकाळ वाङ्मयसेवा केली. प्रकाशन व्यवसाय केला पण त्यातही त्यांना प्रतिकूल दैवाने हात दाखवला. सातारा साहित्य

संमेलनाचे ते स्वागताध्यक्ष होते.

बालकवी त्र्यंबक बापूजी ठोमरे यांच्या जन्मशताब्दीला दि. १३ ऑगस्ट १९८९ रोजी प्रारंभ झाला.

विदर्भातील कवी नारायण केशव वेहेरे यांच्याही जन्मशताब्दीचे हे वर्ष आहे (४ जुलै हा त्यांचा जन्मदिवस).

कोल्हापूरचे नट केशवराव भोसले यांचीही शताब्दी याच वर्षी आहे. या शताब्दी सोहळ्याचे उद्घाटन कोल्हापूर येथे शाही इतमामाने झाले. उणेपुरे ३१ वर्षाचे आयुष्य पण केशवराव भोसले यांनी मराठी रंगभूमीच्या दृष्टीने उदंड कामगिरी बजावली. अठराव्या वर्षी नाट्यसंस्थेची स्थापना करून राक्षसी महत्त्वाकांक्षा, शारदा, शहा शिवाजी, मानापमान यांसारखी नाटके त्यांनी सादर केली. त्यांच्या कार्याची धावती रूपरेखा दाखवणारा विद्याधर गोखले–लिखित 'केशववंदना' हा कार्यक्रमही या निमित्ताने सादर केला गेला.

**द. ग. गोडसे – नाबाद ७५**

मराठीत सौंदर्यशास्त्रविषयक मूलभूत विचार व संकल्पना मांडून, विचारवंतांचे लक्ष वेधून घेणारे हरहुन्नरी कलावंत–लेखक दत्तात्रय गणेश गोडसे यांनी ३ जुलै ८९ रोजी ७६ व्या वर्षात पदार्पण केलें, पोत, शक्तिसौष्ठव, गतिमानी, लोकधाटी या ग्रंथातून गोडसे यांच्या मौलिक चिंतनाचे सार प्रकट होते. मस्तानी आणि नांगी असलेले फुलपाखरू ही त्यांची दोन नवी पुस्तके त्यांच्या पंचाहत्तरीच्या निमित्ताने पॉप्युलरने प्रसिद्ध केली आहेत. गोडसे यांनी टाइम्स ऑफ इंडियाचा कलाविभाग, (१९३९–४४), दिल्ली येथे शासकीय सेवेत राजपत्रित अधिकारी (४५–४७), मुंबईतील वॉल्टर थॉमसन, एव्हरेस्ट, टाटा सर्व्हिसेस इ. जाहिरात कंपन्या, बडोदा सयाजी विद्यापीठ कला विभाग (१९६६–७४) यांत कामे केली. केशव भिकाजी ढवळे या प्रकाशनाच्या शेकडो पुस्तकांची सजावट केली. शंभराहून अधिक मराठी नाटकांचे नेपथ्य व सजावट केली; जरा जपून, गुमास्ता, कुंकवाचा धनी, इ. चित्रपटांचे कलादिग्दर्शन केले. विविध कलाक्षेत्रात सतत संचार करून, आपल्या स्वतःच्या चिंतनाची धार टिकवून ठेवणारे गोडसे अजूनही तारुण्यसुलभ उत्साहाने नवनव्या कागदपत्रांच्या व ऐतिहासिक वास्तूंच्या शोधात हिंडत असतात. त्यांच्या कलाविचाराचा अभ्यास मराठी समीक्षेने करून या देशीकार लेण्याची महत्ता जाणायला हवी. गोडसे यांना पत्रिकेतर्फे शुभेच्छा.

**डॉ. रा. चिं. ढेरे**

साहित्य अकादमी पुरस्कार विजेते डॉ. रा. चिं. ढेरे यांनी दिनांक २१ जुलै रोजी साठाव्या वर्षात पदार्पण केले. गेल्या तीन तपांत त्यांनी विविध क्षेत्रांत

संशोधन करून अनेक नवनवी प्रमेये मांडली. श्रीविठ्ठल संप्रदाय, दत्त संप्रदाय, लज्जागौरीतून प्रकटणारी स्त्रीप्रतिमा यांजबरोबर संतसाहित्याची आणि भक्ति-संकल्पनेची काही अलक्षित अंगोपांगे आपल्या आगामी ग्रंथांत प्रकट करण्याचा त्यांचा मनोदय आहे. मराठीचा विद्यापीठ पातळीवरचा अभ्यासक्रम हा कर्मठ सांप्रदायिकतेच्या घट्ट पकडीत अडकून तरुणांच्या निर्मळ ज्ञानदृष्टीला अडसर बनत आहे अशी त्यांची भावना असून, मराठी प्रज्ञा संप्रदायमुक्त अध्यनशीलतेला पारखी झाली तर तिला पुन्हा स्वतंत्र करण्यासाठी अनेक सच्च्या ज्ञानसाधकांना बळी जावे लागेल, असा समयोचित इशाराही ते देतात, त्याचे गांभीर्य ध्यानात घ्यायला हवे. डॉ. ढेरे यांच्या तरल, कल्पक संशोधनबुद्धीचे नवनवे उन्मेष प्रकट होत राहोत हीच अपेक्षा.

ग्रामीण कथाकादंबरीकार म. भा भोसले यांचीही षष्ठ्यब्दी नुकतीच साजरी झाली. त्यांनाही शुभेच्छा.

## सारस्वतांची पत्रसंपदा

पत्रिकेच्या मे १९८९ अंकात वाङ्मयीन पत्रव्यवहार प्रसिद्ध करण्याच्या दृष्टीने जागरुकता निर्माण व्हावी म्हणून काही पत्रे प्रसिद्ध केली होती. खूप वाचकांनी ही कल्पना आवडल्याचे कळवले आणि आपल्याकडील पत्रांच्या प्रतीही पाठवल्या. हा पत्रव्यवहार वाङ्मयीन महत्त्वाचा असतो, तसाच त्या त्या लेखककवीच्या स्वभाव-प्रकृतीचा आणि त्याच्या जीवनातील घटनांचा व विचारकल्लोळांचा निदर्शक असाही असतो. त्यामुळे त्याच्या व्यक्तित्वावरही प्रकाश पडतो. पत्रिकेकडे वाचक प्रसिद्धीसाठी जी पत्रे पाठवतील त्यांपैकी निवडक, जागेच्या सोयीनुसार प्रसिद्ध केली जातील. एखादा खास अंकही त्यासाठी काढता येईल.

या अंकात जी दोन पत्रे दिली आहेत; त्याबद्दल काही खुलासा करणे आवश्यक आहे. कलासाधना, कलातरंग वगैरे पुस्तकांचे लेखक श्री. बाळकृष्ण दाभाडे यांची शंकर सारडा यांनी घेतलली मुलाखत १ ऑगस्ट १९७६ च्या महाराष्ट्र टाइम्स-मध्ये प्रसिद्ध झाली होती. त्या मुलाखतीला जो प्रतिसाद मिळाला त्या संदर्भात श्री. दाभाडे यांनी लिहिलेले पत्र या अंकात दिले आहे.

दुसरे पत्र डॉ. द. भि. कुळकर्णी यांनी प्रा. प्रभाकर ऊर्ध्वरेषे यांना त्यांच्या 'हरवलेले दिवस' या आत्मचरित्राच्या संदर्भात लिहिलेले आहे. त्याची प्रत प्रा. ऊर्ध्वरेषे यांनीच पत्रिकेसाठी दिली होती. २७ जून रोजी पाठवलेल्या त्यावरो-वरच्या पत्रात प्रभाकर ऊर्ध्वरेषे यांनी लिहिले होते : 'म. सा. पत्रिकेच्या मे १९८९ अंकात सारस्वतांची पत्रसंपदा हे नवे सदर तुम्ही सुरू केले आहे. मला ते सदर आवडले. योगायोगाने ४।५ दिवसांपूर्वी नागपूरहून डॉ. द. भि. कुळकर्णी यांचे

...पत्र आलें. ते माझे स्नेही आहेत, पण नागपूर सुटल्यापासून गेल्या ११ वर्षांत फारसा संपर्क नाही. तरी त्यांनी स्वतःहून हे पत्र लिहिले असून रुचीकडे परीक्षणलेख पाठवल्याचेही लिहिले आहे. त्या पत्रातील आत्मचरित्र या वाङ्मयप्रकाराविषयी त्यांचे विचार विवाद्य वाटले तरी महत्त्वाचे आहेत. म्हणून संपूर्ण पत्राची झेरॉक्स प्रत पाठवत आहे... इष्ट वाटल्यास त्यांना पत्र लिहून... त्यांच्या परवानगीने प्रसिद्ध करावे. '

त्यांनीच डॉ. द. भि. कुळकर्णी यांनाही त्याबद्दल लिहिले. डॉ. कुळकर्णी यांनीही कल्पना उचलून धरली. शिवाय ऊर्ध्वरेषे यांनी पाठवलेल्या पत्राची प्रतही पत्रिकेसाठी धाडली. जागेअभावी हे पत्र या अंकात टाकता आले नाही. तेही २७ जूनचेच असून, त्यात आपल्या नागपूरच्या जुन्या वास्तव्याबद्दल ऊर्ध्वरेषे लिहितात : ' पण नागपूरला भेटीगाठी, गप्पा, चर्चा, कार्यक्रम अशी मैफल जमत असे, ती आता राहिली नाही. तुम्ही, डॉ. प्रभुदेसाई, डॉ. भोळे, डॉ. कानडे, रानडे, द. म. देशमुख अशा सहकाऱ्यांबरोबर गप्पा, चर्चा, वाद रंगत असे. ती रंगत आता राहिली नाही. पण आयुष्यात अशी अवस्था येणे अटळ असते. त्यासाठी मनाची तयारी करून ठेवल्यामुळे या अवस्थेला सामोरे जाणे फारसे जड गेले नाही. ' प्रा. ऊर्ध्वरेषे यांचे दिनांक १० जुलै रोजी निधन झाले. त्यामुळे या पत्रांना एक वेगळे महत्त्व आहे.

जी. ए. कुलकर्णी यांच्या पत्रांच्या संकलनाच्या कल्पनेलाही उत्तम प्रतिसाद मिळाला. पु. ल. देशपांडे यांच्याकडे जमा झालेल्या पत्रांचा संग्रह काढायचा झाला तर तो अडीच हजार पृष्ठांचा होईल. या संग्रहाच्या प्रकाशनाची योजना शक्य तेवढ्या लौकर कार्यान्वित व्हावी असे वाटते.

**दिवाळी अंक**

पत्रिकेच्या दिवाळी अंकात अनेक नवेजुने लेखक आपल्या उमेदवारीच्या आणि आत्मभानाच्या कालखंडाबद्दल मोकळेपणाने लिहिणार आहेत. लेखक–कवी–कथाकार होण्याची इच्छा कधीतरी मनात जागी झाल्यावर, तिच्या पूर्ततेचा ध्यास लागल्यावर कोणाला सहजपणे तर कोणाला प्रदीर्घ परिश्रमाने लेखनकर्तृत्व साधलेले असते. या परिश्रमांच्या कालखंडातच कधीतरी आपण लेखक आहोत; शब्द आपल्याला वश आहेत असा शोध लागतो; तो आत्मसाक्षात्कारासारखा असतो. तो नवे आत्मभान देणारा ठरतो. एखादी कविता, एखादी कथा, अशी जमून जाते की आपल्या मनातील स्वतःच्या लेखन सामर्थ्याबद्दलची साशंकता आणि अनिश्चितता संपून, सृजनशील धुंदीचा प्रत्यय येतो. अशा कालखंडाबद्दल लिहिण्याचे आवाहन आम्ही अनेक मित्रांना केले आहे. उत्स्फूर्तपणे, अनाहूतपणे या विषयाच्या अनुरोधाने कोणी लेख पाठवले तर त्यांचाही विचार केला जाईल. मात्र २०

सप्टेंबरच्या आत हे लेख हाती यावेत.

**फेब्रुवारी १९९० चा अंक**

१९८९ मध्ये प्रसिद्ध झालेल्या मराठी पुस्तकांवर लक्ष केंद्रित करणारा हा विशेषांक असेल. ८९ मधील आपल्याला आवडलेल्या कोणत्याही एका पुस्तकाबद्दल अभिप्रायात्मक मजकूर वाचकांनी पाठवावा. वहीची ४–५ पृष्ठे एवढ्या मर्यादेत तो असावा. निवडक अभिप्राय या अंकात देण्यात येतील. फेब्रुवारी १९८९ च्या अंकात १९८८ मधील तीस पुस्तकांवरील समीक्षणात्मक लेख दिलेले होते. त्या उपक्रमाचे चांगले स्वागत झाले. आमच्या चोखंदळ वाचकांनी या वर्षीही आपल्या आवडीच्या पुस्तकांवर आवर्जून लिहावे आणि चांगल्या नव्या पुस्तकांकडे इतर वाचकांचे लक्ष वेधावे. पत्रिकेच्या दिवाळी अंकात सप्टेंबरअखेर प्रसिद्ध झालेल्या निवडक मराठी पुस्तकांची यादी देण्यात येईल. प्रसिद्ध होणाऱ्या निवडक समीक्षणांना पारितोषिकेही देण्यात येतील.

---

# श्रद्धांजली

---

**ग. ह. पाटील**

१ जुलै रोजी कवि ग. ह. पाटील यांचे पुणे येथे निधन झाले. ते ८४ वर्षांचे होते. 'छान किती दिसते फुलपाखरू' यासारख्या बालांच्या तोंडी सहज बसणाऱ्या सुंदर कविता त्यांनी लिहिल्या. मन्वन्तर वाचनमाला वगैरे पाठ्यपुस्तके, लिंबोळ्या, रानजाई, पाखरांची शाळा हे काव्यसंग्रह, शिक्षणशास्त्र आणि मानसशास्त्र इ. ग्रंथ त्यांच्या कीर्तीत भर टाकणारे ठरले. ट्रेनिंग कॉलेजचे प्राचार्य, एक नामवंत शिक्षणतज्ज्ञ म्हणूनही नानासाहेब पाटील यांनी अनेक पिढ्यांना प्रभावित केले. 'बालकवीनंतर इतका हळुवार फुलामुलांचा कवी हाच.' असे त्यांच्याबद्दल वसंत बापट यांनी म्हटले होते, ते सार्थ होते.

**कमलाबाई टिळक**

हृदयशारदा, आकाशगंगा, अश्विनी या कथासंग्रहांच्या निर्मात्या कमलाबाई टिळक यांचे १० जून रोजी मुंबई येथे निधन झाले. स्त्रीजीवनविषयक काही प्रश्न, स्त्रीजीवनाची नवी क्षितिजे याद्वारे त्यांनी स्त्रीशिक्षणाचे महत्त्व प्रतिपादित केले.



अनुक्रमणिका

बनारस हिंदू विश्वविद्यालयाच्या महिला महाविद्यालयाच्या त्या प्राचार्य होत्या.

सरोजिनी ताम्हणे या जुन्या पिढीतील कवयित्री. त्यांचे निधन २४ जून रोजी मुंबई येथे झाले.

**विमलाबाई देशपांडे**

मराठीतील एक नामवंत कादंबरीकार आणि जे. कृष्णमूर्तींचे निष्ठावंत अनुयायी पु. य. देशपांडे यांच्या पत्नी विमलाबाई यांचे २९ मे १९८९ रोजी नागपूर येथे निधन झाले. १९३३ साली त्यांचा पहिला काव्यसंग्रह निर्माल्यमाला प्रसिद्ध झाला. भरारी त्यानंतर ४० वर्षांनी. घर आणि अंगण, उत्तररामचरित्र रसग्रहण, रोमां रोलां लिखित विवेकानंद चरित्राचा अनुवाद इ. त्यांची पुस्तके जाणकारांच्या भावविश्वात दृढमूल झाली. पु. य. देशपांडे हे उत्तरकाळात अध्यात्ममार्गात रमले. विमलाबाईंनाही त्याची तशीच गोडी लागली.

**सुहासिनी मुळगावकर**

आपल्या स्मितहास्याने आणि आत्मीय स्नेहभावाने सर्वांना सुखविणाऱ्या, संगीत–नाट्य–साहित्यक्षेत्रात लीलया संचार करणाऱ्या, दूरदर्शनवर 'प्रतिभा आणि प्रतिमा'सारखे आकर्षक दर्जेदार कार्यक्रम सादर करणाऱ्या कल्पक निर्मात्या, सुहासिनी मुळगावकर यांचे कर्करोगाने १४ जून ८९ रोजी मुंबईत प्राणोत्क्रमण झाले. ललितलेखसंग्रह सदाफुली, सफारी आणि मनमोकळं हे प्रवासवर्णन ही त्यांची पुस्तके त्यांच्या चोखंदळ रसिक प्रगल्भतेची साक्ष पटवतात. शतरंग हा मराठी संगीत रंगभूमीच्या पहिल्या शतकाचा वेध घेणारा कार्यक्रम. त्याचे पुस्तक त्यांच्या मृत्यूनंतर लगेच प्रसिद्ध झाले. सौभद्राचे एकपात्री प्रयोगही त्यांनी गाजवले.

**प्रा. रा. ना. गद्रे**

स. प. महाविद्यालयातील संस्कृतचे निवृत्त प्राध्यापक रा. ना. गद्रे यांचे २३ जून ८९ रोजी निधन झाले. त्यांनी अनेक संस्कृत ग्रंथ, मराठी टीका–टिप्पणीसह संपादित केले होते. प्रातिनिधिक मराठी कथांचेही त्यांनी संपादन केले होते. परिषदेशी त्यांचा निकटचा संबंध होता. विशारद वर्गाला ते अनेक वर्षे शिकवत असत.

**प्रभाकर ऊर्ध्वरेषे**

'हरवलेले दिवस' हे आत्मचरित्र मराठी साहित्यात मानसन्मानाचे ठरेल. प्रभाकर ऊर्ध्वरेषे यांनी विपुल लेखन चाळीस वर्षे केले; परंतु त्यांचे स्वतंत्र असे हेच पहिले पुस्तक. त्या पुस्तकाचे कोडकौतुक चालू असतानाच कोणाच्या ध्यानी-मनी नसता ते १० जुलै रोजी हृदयविकाराने आपल्यातून निघून गेले. दिनांक २७



अनुक्रमणिका

जूनला त्यांनी पत्रिकेला पत्र पाठवून द. भि. कुलकर्णी यांचे आलेले पत्र प्रसिद्धी-साठी घ्यावे असे सुचवले होते. 'साप्ताहिक सकाळ 'मध्ये त्यांच्या पुस्तकावर मी लिहिले होते. 'आपण लिहिलेले विस्तृत परीक्षण वाचले. ते वाचून समाधान झाले.' असेही त्यांनी लिहिले होते. सोबतमधले त्यांचे स्तंभलेखनही वेधक होते; आणि तत्पूर्वी किर्लोस्करमध्येही त्यांनी विपुल लिहिले. १९७९ साली प्राध्यापकी पेशातून मुक्त झाल्यावर ते पुण्यात स्थायिक झाले. अकरा वर्षे कम्युनिस्ट पक्षाचे कार्ड होल्डर म्हणून केलेले काम आणि त्याच्या मर्यादा ध्यानात येताच आपल्या स्वतंत्र विचारांची मांडणी करण्याचा त्यांनी घेतलेला ध्यास यामुळे त्यांचे वेगळेपण ठसठशीतपणे जाणवते.

**डॉ. गो. के. भट**

संस्कृतचे एक गाढे व्यासंगी आणि नाटयशास्त्राचे जाणकार डॉ. गोविंद केशव भट यांचे दि. १७ जुलै १९८९ रोजी वयाच्या ७५ व्या वर्षी निधन झाले.

संस्कृतचे अध्यापक म्हणून त्यांनी शेकडो विद्यार्थ्यांना प्रभावित केले. १९७२ ते ७६ या काळात ते भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिराचे संचालक होते. भरत नाटयमंजिरी, थिएट्रिक अॅस्पेक्टस ऑफ संस्कृत ड्रामा, नाटयमंजिरी सौरभ, विदूषक, कालिदास, संस्कृत नाटके व नाटककार वगैरे पुस्तके त्यांच्या व्यासंगाची व रसिकतेची साक्ष देतात. विदिशा, पानगळ हे कथासंग्रह आणि ऊरुभंग व गृहदाह या नाटयकृतीही त्यांनी निर्माण केल्या.

**वि. अ. नाईक**

मानवी स्वातंत्र्य आणि प्रेरणा, मॅन अँड दि युनिव्हर्स ह्या ग्रंथांचे लेखक आणि मुंबई उच्च न्यायालयाचे माजी न्यायमूर्ती वि. अ. नाईक यांचे दि. १८ जुलै ८९ रोजी निधन झाले. त्यांचे वय ८३ होते. पानशेत धरण चौकशी प्रकरणी त्यांनी दिलेला निवाडा गाजला. त्यात त्यांच्या विस्तृत ग्रंथवाचनाचा प्रत्यय येतो. त्यांची निकालपत्रे ही कायद्याच्या सर्व बाजू तर लक्षात घेणारी असत; त्यात वाङ्मयीन गुणही असत. बेळगावमध्ये उत्तम कायदेपंडित म्हणून लौकिक मिळाल्यावर १९५९ पासून ते मुंबई उच्च न्यायालयात न्यायाधीश म्हणून आले. आणि निवृत्तीनंतरही १९६७–७० या काळात औद्योगिक लवादाचे अध्यक्ष म्हणून त्यांनी काम केले. १९७४–७७ मध्ये ते टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचे कुलगुरु होते.

**वि. शं. पारगावकर**

मराठीतील एक नामवंत कथाकार विठ्ठल शंकर पारगावकर यांचे दिनांक ४ जुलै १९८९ रोजी दुःखद निधन झाले. १९४७ साली वयाच्या २१ व्या वर्षी मराठवाड्यातून ते पुण्याला आले आणि फर्गसन कॉलेजमध्ये ग्रंथालयात रुजू झाले.

१९५३ साली वापूची वहिनी ही त्यांची पहिली कथा सत्यकथेत प्रसिद्ध झाली. पंचरंगी स्वप्न, केळफूल, मरवा, चंद्र आणि चिमणी हे कथासंग्रह १९६० ते ६५ या दरम्यान बाजारात आले, तर राणी व आविष्कार हे कथासंग्रह १९८० व ८५ मध्ये प्रसिद्ध झाले. निगुडा, कालचक्र, वैशाखातील वावटळ, अयोनिजा वगैरे ११ कादंबऱ्या, साप्ताहिक माणूसमधील राजकीय-सामाजिक, समीक्षात्मक लेखन असे विपुल साहित्य त्यांच्या नावावर जमा आहे. त्यांचे चिरंजीव अरुण पारगावकर यांनी आपल्या प्रतिमा प्रकाशनतर्फे उत्तमोत्तम पुस्तके प्रकाशित करून त्यांचा साहित्याचा वारसा पुढे चालवला आहे.

या सर्वांच्या स्मृतीला आमची आदरांजली.

**शंकर सारडा**, संपादक

## परिषदेचे नवीन आजीव सदस्य

सर्वश्री गो. श. कुलकर्णी (राजापूर), प्रा. अनिल सोनार, रमेश वरखडे, प्रा. स्नेहल देवरे, शेख सलीम शेख अन्सारी, (सर्व धुळे), सौ. आशा भिडे (ठाणे), भा. घ. काळे (मुंबई), वसंत पालेकर (मालाड), सदा कऱ्हाडे (मुंबई), भगवान मोईर (कल्याण), दामोदर मोरे (विक्रोळी), श्रीधर लोखंडे (बोरिवली), भुजंग मेश्राम (अंबरनाथ), भारती प्रभू (मुंबई), सौ. मंदाकिनी गोगटे (मुंबई), सुधीर चव्हाण (ठाणे), वैशाली कुलकर्णी, (ठाणे), प्रमोद खोपकर (ठाणे), माधव नातू (ठाणे), सुधीर जाधव (मुंबई), श्रीधर बर्वे (मुंबई), वसंत परांजपे (मुंबई), संजय भट (वसई रोड), दया पवार (मुंबई), संजीवनी खेर (मुंबई), एम्. आर्. सराफ (हैद्राबाद), रामभाऊ काकोडकर (सांगली), मोहन कुलकर्णी (कराड), सौ. स्नेहलता पेंढारकर (भुसावळ), शरच्चंद्र छापेकर (जळगाव), सौ. पूर्वा प्रभुणे, (वाई), वि. व. दिवाण (कोल्हापूर), दत्ता भगत (नांदेड), अविनाश पाठक (नागपूर), चंद्रकांत सहारे (चंद्रपूर), व. ब. देशपांडे (सिन्नर), श्री. दि. इनामदार (औरंगाबाद), डॉ. मधुकर वाकोडे (अंजनगाव सूर्जी), नामदेवराव पाटील (अंमळनेर), शं. क. कापडणीस (सटाणा), पंढरीनाथ गुरव (सावळ), ल. मा. गायकवाड (लातूर), सुभाष वाघोलीकर (येवले), अशोक वाडकर (कोल्हापूर), विद्यागौरी टिळक (नासिक), अजय गाडे (अमरावती), गणेश मालधुरे (लोणी-अमरावती), द. ना. मातेकर (हिंगोली), दत्तात्रय दलाल, शोभा दलाल (अ. नगर), इब्राहीम मिरजे (इचलकरंजी), कमल आहेर (देवळा), चंद्रकांत वर्तक (नाशिक), लीला वेदपाठक (भाटघर), शंकर कदम (श्रीगोंदा), र. रा. गोसावी (मालेगाव कॅम्प), दीपक प्रभुणे (सातारा), शंकर इनामदार (जुन्नर), सौ. मंगला दंडगे (कोल्हापूर), सौ. विजया खंगार (औरंगाबाद), जालंदर खोनुने (पोर्टब्लेअर)

# महाराष्ट्र साहित्य परिषद
# साहित्यिक साहाय्य निधी

वृद्ध, अपंग आणि निराधार साहित्यिकांना आर्थिक साहाय्य देण्यासाठी महाराष्ट्र साहित्य परिषदेने १९८७ साली साहित्यिक साहाय्य निधी जमा करण्याची योजना हाती घेतली होती. या निधीला सढळपणे देणग्या देऊन साहित्यप्रेमी जनतेने साहित्यिकांबद्दल आपली कृतज्ञता व्यक्त करावी, असे आवाहन वेळोवेळी करण्यात आले होते. या आवाहनाला साहित्यप्रेमी संस्था आणि व्यक्ती यांनी तसेच साहित्य परिषदेच्या सभासदांनी उत्तम प्रतिसाद दिल्यामुळे ३० जून १९८९ पर्यंत एक लाख रुपयांचा साहित्यिक साहाय्य निधी जमा झालेला आहे. हा निधी जमविण्यास ज्या साहित्यप्रेमी रसिकांनी हातभार लावला त्यांचे आम्ही अतिशय आभारी आहोत.

दिनांक २७ मे १९८९ रोजी झालेल्या साहित्य परिषदेच्या ८३ व्या वर्धापनदिनाच्या समारंभात महाराष्ट्राचे मुख्यमंत्री श्री. शरद पवार यांनी साहित्यिक साहाय्य निधीच्या या उपक्रमाची प्रशंसा केली आणि निधीसाठी एक लाख रुपयांची देणगी दिली, हे नमूद करण्यास आनंद होतो. या वर्धापनदिन समारंभात मुख्य मंत्र्यांच्या हस्ते वयोवृद्ध नाटककार श्री. विनायकराव देवरुखकर यांना साहित्यिक साहाय्य निधीच्या व्याजातून मानधन देण्यात येऊन त्यांचा गौरव करण्यात आला.

दर वर्षी अधिकाधिक साहित्यिकांना जास्तीत जास्त मानधन देता यावे यासाठी किमान पाच लाख रुपयांचा साहित्यिक साहाय्य निधी जमविण्याचा साहित्य परिषदेचा संकल्प आहे. हा संकल्प शक्य तितक्या लवकर पूर्ण करण्यासाठी सर्व साहित्यप्रेमी रसिकांनी जास्तीत जास्त रकमेची देणगी रोख, चेकने किंवा ड्राफ्टने 'महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे' या नावाने पाठवावी अशी आग्रहाची विनंती आहे. या निधीसाठी दिलेल्या देणगीला आयकरातून सूट मिळणार असून देणगीची रीतसर पावती लगेच पाठविण्यात येईल. देणगीदारांची नावे महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या अंकातून प्रसिद्ध करण्यात येतील.

| | | |
|---|---|---|
| **म. वि. गोखले**<br>कोषाध्यक्ष | **राजेंद्र बनहट्टी**<br>कार्याध्यक्ष | **ग. प्र. प्रधान**<br>अध्यक्ष |
| **गं. ना. जोगळेकर**<br>कार्यवाह | **राजा फडणीस**<br>कार्यवाह | **चिं. शं. जोशी**<br>कार्यवाह |

अनुक्रमणिका








# नवोदित कवींशी हितगुज

प्रा. वसंत बापट

मराठी कवितेच्या सद्यःस्थितीचा विचार केला तर तिथे मात्र उत्साहाला आलेली भरती अभूतपूर्वच म्हणावी लागेल. कवींची संख्या भूमितिश्रेणीने वाढली असून काव्याचे उत्पादन प्रचंड प्रमाणावर चालू आहे कोणत्याही समाजात काव्याबद्दल एवढ्या प्रमाणावर प्रेम निर्माण व्हावे ही गोष्ट स्वागतार्हच मानावी लागेल. 'द्या उत्तेजन हो कवीस न करा गाणे तयाचे मुके' हे केशवसुतांचे उद्‌गार आपण फारच मनावर घेतलेले दिसतात. कधी कधी कविसंमेलनात श्रोत्यांपेक्षा कवींची संख्याच मोठी असते. लहानमोठी मासिके, साप्ताहिके, वृत्तपत्रे यांतून प्रचंड संख्येने कविता येत असतात. पण हे जमले नाही तर कवी स्वतःच आपले संग्रह प्रसिद्ध करतात. किंवा कुणी वाङ्मयप्रसारक आणि कविहितैषी संपादक कवीकडून त्यांच्या कविता प्रकाशित करण्यासाठी पैसे घेतात आणि ३०/४० कवींच्या कवितांचा गुच्छ छापून काढतात ! कवी आणि कविता यांची खिल्ली यापूर्वीही अनेक विनोदी लेखकांनी उडवलेली आहे. पण आता अशी अवस्था येऊ घातली आहे की सर्वसामान्य वाचकाला आणि श्रोत्याला कवितांचा ओव्हरडोस सहनच होऊ नये. उत्साह अमाप आणि गुणवत्ता तुटपुंजी किंवा शून्य अशी स्थिती झाली तर संख्यात्मक वाढीला विकास म्हणणे अगदीच अनुचित ठरेल आणि नेमकी हीच गोष्ट आपल्या अवतीभवती आपण पाहत आहोत.

माझ्या वयाचा किंवा पिढीचा कवी सध्याच्या कवितेवर प्रतिकूल टीका करू लागला तर त्याला जुनाट मताचा तरी ठरवण्यात येते किंवा प्रस्थापित नावाची नव्याने रूढ झालेली शिवी त्याला घालण्यात येते. सर्व नवोदित कवी हे बिचारे आणि उपेक्षित; आणि सर्व प्रस्थापित कवी मात्र दादागिरीने अथवा कम्पूशाहीने त्यांना नेस्तनाबूत करणारे... अशी हाकाटी मी अनेक वेळा ऐकतो, ती मला कांगावखोरपणाची वाटते. कोणाही मान्यवर झालेल्या कवीला किंवा कवीच्या कंपूला नवोदितांवर अन्याय करण्यात कसलाही रस नाही. कोणाचीही लोकप्रियता किंवा व्यावसायिक हित धोक्यात येण्याचा प्रश्न इथे उपस्थित होत नाही. या क्षेत्रात 'स्वयमेव मृगेन्द्रता' हा एकच न्याय आहे, असू शकतो. घरात असलेल्या



अनुक्रमणिका

दिव्यांचा प्रकाश तावदानातून बाहेर फाकतो तशी अंतरीची प्रतिभा साहित्यकृतीत प्रकट झाल्याशिवाव राहत नाही, तिला कोणी रोखू शकत नाही. कस्तुरीचा सुगंध कोणाच्या मान्यतेची किंवा इच्छे–अनिच्छेची फिकीर करत नाही. अजिंठ्या-जवळच्या खेड्यातला शेतकऱ्याचा मुलगा म्हणजे चक्क ग्रामीण भागात जन्मलेला-वाढलेला आणि मोहरलेला. त्या महानोरांना मानाची जागा मिळण्यासाठी कोणाचे उत्तेजन, चिठ्ठी-चपाटी, शिफारसपत्र वगैरेंची गरज पडलेली नाही मुंबईच्या रस्त्यावर ज्यांना आपले विद्यापीठ सापडले त्या नारायण सुर्व्यांचा आवाज जनते-पर्यंत पोचवण्यासाठी कोणा हिकमती हुशाराचा ध्वनिक्षेपक त्यांच्या मदतीला आला नाही. बहिणीबाईंनी तर एकलव्यासारखे शिक्षणसुद्धा कोणाकडून घेतले नाही. नामदेव ढसाळ, दया पवार अशी किती तरी नावे सांगता येतील की ज्यांनी आपल्या स्वयंभू कवित्वाच्या बळावर आपले स्थान आपणच निर्माण केले. कवितेत सामर्थ्य असले, सौंदर्य असले, विलक्षणता असली तर त्या गुणांची पावती मिळाल्याशिवाय राहणार नाही, आणि तीही लगोलग मिळेल. विशाल पृथ्वीवर अनंत काळात केव्हातरी माझा रसिक मला भेटेलच, असल्या भवभूतीच्या आशावादाची आता गरज नाही. प्राचीन काळापेक्षा आता प्रसारमाध्यमे जबरदस्त वाढली आहेत. किती मंच, किती व्यासपीठे आता उपलब्ध आहेत. परंतु मुळातच कवित्व बेताचे असले तर नुसत्या कुरकुरीच्या जोरावर कोणी झाला तरी कसा तगू शकणार ? यात खरी गोष्ट आहे ती अशी की कविपदवीच्या हव्यासाने शेकडो होतकरू मंडळी जमेल तसे वेडेवाकुडे गाऊन, जनतेला परि तुझा म्हणवीन, असा आग्रह धरीत आहेत. चांगल्या नवोदित कवीला आज धोका संभवतो तो कोणत्याही चांगल्या प्रस्थापित कवीकडून आणि त्याच्या कवितेच्या बडिवारामुळे नव्हे; धोका आहे तो वारेमाप पिकणाऱ्या टुकार कवितांच्या ओझ्याखाली गुदमरून जाण्याचा. ज्याची तलवार गाजी असते तो रणांगणावर कोणाच्या शाबासकीसाठी थांबलेला नसतो. ज्याची लेखणी लावण्यखनी असते तोही वशिल्यासाठी थांबत नाही. तुकोबांच्या प्रमाणे 'झड मारूनिया बैसलो पंगती' अशा ताकदीने जो साहित्याच्या प्रांगणात येईल, त्या नव्या दमाच्या शूर शिपायाला कोणी रोधू शकत नाही. दुर्दैवाने सच्चे सूर दुर्मिळ झाले असून लटकेपण चलनी झाले आहे.

मुक्तछंद लेखन म्हणजे बेबंद लेखन हा गोड गैरसमज जेवढ्या लवकर नाहीसा होईल तेवढे मराठी कवितेचे अधिक कल्याण होईल. याचाही पुढला प्रकार म्हणजे त्यक्तछंद स्वैर रचनेचा. तोच एक आधुनिक प्रकार असे धरून चालणारी माणसे गद्याचाच प्रपंच जरा आविर्भावात मांडतात. काव्याच्या भाषेची काही वेगळी लय असते, ती अनेक वेळा गूढ असते पण असते निश्चित. अशी लय सहजलीलया आत्मसात व्हायला हवी असेल तर आधी छंदसुंदर कविता मनात मुरलेली असावी

लागते. ज्याची घोड्यावर मांड पक्की असेल तोच घोड्यावर वाटेल तशी कसरत करू शकेल किंवा हवे तर शीर्षासनदेखील करील. एरवी घोड्यावर अळेवळे स्वार होणाराची फजिती मात्र होईल. स्वैर कवितेचे अनुकरण सर्वांत सोपे वाटते, पण स्वैर कवितेत यश मिळणे मात्र सर्वांत कठीण असते. यशस्वी कवीची आणि त्याच्या रचनावैशिष्ट्यांची अनुकरणे प्राचीन काळापासून केली जात आहेत. गेल्या शंभर वर्षांचाच इतिहास पाहिला तरी अस्सल काव्यामागोमाग नकलांच्या लाटांवर लाटा आलेल्या दिसतात. गडकरी आणि बालकवी यांच्या दुबळ्या नकला त्या काळात शेकड्यांनी दाखवता येतील. तांब्यांच्या गीतसदृश रचनांचीही अनेक अनुकरणे झाली. रविकिरण मंडळाच्या काळात अनुकरणांनी नको जीव केला. अनिल आणि बोरकर, पु. शि. रेगे आणि मर्ढेकर यांच्याही कार्बन कॉप्या काही कमी निघाल्या नाहीत. विंदा करंदीकरांच्या बालगीतांच्या तोंडवळ्यांची पिलावळ ठिकठिकाणी जन्माला आली. ग्रेस' दिलीप चित्रे अशा कवींच्या दुर्बोधतेचा वारसा बऱ्याच जणांनी उचलून पाहिला. नारायण सुर्वे यांची अनलंकृत करडी शैली मराठीचिये नगरी पसंत पडते आहे असे दिसताच अनेकांच्या कविता त्याच वाणाच्या दिसू लागल्या. विशेषत: संतप्त तरुण आणि सामाजिक परिवर्तनासाठी पद्यपंक्तीची तरफ करणारे लेखक कासराभर वर आलेल्या सुर्वेनारायणाच्या प्रकाशात तीच वाट चालत राहिले. नामदेव ढसाळ अनेक कवींनी आणि विशेषत: दलित कवींनी अनुकरणासाठी आदर्श म्हणून स्वीकारला. सुरेश भट यांच्यासारखा पट्टीचा गझलकार मैदान गाजवू लागल्यानंतर, ज्वारी बाजरीची शेती थांबवून शेतकऱ्यांनी उसाकडे वळावे त्याचप्रमाणे होतकरू कवींनी गझल वेठीला धरला. त्यांच्या दुर्दैवाने गझल मुक्त नसून चांगलाच सुबद्ध प्रकार आहे. त्यात शब्दांची बंधने तर आहेतच पण त्याशिवाय बंदिशीच्या दृष्टीनेही विशिष्ट अपेक्षा असतात. साहजिकच हटातटाने पदबंध करू पाहणारांची गझल रचताना होणारी तिरपीट विशेषच उघडी पडते. कवितेच्या क्षेत्रात भरमसाट होणारी जी वाढ आहे तिचा बराचसा वाटा अनुकरणांकडे जातो आणि उरलेली वाढ कृतक स्वैर कविता आणि विद्रोहाचा मुखवटा चढवून सुरू असलेल्या अलल डुर्रर थाटाच्या कविता यांनी घडवून आणली आहे. येथे माझा आक्षेप सुर्व्यांच्या बुलंद कवितेवर नाही, सुरेश भटांच्या सुबद्ध गझलांवर नाही आणि दलितांच्या विद्रोही कवितेवरही नाही हे मला स्पष्टपणे सांगितले पाहिजे. या सर्वांनी मराठी कवितेची संपन्नता वाढविली आहे, असेच माझे मत आहे. माझा आक्षेप आहे तो त्यांच्या दुबळ्या पडसादांना.

अलीकडे बऱ्याच कवींची कविता जशी काही गणवेष घातल्यागत झाली आहे, एका छापाची झाली आहेत असे ध्यानात येते. पुन्हा हा छाप बिनचेहऱ्याचा आहे. सगळ्यांच्या आशानिराशा – म्हणजे निराशाच, एकसारख्या आहेत. सर्वांना

आयुष्याबद्दल आलेला वैतागही सारखाच आहे. 'भिकार या जगी वांछित न मिळे काही' ही आता सामुदायिक सत्कार झाली आहे. हे झाले आशयाचे स्वरूप. पण अभिव्यक्तीही अशी की तिला ज्या त्या कवीचा न वेगळा रंग न वेगळे रूप. त्यामुळे कवितेच्या जगात पृथगात्मतेचे अवमूल्यन झालेले आहे. हिंदी भाषेत मोठ्या लेखकाचा नामोल्लेख करताना 'यह एक सशक्त हस्ताक्षर हैं,' असे म्हणतात. मराठी कवितेत एके काळी कवीची सशक्तता अशी होती की त्याने हस्ताक्षर केले नाही तरी विशिष्ट कविता त्याचीच आहे हे सहज ओळखू येत असे कारण ज्याला त्याला वेगळी शैली होती, ज्याची त्याची वेगळी बलस्थाने होती. असे कवी आता थोडे उरले आहेत. शैलीच्या वैशिष्ट्याच्या अभावामुळे आज कवींच्या आगळ्या वेगळ्या व्यक्तित्वांचा लोप झाला आहे आणि सर्व कविता अशा काही एकरूप दिसू लागल्या आहेत की एकाच्या कवितेखाली दुसऱ्याची सही छापली तरी बिघडू नये.

(म. सा. परिषदेच्या पिंपरी-चिंचवडच्या सहाव्या विभागीय संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणातील काही भाग)

## परिषदेचे नवीन आजीव सदस्य

सर्वश्री–सौ. ज. शं. भावे, सौ. शीला रा. चिवटे, सौ. श्रुति परांजपे, बॅ. सुनीती पुंगलिया, अनिल भिडे, सौ. विद्या केसकर, प. रा. हरदास, सौ. व. वि. भुस्कुटे, द. वि. परांजपे, सौ. ज्योती मुणगेकर, सौ. सीमा गाडगीळ, चं. भा. पंडित, क. वि. श्रीखंडे, स्नेहल ढेकणे, व. सि. टकले, सौ. शलाका काजरेकर, सौ. उषा कोटवागी, ह. बा. शिंदे, शंकर अभ्यंकर, मं. नी. खेर, पद्मा आपटे, भा. ग. ठकार, उल्हास कंधारकर, अभिजीत कुलकर्णी, भ. शं. संत, पुष्पा काळे, सौ. केतकी मोडक, सौ. प्राची साठे, सदानंद गोखले, द. श्री. गानू, व. वि. जोगळेकर, कांचन वेरेकर, सं. स. भोसले, सुधाकर काकडे, धनंजय राजवाडे, मीना कुलकर्णी, जयश्री पाटणकर, वसंत वापट, शोभा पोटे, प्रा. सत्यवती कुलकर्णी, विजय तरवडे, प्रसन्नकुमार केसकर, सौ. रोहिणी चावरे, शारदा देशमुख, अरविंद पुरंदरे, किरण जोशी, गोविंद गारे, जयंत सुपनेकर, सौ. सुलभा आफळे, सौ. स्वाती देशमुख, राहुल गोखले, सौ. जयश्री त्रहिरट, हेमलता तडसरे, रा. तु. कुलकर्णी, सुमेधा कमळापूरकर, शरच्चंद्र गोखले, ह. ना. कुंदेन, प्रभा कुलकर्णी, सुजाता जडचे, भालचंद्र देव, सौ. आशा सगरोळीकर, सौ. नीलम पेंडसे, सौ. शकुंतला फडणीस, सौ. नीना भेडजगावकर, गजानन क्षीरसागर, राम वझे, सौ. अश्विनी रोहोकले, सौ. जयश्री रायरीकर, डॉ. श्रीपाद कोटवागी, सौ. मंजिरी वेडेकर, विनायक देशपांडे, हेमा महाजन, सौ. राजश्री खटावकर, मेधा मिजार, मेधा खोले. (सर्व पुणे)

# काव्यानुभवाच्या पुनरावृत्तीची कारणे

डॉ. द. ता. भोसले

मराठी काव्यात अनेकदा असे दिसून येते की, एकच कवी एकाच विषयावर दोन–तीन कविता निर्माण करतो. समाजजीवनातील एखादी घटना किंवा वस्तू पाहिल्यावर प्रथम तो आपला अनुभव कवितेद्वारे व्यक्त करतो. कालांतराने त्याच प्रसंग–घटनेच्या आधारे त्याला नवीन कविता व्हावी असे वाटते. त्या आधारे तो दुसरी कविता तयार करतो. काही वेळा तीच घटना त्याच्या तिसऱ्या आविष्काराला देखील जन्म देण्यास कारणीभूत ठरते! एखादी घटना पाहिल्यानंतर त्यातून आलेल्या काव्यानुभवाचा एकदा आविष्कार केल्यावर त्याला समाधान का लाभत नसावे? पुन्हा पुन्हा तो अनुभव त्याला का व्यक्त करावासा वाटतो? याचे अनेकदा वाचकांना कोडे पडते. या कोडयाचे रहस्य नेमके कशात दडलेले असावे? त्या अनुभवात असते? निर्मितिप्रक्रियेच्या असणाऱ्या विविध अवस्थेतील एखाद्या गफलतीत ते असते? की कवीच्या विशिष्ट काळी असलेल्या व्यक्तित्वाच्या वृत्तीशी ते निगडीत असते? खरे तर साहित्यनिर्मितीची गर्भावस्था जटिल, अबोध नि जाणीव-नेणिवेच्या तरल पातळीवर असल्याने आणि तितकीच ती अनाकलनीय असल्याने या कोडयाचे नेमके उत्तर कवीलाही देता येईल असे वाटत नाही. तरीही या पुनरावृत्त होणाऱ्या आविष्काराच्या शक्यता थोडयाफार आपणाला शोधता येतील असे म्हणावयास हरकत नाही.

एकाच घटनेच्या निमित्ताने एकापेक्षा अधिक वेळा साकार होणारा कवितेतील अनुभव एकाच जातीचा नसतो; हे आपणाला त्या कविता आस्वादताना प्रथम-दर्शनीच जाणवते. लौकिकदृष्टया विषय एकच वाटला तरी त्यातून कवितारूप धारण करणारा अनुभव एकाच जातीचा – एकाच स्वरूपाचा – नसतो, हेदेखील आपल्या लक्षात येते. कदाचित त्याद्वारे व्यक्त झालेला त्याचा अनुभवघाटच नवा असावा. कवीला आलेला अवघा अनुभवच वेगळा असावा असे आपणाला प्रतित होते. मग अनुभवाच्या घाटाच्या निर्मितीचे बाहयकरण तेच असताना हा वेगळेपणा का येत असावा? कशामुळे येत असावा, हा खरा प्रश्न आहे.

## काव्येतर प्रेरणेचा प्रभाव

या वेगळेपणाचे एक कारण असे सांगता येईल की, एखाद्या घटना-प्रसंगाच्या निमित्ताने कवीला त्या विशिष्ट क्षणी जो अनुभव आलेला असतो नि त्याचा काव्यरूप आविष्कार घडतो; त्याक्षणी अनुभवाच्या पुढे-मागे किंवा अवती भवती तात्कालिक स्वरूपाचे काही फोर्सेस अवतरत असावेत. तो काव्यानुभव केवळ केवलावयवी नि काव्यात्मक स्वरूपात व्यक्तच होत नसावा. त्यामध्ये काव्येतर स्वरूपाची प्रबळ असलेली एखादी प्रेरणा मिसळली जात असावी. व्यावहारिक जीवनातले काही हितअहितकारक उद्देश नकळत काव्यात्मक होत असलेल्या अनुभवात मिसळत असावेत. प्रथमदर्शनी ते लक्षात येत नसावेत, किंवा लक्षात आले तरी कवितारूप धारण करणाऱ्या कलात्मक अनुभवापासून त्याला वेगळे काढता येत नसावे. शिवाय कलावंताचे संवेदनशील मनही या तात्कालिक स्वरूपाच्या फोर्सेसमुळे प्रभावित झालेले असते. असा शबलित झालेला अनुभव आणि शबलित झालेले कवीचे मन ह्यांचा स्फूर्तिप्रद आविष्कार या पहिल्या कवितेत प्रकट होत असावा. त्या क्षणापुरती ती कविता मनःपूर्वक नि काव्यात्म प्रेरणेतून निर्माण झालेली आहे, असे कवीला वाटलें तरी कालांतराने तिच्यातील तात्कालिक फोर्सेसमुळे निर्माण झालेली शबलित अवस्था कवीच्या रसडोळस नजरेला येत असली पाहिजे. आपल्या या कवितेच्या अनुभवाला प्राप्त झालेला घाट स्वाभाविक स्वरूपाचा; आणि तितकाच निर्दोष स्वरूपाचा आहे, असे कवीला त्यावेळी वाटते. आपण घेतलेला अनुभव हा ह्या वेळेपुरता परिपूर्ण, कलापूर्ण - नि निर्दोष स्वरूपाचा आहे अशी कविमनाची धारणा बनते. पण कालांतराने त्यातली अपूर्णता अथवा अर्धी-कच्ची अभिव्यक्ती कवीला जाणवते. अन् त्यातून दुसऱ्या कवितेचा जन्म होत असावा; असे म्हणता यावे. अथवा दुसरा वाङ्मयप्रकार हाताळावा असेही त्याला वाटते. कवी यशवंतांची 'आई' ही गाजलेली कविता याचे उत्तम उदाहरण म्हणून सांगता येईल. या कवितेच्या निर्मितीवेळी तात्कालिक घटनेच्या तीव्र उद्रेकाची अकलात्मक भेसळ कवितेच्या उत्तरार्धात आलेली असल्याने या कवितेच्या शारीर व अन्तर्गत घाटात जोडकाम केल्यासारखे वाटते. आणि याची कबुली स्वतः कवीनेही एका मुलाखतीमध्ये दिलेली आहे.

## मर्यादांची जाणीव

या अनुभवाच्या एकात्म रूपाला तडा पाडणारे हे तात्कालिक फोर्सेस कवीला निर्मितीच्या क्षणी वेगळे का करता येत नसावेत आणि ते त्या अनुभवात का मिसळत असावेत, असा एक प्रश्न आपणाला पडतो. या प्रश्नासंबंधी असे वाटते की, लेखक जेव्हा एखादा अनुभव घेतो; किंवा त्याला अनुभव येतो; तेव्हा त्या स्वीकारावस्थेवेळी

त्याच्या मनाची अवस्था नेहमीप्रमाणे स्थिर व 'नॉर्मल' स्वरूपात राहात नसावी. अनुभव स्वीकारण्यासाठी त्या मनात काही स्थित्यंतर घडत असावे. त्या अनुभवाच्या स्वरूप आणि अवस्थेप्रमाणेच लेखकाच्या मनाचीही एक अवस्था तयार होत असावी. अनुभवाला जी तीव्रता, उत्कटता, गती, उंची असेल; त्या पातळीवर कलावंताचे मन आपोआपच जात असावे. शास्त्रीय संगीताचा अनुभव व आस्वाद घेताना आपणाला याची सहज प्रचीती येते. त्याच प्रकरणी प्रचीती वाङ्मयीन अनुभवाचा स्वीकार करताना कवीच्या मनाची होत असावी. अशा समपातळीवर पोचलेल्या मनाला, प्रतिभेला तो अनुभव वाङ्मयीनदृष्ट्या नीट पारखून घेता येत नसावा. त्या क्षणापुरता त्यातील वाङ्मयबाह्य फोर्सेस लक्षात येत नसावेत; अन् म्हणूनच वेगळेही करता येत नसावेत. त्यातच स्फूर्तीचा एक अनावर आवेग आविष्काराला येऊन मिसळत असल्याने कवीला आलेल्या अनुभवाचा आविष्कार करण्याखेरीज गत्यंतर उरत नसावे, असे वाटते. एखादा तीव्र अनुभव पाहताक्षणी काहींना जी तत्क्षणी उत्स्फूर्त काव्यरचना साधते. त्यामागील हेच कारण असण्याचे शक्यता वाटते तसेच मानवी व्यवहारातला कोणताही अनुभव एक स्वरूपी कधीच नसतो. त्याला विविध पैलू असतात. विविध अंगे असतात. त्या अनुभवाला विविध उद्दिष्टेही असतात. व्यावहारिकदृष्ट्याही त्याची उपयुक्तता असते. त्या अनुभवाला जसे वाङ्मयीन चैतन्यात्मक अंग असते; तसेच त्यात काही अवाङ्मयीनही घटक असतात. या सर्वांचा मिळून तो अनुभव तयार होत असतो. त्याला आकार प्राप्त होतो. अशा संमिश्र स्वरूपाचे अनुभव प्रत्ययी कवीला येत असतात. त्यातून तो आपला वाङ्मयीन अनुभव कोरून घेतो. पण अनेकदा 'कोरून' घेण्यासारखी अनुभवाची प्रकृती नसते. त्याचे एकूण स्वरूपच अतिशय संमिश्र बनलेले असते. शिवाय त्याला व्यक्त होताना वेगळेच रूप प्राप्त होते. त्या अनुभवाला आपोआपच तीव्रताही प्राप्त झालेली असते. त्यामुळे वाङ्मयीन स्वरूपाचे घटक अधिकच एकमेकात कालविले जात असावेत. त्याचे रसायन एकात्म होऊनच कविमनाला 'भावत' असावे. स्वाभाविकच कवीला तो व्यक्त करणे शक्य व स्वाभाविक होऊन जाते आणि त्यातून तो काव्यरूप धारण करतो. पण कालांतराने मात्र त्यातील मर्यादा, त्यातील अपुरेपणा कवीला प्रतीत होतो आणि मग तो अनुभव पूर्णतः व्यक्त करण्याच्या धडपडीतून दुसऱ्या आविष्काराला शब्दरूप प्राप्त होत असावे, असे वाटते. म्हणून तात्कालिक स्वरूपाचे अकलात्मक फोर्सेस अशा पुनर्आविष्कारास कारणीभूत होत असावेत, असे वाटते.

### अनुभवाचे विराट रूप

एखादा लेखक त्याच विषयावर पुन्हा निर्मिती करतो याचे आणखी एक कारण

देता येण्यासारखे आहे. हे कारण अनुभवाच्या दर्शनात आहे. कवीला प्रथमदर्शनी अनुभवाचा जो साक्षात्कार होतो; त्यावेळी तो अनुभव पूर्णांगाने त्याच्या आस्वाद-क्षेत्रात आलेला असतोच असे नाही. कलावंताच्या मनाची थोडीशी वेगळी बनलेली मनोवस्था; अनुभवाला असलेली तीव्रता नि उत्कटता, त्यात स्वाभाविक स्वरूपात मिसळलेले काही बाह्य घटक; अवाङ्मयीन स्वरूपाच्या फोर्सेसचा सर्वांगांनी येणारा रेटा आणि अनुभवाची विशिष्ट जात यामुळे कलावंताला तो अनुभव सर्व बाजूंनी नीटपणे अनुभवता आलेला नसतो. त्याची अंगे–उपांगे त्याच्या नजरेतून सुटून जाण्याची शक्यता असते. त्या अनुभवाचे कंगोरे नीटपणे प्रतीत केलेले नसतात. पण नंतरच्या दर्शनावेळी त्याला हे जाणवून जाते. त्याचे एक नवेच दर्शन त्यावेळी होते. अनुभव नवा नसला तरी त्याचे दर्शन मात्र नवे असते. त्याचे आकलन नवे असते. आणि हे नवे दर्शन–नवे आकलन आपल्या पहिल्या आविष्कारात आलेले नाही, याचीही त्याला जाणीव होते. आपल्या मनाने अनुभवलेले चित्र जितके परिपूर्ण वाटत होते; तितके ते नाही याची या दुसऱ्या वेळी कवीला जाणीव होते. व त्यातून तो आपल्या अनुभवाचे अलक्षित, उपेक्षित असे काव्यात्म कंगोरे व्यक्त करू लागतो. सहजपणे वरवरच्या नजरेने पाहिलेल्या एखाद्या पुष्पाचे दर्शन आपणाला जेवढे होईल; त्यापेक्षा ते हाती घेऊन नीटपणे सर्वांगांनी न्याहाळल्यावर त्याचे घडणारे दर्शन अधिक परिपूर्ण व यथातथ्य अशा स्वरूपाचे ठरेल. तीच अवस्था काव्यानुभवाच्या संदर्भात सांगता येईल. केशवसुतांनी एप्रिल १८९१ ते नोव्हेंबर १९०० या कालावधीत फुलांवरील एकूण पाच कविता लिहिल्या आहेत. या पांच कवितांत व्यक्त झालेला अनुभव एक वाटत नाही. वृत्ती एकाच प्रकारची नाही. मनाची अवस्था एका प्रकारची नाही. 'फुलांची पखरण' या कवितेत सूर्याने उजळलेल्या सकाळी फुललेले फूल अनुभवताना ते म्हणतात, "वेलीवरती आशेचिया गाणी ती फुलली." तर 'पुष्पांप्रत' या कवितेत चिर-तरुण, चिररुचिर असलेल्या फुलाचा साक्षात्कार त्यांना दिव्यत्वाचा साक्षात्कार वाटतो. त्या दिव्यत्वाला काळही नमन करण्यासाठी झुकेल. पण "तव गावयाला–मी पात्र नाही गमते मनाला." अशी खंत व्यक्त करून काळोखात भटकणाऱ्या अशांत मनाची वेदना व्यक्त केली आहे, तर 'फुलातले गुण' या कवितेत–

पुष्पी या सुंदरता
फार असे, ती चित्ता
वेधुनि संसारताप सारिते दुरी,
उल्लसित त्या करी

या प्रकारे अनुभवाचे वेगळेपण – नवे दर्शन – व्यक्त केले आहे. या दर्शनाच्या माग

केशवसुतांच्या खिन्न आणि व्यथित मनाचे रंग उभे असलेले जाणवतात. त्या मनाने फुलांचा घेतलेला अनुभव वेगळा आहे. त्या अवस्थेत त्यांना झालेले फुलाचे दर्शन; फुलावरून अन्यत्र जाते. पण 'फुलपाखरू' या कवितेतील अनुभव पूर्वार्धात नैराश्यपूर्ण स्वरूपाचा असला तरी अखेरीला मात्र केशवसुतांना फुलाचे वेगळे दर्शन घडते. ते अखेरीला लिहितात—

"जे रम्य ते बघुनिया मज वेड लागे
गाणे मनात मग होय सवेचि जागे;
गातो म्हणून कवनी फुलपाखराते"

म्हणून एकाच विषयावर कवीला पुन्हा कविता करावीशी वाटते; यात त्या अनुभवाचे घडलेले नवे दर्शन, नवे अंग हे एक कारण आपणाला सांगता येते.

या नव्या दर्शनाला आपणास नवा अनुभव म्हणता येईल का ? तो घेतलेला अनुभव नवा असेल तर यापूर्वी या प्रकारचे दर्शन कवीला का झालेले नसते ? का अनुभवाचे व्यक्तीकरण करताना त्याला अपयश आलेले असते ? काही वेळा तो नवा अनुभव असण्याची शक्यता नाकारता येत नाही. पण 'नवा' म्हणताना आपला हा शब्द कोणत्या अर्थाने घेतो. नेमका 'नवा' कशाला म्हणतो यावर ते अवलंबून राहील. आपण याचा जसा घेऊ; तसे त्याचे स्वरूप ठरवू. पण साकल्याने विचार केला तर अनुभवाची काही वैशिष्ट्ये अधिक जाणवलेली असतात. त्या अनुभवाची नवी बाजू मनासमोर आलेली असते. त्यामुळे त्याच्याकडे पाहण्याचा दृष्टिकोण बदललेला असतो. त्यामुळे त्याचे दर्शन वेगळे घडते आणि वेगळे घडवलेही जाते. म्हणून संपूर्णतया अनुभवविश्वच नवे, वेगळे नसते असेच आपणाला या संदर्भात म्हणता येईल.

### लोकमान्य पारंपरिक आकृतिबंध

अनेकदा असेही घडण्याची शक्यता असते की, कवीच्या प्रतिभेवर पारंपरिक आणि रसिकमान्य अशा वाङ्मयप्रकाराचा पगडा बसलेला असतो. एखादा विशिष्ट वाङ्मयप्रकार (फॉर्म) त्याला आविष्काराला सोपा वाटतो. काही वेळा त्या 'फॉर्म'वर त्याची हुकमतही बसून गेलेली असते. बाह्य प्रेरकापासून घेतलेला अनुभव वाचकमान्य वाङ्मयप्रकारातून व्यक्त केला नाही; तर आपल्या आविष्काराला साहित्य मानले जाणार नाही; अशी एक प्रकारची भीतीही कलावंताच्या मनात दडलेली असते. त्या वाङ्मयप्रकारची तोडमोड करण्याची त्याच्या प्रतिभेची ताकदही नसते; अन् तशी त्याला हिंमतही नसते. अशा वेळी आपल्या अनुभवाला शब्दरूप देताना तो त्या फॉर्मच्या चौकटीमध्येच अडकतो. त्या 'फॉर्म'मध्ये जसा, जितका

नि ज्याप्रकारे आपला अनुभव मावेल; तसा, तितका, त्याप्रकारे व्यक्त करून मोकळा होतो. त्यासाठी अनुभवाची साकल्यता, परिपूर्तता कमी झाली तरी त्याचे त्याला काही वाटत नाही. आपला अनुभव विशिष्ट 'फॉर्म'मध्ये सफाईदार स्वरूपात व्यक्त झाला; याचेच त्याला समाधान असते. कारण त्यावेळी अनुभवा-पेक्षा त्याला 'फॉर्म' महत्त्वाचा वाटतो. लोकाभिरुची महत्त्वाची वाटत असते. तिचा प्रतिसाद त्याला महत्त्वाचा वाटत असतो. लेखनाच्या प्रारंभावस्थेत हे सारे स्वाभाविक असते. अपरिहार्य असते. पण त्यामुळे नकळत कवीचा नि अनुभवाचा तोटा होत असतो. कोणताही अनुभव लोकमान्य झालेला 'फॉर्म' घेऊनच अवतरतो, असे नाही. नव्हे तसा तो बव्हंशी येत नाही. त्याचे स्वरूप व्यामिश्र, रूप अनघड, प्रतीती असांकेतिक पद्धतीची अशी असते. एखाद्या वृक्षाला जशा वेड्या–वाकड्या कशाही फांद्या फुटलेल्या असतात व त्यामुळे त्याला डेरेदार आकार आलेला नसतो; तसा तो अनुभव असतो. त्या अनुभवाची आवाहन करणारी अग्रे कमीअधिक तीव्रतेची असतात. त्याचे रूप सहज असले तरी त्या 'फॉर्म'मध्ये चपखलपणे बसेल असे नसते. अशा वेळी वर सांगितल्याप्रमाणे साहित्यिक आपल्या अनुभवाला कसातरी कापून–कोंबून त्या फॉर्मच्या चौकटीत बसवितो. त्याला सफाई देतो त्याचा काही भाग वगळून चौकटीत बसणारा भागच तेवढा व्यक्त करून मोकळा होतो. अशा रीतीने व्यक्त झालेला अनुभव रसिकाला अपुरा आहे असे वाटत नाही. त्याच्या दृष्टीने तो परिपूर्ण रूपातच व्यक्त झालेला असतो. कारण, काय राहून गेले आहे याची त्याला जाणीव नसते. पण कालांतराने मात्र कवीला जाणवते की, तेव्हाचा आपला अनुभवाविष्कार हा स्वाभाविक आविष्कार नव्हता. अनुभवाला आकार देण्यापेक्षा आकारात आपण अनुभव कोंबला होता. अनुभवाची जी मूळ प्रकृती होती; तिच्यात काट–छाट करून आपण तो आविष्कार साधलेला होता. अशाही प्रकारची निर्मिती रसिकांना आवडली खरी; पण आपण आतळ भिडलो नाही. समूळ व्यक्त केलेले नाही. फॉर्मची साचेबंद जाणीव आपल्या मानगुटीवर बसलेली असल्याने अनुभवाला कलात्मक न्याय दिलेला नाही याची त्याला कालां-तराने जाणीव होते आणि मग पुन्हा त्याच प्रकाराची अभिव्यक्ती करताना पूर्वी जे त्याला बाजूला सारावे लागलेले असते; त्याला प्राधान्याने तो व्यक्त करतो व त्यातूनच त्या अनुभवाचा नंतरचा आविष्कार जन्माला येतो. एकाच विषयावर दुसऱ्यांदा किंवा तिसऱ्यांदा कविता करण्याचा प्रसंग कवीला जो येतो; त्याचे हे एक महत्त्वाचे कारण आहे, असे वाटते.

**लेखकाचे वाङ्मयीन वय**

साहित्यिकाला एक वाङ्मयीन वय लाभलेले असते. या वयाचा आणि त्याच्या



अनुक्रमणिका







लौकिक वयाचा म्हटले तर संबंध असतो; म्हटला तर संबंध नसतोही. या वयाशी ते वय समांतर जाते असा नेहमीचा अनुभव नाही. ज्ञानेश्वरांचे लौकिक वय शतकाचा पाव हिस्साही नव्हते; पण वाङ्मयीन वयाची उंची इतकी होती की, त्यापुढे कुणीही आदराने झुकावे. बालकवींचे मानसिक वय म्हणजेच वाङ्मयीन वय त्यांच्या वयाबरोबर जसे वाढावे तसे वाढलेले नव्हते. या उलट रेंदाळकर, केशवसुत, बी. तांबे यांच्या वाङ्मयीन वयाची लौकिक वयाबरोबर वाढ झालेली होती, असे आपणाला जाणवते. या वाङ्मयीन वयाच्या वाढीवर व प्रगल्भतेवर त्याच्या साहित्यनिर्मितीची वाढ होत असते. या वाङ्मयीन वयाची प्रभा कवीच्या अवघ्या व्यक्तित्वावर प्रसरण पावलेली असते. त्याच्या निर्मितीवर परिणाम करीत असते. लौकिक व्यवहारातील एखादा अनुभव कवी कसा घेतो; त्याकडे कसा पाहतो अन् तो कसा व्यक्त करतो हे या व्यक्तिमत्त्वावर ठरते. साहित्यावर पुष्ट होणारें आपले आंतरिक जीवन कवी लौकिक जीवनाच्या धकाधकीत किती निष्ठेने सांभाळतो– जोपासतो अन् विकसित करतो; यावर त्याचे वाङ्मयीन वय अवलंबून असते. आणि यावर त्याचे व्यक्तिमत्त्व नि अनुभवविश्व अवलंबून असते.

अनेकदा या लौकिक वयाचा वाङ्मयीन वयासाठी उपयोगही होतो. वाङ्मयीन वयाच्या समृद्धीसाठी याचा उपयोग होत असतो. लेखक त्याचा कसा वापर करतो यावर ते अवलंबून असते. या वाङ्मयीन वयाच्या वाढीवर लौकिक वयाचा परिणाम होणार नाही, अशी भूमिका स्वीकारली तर उलट कलावंताचे व्यक्तिमत्त्व विकसित होते. त्याचे थिटेपण कमी होते. जेव्हा कवीचे वाङ्मयीन वय समृद्ध बनलेलें नसते तेव्हा त्याने व्यक्त केलेला अनुभव आणि वाङ्मयीन वयाच्या प्रगल्भतेनंतर व्यक्त केलेला अनुभव यात फरक पडतो. अप्रगल्भ वाङ्मयीन वयात व्यक्त झालेल्या अनुभवाकडे जेव्हा कवी नंतरच्या वयात पाहतो; तेव्हा त्यात त्याला उणिवा जाणवू लागतात. त्याला मर्यादा आढळतात. त्यामुळे तोच अनुभव पुन्हा व्यक्त करावा असे त्याला वाटू लागते. अन् त्यातून त्याच विषयावरील दुसरी अभिव्यक्ती निर्माण होते. आपल्या वाङ्मयीन वयाच्या समृद्धीचाही तो त्याद्वारे आविष्कार करीत असतो. टागोर आणि प्रा० फडके यांच्या जवळ जवळ एकाच विषयावर कादंबरी असूनही प्रा० फडके यांची कादंबरी टागोरांपेक्षा यामुमेळेच खूप थिटी वाटते; असे जे जाणवते त्याचे हे एक कारण असावे. टागोरांच्या समृद्ध वाङ्मयीन व्यक्तिमत्त्वामुळे कादंबरीत व्यक्त झालेला अनुभव आपणाला जीवनाचे अपूर्व आणि भेदक असे दर्शन घडवितो. म्हणून एकापेक्षा अधिक वेळा अनुभवाचा आविष्कार करण्यामागे हे वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व आणि त्याला कारणीभूत ठरणारे वाङ्मयीन वय कारणीभूत असावे, असे वाटते.

**दुहेरी भूमिकेची गल्लत**

यामधूनच आणखी एक कारण उत्पन्न होते. व्यक्तिमत्त्वाची नीट वाढ न झालेल्या कलावंताची एखादा अनुभव घेण्याची पद्धत चुकीची देखील ठरू शकते. अनुभव घेण्याची चुकीची पद्धत म्हणजे कलात्मक भूमिकेबरोबरच अन्य गोष्टींना दिलेले महत्त्व. एखाद्या सौंदर्यात्मक वस्तूकडे सौंदर्यात्मक दृष्टीने पाहण्याबरोबरच (म्हणजे त्या दृष्टीचा त्याग न करता) अन्य भूमिकाही नकळत स्वीकारणे. फुलाकडे पाहताना काव्यात्म दृष्टीने अथवा सौंदर्यात्मक दृष्टीने पाहत असतानाच तात्का-लिक उद्देशाने अथवा व्यावहारिक दृष्टी स्वीकारून पाहणे म्हणणे चुकीची पद्धत. फुलाचा गुलकंद करून विकण्याची दृष्टी स्वीकारणे आणि त्याचवेळी त्याच्या सौंदर्याने काव्यनिर्भर होणे या दोन भूमिकांची एकच गल्लत करून घेतलेला फुलाचा अनुभव म्हणजे कलात्मकदृष्ट्या घेतलेला चुकीचा अनुभव. आपल्या मराठीत अनेक कवींच्या काव्यात अशी गल्लत झालेली आपणाला अनेकदा पाहावयास मिळते. रविकिरण मंडळातील कवींच्या काव्यात तर अशा दुहेरी भूमिका घेऊन निर्माण झालेल्या कवितांची संख्या बरीच दाखविता येईल. किंबहुना प्रत्येक काल-खंडातील काव्यात याची उदाहरणे आपणाला सापडतील. एकाच कवीच्या काव्या-मध्येही दाखविता येतील. अशा दुहेरी भूमिकेमुळे कवीला आलेल्या अनुभवांवर वाङ्मयीनदृष्ट्या विपरित परिणाम होतो. कवितारूप धारण करणाऱ्या अंशाला किंवा अनुभवघटकांना गौणत्व दिले जाते; वगळले जाते किंवा अन्य भूमिकेतून स्वीकारलेल्या अनुभवामध्ये हा काव्यात्म अनुभव झाकाळून जातो. आणि त्याचे तयार झालेले रसायन कवितेतून व्यक्त केले जाते. अशी कविता रसिकांना असमा-धान देते. त्यातील अंगभूत सौंदर्य नि संवेदना मुरझून गेल्या आहेत, असे वाटते. म्हणून ही अनुभव घेण्याची चुकीची पद्धत बदलणे आवश्यक असते. काव्यनिर्मितीच्या प्रारंभ काळात ही पद्धत सदोष आहे; याची जाणीव कवीला होतेच असे नाही. आणि अशा प्रकारच्या भूमिका घेतल्याशिवाय साहित्यनिर्मिती होत नाही; असेही काहींना वाटते. ते वाटणे चूक आहे असे नाही, पण त्या दोन अनुभवांना एकात्म रूप देणे कवीला जमत नसते. कोणत्या अनुभवाला अग्रभागी ठेवावे याचीही त्याला कल्पना आलेली नसते. आणि काव्यात्म अनुभवाला अधिक अनुरूप व सुसंगत भूमिका कोणती व त्याला पूर्णतः छेद देणारी भूमिका कोणती याचाही विवेक या प्रारंभकाळात कवीला करता आलेला नसतो. नवोदित व उत्साही कवींच्या काव्यात आपणाला हे अधिक प्रमाणात जाणवते. मात्र कालांतराने या दोन भूमिका अनुभवाला व्यक्त करताना घातक ठरतात याची कवीला जाणीव होते. स्वीकारा-यचीच झाली तर त्यातली अधिक सुसंगत कोणती याचाही विवेक त्याला आलेला असतो. आपली अनुभव घेण्याची विशिष्ट 'पोज' बदलली पाहिजे; याचेही त्याला

कलात्मक भान येते. सदोष पद्धतीमुळे काव्यरूपाला कोणत्या मर्यादा पडलेल्या आहेत; नंतरच्या काळात तो तटस्थ मनाने पण काव्यात्म भूमिकेने पाहू शकतो. अन् त्यातून त्याला पुन्हा नव्या स्वरूपात हा अनुभव व्यक्त करावासा वाटतो. पूर्वीच्या चुका टाळून तो व्यक्त व्हावा असेही त्याला वाटते. त्या प्रेरणेतूनही नव्या कवितेला जन्म लाभतो. विषय तोच असला तरी त्यातला अनुभव हा एक स्वरूपी, केवलावयी आणि पूर्णत: वाङ्मयीन चैतन्याचा साक्षात्कार घडविणारा ठरतो. साहजिक एकच अनुभव कालांतराने त्याला पुन्हा व्यक्त करण्याची गरज भासते.

म्हणून अनुभवाचा बाह्य विषय एकच असला तरी कवी या विविध कारणांमुळे एकापेक्षा अधिक कविता निर्माण करतो. एकच अनुभव पुन्हा पुन्हा व्यक्त करीत असतो. तो अनुभवच स्वत:ला पूर्णरूपात, सावयव नि सर्वांगीण स्वरूपात व्यक्त कर असे कवीला आवाहन करीत असावा आणि हे आवाहन कवीला टाळता येत नसावे, असे वाटते.

(आनंदधाम, जुन्या रिमांडहोमजळ, पंढरपूर)

---

## कादंबरी

- **जगबुडी** – वामन पात्रीकर, पॉप्युलर प्रका., पं. मालवीय मार्ग, मुं., १–१९८९, ऐंशी रु.
- **ज्ञानेश्वर माऊली** – दत्ता ससे, साकेत प्रका., म. गांधीनगर, औरंगाबाद, १–१९८७, दहा रु.
- **अग्निपुष्प** – रेखा बैजल, साकेत प्रका., म. गांधीनगर, औरंगाबाद, १–१९८९, चाळीस रु.
- **महाराणी पद्मिनी** – रघुवीरसिंह राजपूत, साकेत प्रका., म. गांधीनगर, औरंगाबाद, १–१९८८, पंचावन्न रु.
- **आमदार सौभाग्यवती** – बोराडे रा. रं., साकेत प्रका., म. गांधीनगर, औरंगाबाद, १–१९८८, पस्तीस रु.
- **रानखळगी** – भीमराव वाघचेरि, साकेत प्रका., म. गांधीनगर, औरंगाबाद, १–१९८८, सत्तर रु.

---



अनुक्रमणिका

# मर्ढेकरांचे नवअध्यात्म

प्रा. सदाशिव कुळी

'काही कविता'तील मर्ढेकर मुख्यत: सामाजिक जाणिवेचे कवी आहेत. सामान्य माणसाविषयी, पीडित जनतेविषयी ते कळवळा व्यक्त करतात. ईश्वराला आळवतानाही अभागी लोकांची आण घेतात. टिर्‍या, अर्धपोट जोवर आहेत तोपर्यंत आपण समस्त नंगे आहोत असे त्यांना वाटते. कामगाराहाती करवंटी देणाऱ्या भांडवलीवृत्तीचा ते निषेध करतात. "कुणी पेरावा घाम । आणखी कुणी झोडावी । अखंड पंगत ।" अशा शोषणावर आधारलेल्या समाजव्यवस्थेविरोधी टीकेचे शस्त्र उचलतात. आणि शेवटी कुणी दगड खाऊन जगावे, कुणी आयुष्य वितळवून सोन्याचे घड ओतावे, अशी युगायुगांची व्यवस्था नाहीशी होऊन 'अशाश्वताच्या समशेरीवर शाश्वताचीही ढाल तुटेल' असा आशावाद व्यक्त करतात.

मानव्याविना असलेल्या विज्ञानाबद्दल 'जीव पैशाला पासरी । अणुयुगी' अशी खंत व्यक्त करतात. युद्ध, धार्मिक व जातीय दंगली यावर जळजळीत टीका करतात. माणुसकीच्या होळीवर सत्तेची पोळी भाजणाऱ्या प्रस्थापित नेतृत्वाविषयीची चीड, पोकळ अध्यात्म व पोषाखी संस्कृती यांचा तिरस्कार या गोष्टी मर्ढेकरांची जाणीव समाजसन्मुख आहे हे दाखवितात. तात्पर्य, 'काही कविता'त मर्ढेकरांचा दृष्टिकोन मुख्यत: मानवकेंद्री आहे.

पण मर्ढेकर हे एक संकुल व्यक्तिमत्त्व आहे. म्हणून या समाजनिष्ठ, मानवकेंद्री दृष्टिकोनाबरोबर व्यक्तिनिष्ठ अस्तित्ववादाच्या आणि काही आस्तिक्याच्या छटाही दिसतात.

## तात्त्विक दृष्टिकोन

'आणखी काही कवितां'मध्ये नवअध्यात्मवादी आणि अस्तित्वादी धारा परस्परांत मिसळून मर्ढेकरांची वैशिष्ट्यपूर्ण चिंतनात्मक कविता निर्माण झाली आहे. मुख्य म्हणजे मर्ढेकरांचा दृष्टिकोन आणखी काही कवितांमध्ये मानवकेंद्री न राहता विश्वकेंद्री बनतो. या पातळीवरून त्यांना मानव, त्याचे प्रश्न यांचे

वेगळेच दर्शन घडते. मर्ढेकरांच्या या तात्त्विक दृष्टिकोनाचे स्वरूप आणि त्याची प्रमुख वैशिष्टचे खालीलप्रमाणे जाणवतात--

अ) जीवनाच्या सम्यक् आकलनासाठी केवळ पृथ्वीकेंद्री व त्यातही केवळ मानवकेंद्री दृष्टिकोन अपुरा आहे. अंतराळसापेक्ष असा विचार आवश्यक आहे. विश्वकेंद्री दृष्टीतून मनुष्याकडे पाहिल्यावर माणसाची महती व त्याची मर्यादाही समजेल. विश्व विराट्–अनंत आणि आपण सांत आहोत हे कळेल. आपण अधिक नम्र होऊ. मानवी बुद्धीचा व कर्तृत्वाचा अहंकार गळून पडेल. विश्वाची गूढता, अनाकलनीयता कळल्याने, त्यातील रहस्यमय काळोखाचे दर्शन झाल्याने, मृत्यू, विनाश ही जीवनाची दुसरी अंधारी बाजू कळल्याने आपला दृष्टिकोन अधिक सम्यक् ठरेल. सर्व विश्व म्हणजे तळहातावरील आवळ्याप्रमाणे असून लख्ख सूर्य-प्रकाशात आपल्याला ते दिसतें आहे, समजले आहे हा मानवाचा आविर्भाव नाहीसा होईल.

ब) जीवनाचा प्रत्यय हा आत्मनिष्ठ व भावनात्मक असतो. तो मुख्यत: भावना-त्मक व गौणत: तर्कनिष्ठ असतो. म्हणून विचार किंवा तर्काने जीवनातील गोष्टींचे कार्यकारण संबंध समजून घेता येतील, बिनचूक उत्तरेही शोधता येतील. पण त्या गोष्टीवर आपल्या अस्तित्वाची भावमुद्रा, संवेदनमुद्रा उमटल्याशिवाय ती आपल्या अनुभवाचा घटक बनत नाही. व्यक्तिमत्त्वात विरघळून जात नाही. असे आपण जगतो तेव्हा आपले आपण जगत असतो उत्कट अस्तित्वानिशी जगतो. तर्काच्या पातळीवर जगतो तेव्हा कोरडे, रुक्ष जगतो या पातळीवर कदाचित सर्वज्ञपणही लाभेल. पण आपण आपल्या 'स्व' ला हृदयाच्या आंतर हृदयाला पारखे होऊ.

क) जीवनप्रत्यय हा आत्मनिष्ठ व भावनात्मक असतो. तसेच जीवन हे अनेक पातळ्यांवरून जगता येते. अनेक कोनातून त्याकडे पाहता येते. या दृष्टीने जाणिवेची संपन्नता ही जीवनाचीही संपन्नता असते.

जीवन हे अत्यंत व्यामिश्र आणि गुंतागुंतीचे आहे. म्हणून ते कोणत्याही एका विचारसरणीच्या किंवा तत्त्वज्ञानाच्या व्यूहात बसू शकत नाही. कारण विचार-सरणीत किंवा तत्त्वज्ञानात तार्किक सुसंगती आवश्यक असते; विसंगतीला तेथे वाव नसतो. याउलट जीवनप्रत्ययात अनेक विसंगत गोष्टी एकत्र नांदतात. कधीकधी तर ही विसंगती तथाकथित सुसंगतीपेक्षा अधिक अर्थपूर्ण असू शकते. म्हणून कितीही व्यापक तात्त्विक व्यूहातून पाहिले तरी जीवनाचे एकांगी रूप दिसेल; सर्वांगीण नव्हे. (मानवी इतिहासातील सर्वात व्यापक आणि प्रगल्भ अशा मार्क्सवादी तत्त्व-ज्ञानालाहीं हे विश्वरहस्य कळू शकत नाही; मार्क्सवाद हा एक जीवनमार्ग आहे; खुद्द जीवनालाच तो पर्याय नव्हें.)

ड) मानवी जीवनाचे अंतिम ध्येय कोणते ? समजा, भांडवलशाही नष्ट झाली;

समाजवाद आला; मानवाच्या भौतिक गरजा पूर्ण झाल्या; मग त्याचे ध्येय कोणते राहील? मानवाचे सर्वोच्च सुख व महान दुःख कशात आहे? आणि मुख्य म्हणजे हे मानवी जीवन आहे तरी काय? त्याचा अर्थ काय? अस्तित्वाचे स्वरूप आणि अर्थ काय? मानवाचे विश्वात स्थान कोणते? त्याचे विश्वाशी नाते कोणते? त्याचे स्वतःशी नाते कोणते?

या सर्व प्रश्नांनी मर्ढेकर व्याकुळ झालेले आहेत. या प्रश्नांची उत्तरे मर्ढेकरांना सापडली नसतील; पण त्यांनी जीवनविषयक मूलभूत प्रश्न उपस्थित केले आहेत. म्हणून त्यांची कविता श्रेष्ठ आहे.

मर्ढेकरांच्या या मूल प्रश्नांचा काव्यगत आविष्कार कसा झाला तें पाहू.

**मर्ढेकरांच्या संज्ञेचे क्षेत्र**

मर्ढेकरांच्या संज्ञेचे रिंगण ज्ञान, मृत्यू, आदिम प्रेरणा व वासना, विश्वाची गूढता व अंतिम सत्याचा शोध या मूलप्रश्नांनी व्यापलेले आहे.

बुद्धीच्या शस्त्राने या प्रश्नांना छेदता येईल; ज्ञान-विज्ञानाच्या बळावर विश्वाचे कोडे उकलता येईल, असा मनुष्याचा अहंकार आहे; पण मर्ढेकरांचा आत्मप्रत्यय वेगळा आहे. बुद्धीच्या प्रकाशात त्यांना अंधत्वाचे काटे दिसतात. ज्ञानाने दृष्टी अमर्याद फाकत नाही, तर ती कुंपणाप्रमाणे सीमित होते. मुख्य म्हणजे विज्ञान महंत असले आणि भावनेने संत असले तरी जन्ममृत्यूची खंत टळत नाही.

आज पाहिले मरण । गेला भांबावून प्राण
माझ्या ज्ञानाचे कुंपण । स्मशानात.

जीवनाच्या काळोख्या वाटेवर एक एक जिवलग तुटत जातात. मायमाऊली गेल्यावर बाप सावली देतो. त्याच्यानंतर बहीण-बाईल धीर देतात; आणि आता हीसुद्धा जातील, तेव्हा काळोख्या वाटेवर या साऱ्यांचा सुगावा आंधळ्याला कसा लागेल असा आर्त प्रश्न मर्ढेकर विचारतात.

या अफाट विश्वचक्रात मानवी रक्ताची नाती, प्रेम यांना काही अर्थ आहे का? मग अर्थ काय बेंबीचा विश्वचक्री? आणि असेल तर तो इतका क्षणभंगुर अन् वेदनादायी का? मानवी देहाचे व जीवनाचे सुंदर बांधकाम हे नश्वरतेचे मखर किंवा मिथ्यत्वाचे महाद्वार असेल तर चिरंतनाचा पूत असलेली अद्‌भूत इमारत कोठे आहे?

ज्या संज्ञेच्या जोरावर हे प्रश्न सोडवावेत तीच ज्ञान आणि वासना यांच्या झुंजीचे रिंगण बनली आहे.

शिवलिंग माझे लिंग । हेच अशांतीचे बिंग
ज्यांच्या झुंजे संज्ञारिंग । व्यापिले गा

येथे आदिम प्रेरणा, संस्कृती, ज्ञात–अज्ञात, मर्त्यांश–अमर्त्यांश यांच्या खेचीत मनाचा लुंगासुंगा फकीर किंचाळतो आहे. सत्याचे सुपीक विश्वातून खेचून आणणाऱ्या मानवाच्या पृथ्वीवर घासभर उष्टया अन्नाला कोणी महाग होतो. कांदेवाडीच्या नाक्यावर पोटाची खळगी भरण्यासाठी 'उद्याच्या माऊलींना' गिऱ्हाइकाची वाट पहावी लागते. इकडे भुकंपाचा धक्का तर पलिकडे युद्धाचे नगारे वाजताहेत; जुन्या शवांवर नवे निखारे ठेवले जाताहेत; आणि फत्तरातला देव आपली फत्ते कुठे झाली ते पाहतो आहे!

फिरता पिसाट पिसाट या अफाट अंतरिक्षात सूर्य ग्रहमालेचे चऱ्हाट फकतो. अवकाशातील पिळावर ग्रहगोलांच्या गाठी बसतात.

कधी जन्मली पृथ्वी ? जमल्या निळ्या वायूच्या लगडी सलग कधी ?

कधी अन् जडतेला त्या मनामनाचे आले पोत ?

या संज्ञेमधून अनुभूतींचा वाफा कसा फुलला ? या निळ्या तेजातून काय पाहावे आणि कुणाला शोधावे ? या सचेतन प्रश्नांची आच दळभद्र्याच्या अचेतन पायाखाली लागली आहे.

जमिनीला वाटते आपणच धावतो, पण पळणारा कुणी दुसराच असतो. रेताडावरील ताडाला आपल्या शेंड्याचाच गर्व असतो. विशाल आकाशात तरणाऱ्या विमानाला अडीच पायांची ऐट असते. त्याप्रमाणे विश्वचक्रातील एक क्षुद्र खिळा असलेल्या मानवाच्या सामर्थ्याचा डंका फुकाचा आहे–

नळीतील जग नळीत जगते
उगाच रुसवा रसायनाचा
उगाच दावा मानवतेचा
आणिक डंका सामर्थ्याचा !

अंतिम सत्याचा शोध घेण्यासाठी निघालेल्या कवीची स्थिती काळ्या हवेतून काळोखात उड्डाण घेणाऱ्या काळ्या विमानाप्रमाणे होते.

जेथे जातो तेथे । मी माझा सांगाती
डोळ्यांच्याच भिंती । झाल्या ऐशा

कवि निराश, अगतिक व भयाकुल होऊन म्हणतो–

एकला असुन मनी दोन झालो
आता मात्र भ्यालो मला मीच.

एका वेदनामय अस्तित्ववादी जाणिवेतून मर्ढेकर जीवनविषयक या मूलगामी प्रश्नांना भिडले आहेत.

'त्याच्या' कृपेची सळई आपल्या बुब्बुळलेल्या खाचातून जावी, 'त्याची' दगडी

भिवई चळावी, आपल्या जीवनाच्या तारांचा स्वीच जिच्या हाताखाली आहे त्या 'भव्य भितीचे' दर्शन व्हावे, 'त्याचे' नख आपल्या गळचाला लागावे म्हणून मर्ढेकरांनी आयुष्यभर आकांत मांडलेला आहे.

### भयमिश्रित नवअध्यात्माची तृष्णा

पारंपरिक उत्तरे मर्ढेकरांनाही पाठ आहेत. धर्म, ईश्वर, रूढ अध्यात्म यांचा आधार त्यांनाही घेता येऊ शकतो. संवेदना बधीर होऊन निःशंकपणे सुखाच्या आणि प्रश्नशून्यतेच्या सूर्यप्रकाशात जगता येऊ शकते; पण मर्ढेकरप्रस्थापित धर्म, ईश्वर व पोकळ अध्यात्म यांच्याकडून मिळणारी टिनपट व चोमडी, भुसा भरलेली 'रेडिमेड' उत्तरे दूर सारतात. स्वच्छ, कोऱ्या नजरेने, तडफडत्या हृदयाने या गंभीर प्रश्नांना सामोरे जातात. एका वरच्या पातळीवरील अज्ञाताच्या ओढीने, एका नव्या आध्यात्मिक तहानेने अस्तित्वाची अंधारयात्रा सुरू करतात. ज्या विलक्षण तळमळीने व उत्कट भावनांच्या व्यामिश्रतेने मर्ढेकरांनी ही भयमिश्रित नव–अध्यात्म तहान व्यक्त केली आहे, ते मराठी काव्यातील अमोल लेणे आहे ! अस्तित्ववादी, नवअध्यात्मवादी आणि विज्ञानवादी अशा संमिश्र जाणिवेने साकार झालेली ही मूलभूत मानव्याची व्यथा, ही वेदनामय मानुषता मर्ढेकरांना एका बाजूने हॉपकिन्स, इलियट या पाश्चात्य नवकवींचा समानधर्मा बनविते तर दुसऱ्या बाजूने संत साहित्याशी नाते सांगून दुसरा तुकया बनविते !

(५२ अ, कर्नाटक संघासमोर, गोकुळ पेठ, नागपूर ४४००१०)

---

## कथा

- **प्रतीती** – सानिया, मौज प्रका., खटाववाडी, मुंबई, १–१९८९, चौसष्ट रु.
- **ऑर्फियस** – दिलीप पु. चित्रे, साकेत प्रका., म. गांधीनगर, औरंगाबाद, २–१९८८, चाळीस रु.
- **गोष्ट एका कपडयाच्या जोडीची** – बाबा भांड, साकेत प्रका., म. गांधीनगर, औरंगाबाद, १–१९८८, सात रु.
- **गोष्ट एका गावाची** – बाबा भांड, साकेत प्रका., म. गांधीनगर, औरंगाबाद, १–१९८७, सात रु.
- **कायापालट** – बाबा भांड, साकेत प्रका., म. गांधीनगर, औरंगाबाद, १–१९८८, पस्तीस रु.

---

# काव्याची भाषा

आशा राजवाडे

काव्य म्हणजे काय ? एक भाषेचे रसायन ? आणि मग या काव्यभाषारसायनाचे गुण कोणते ? काही दर्जेदार काव्याच्या नमुन्यांचा सूक्ष्म अभ्यास केल्यास कदाचित आपल्याला हे गुण सापडतील. आणि मग ते इतर काव्यात आपल्याला शोधता येतील, मग आपल्याला एखादी कविता अधिक चांगल्या प्रकारे अनुभवता येईल; आपण ती अधिक वेगवेगळ्या थरांवर ग्रहण करू शकू; अधिक चांगल्या प्रकारे दुसऱ्यांना सांगू शकू. कदाचित्.

आईच्या तोंडून लहानपणी ऐकलेल्या, रामाच्या वनवासाला जाण्याच्या प्रसंगावरील एका स्त्रीगीतातील ओळी आठवतात. त्या ओळी काव्यभाषेचे एक उत्कृष्ट उदाहरण आहेत, असे आज जाणवते. ओळी पुढीलप्रमाणे आहेत :

"तो सुंदर रघुवीर शरधर मृदुवचनी
नच धाडी त्या वनी, कैकयी, नच धाडी त्या वनी
वनासी जाता राम निघाले
मातेचरणी वंदन केले
धरणीवर नृप मूर्छित पडले
हा भवसागरतरणी, नच धाडी त्या वनी—"

( एखादा शब्द आठवणीतून गळला असण्याची शक्यता आहे. ) आता यातील पहिल्या दोन ओळींची तपशीलवार छाननी करू. त्यातील 'र' चा पुनरुच्चार तर वेधक आहेच, पण 'शरधर' व 'मृदुवचन' या दोन शब्दांच्या सान्निध्यातून विरोधव्यत्यासांचे अतिशय सुंदर पॅटर्न निघते. रामाजवळ शर आहेत, शरनैपुण्य आहे, रामाचे शरनैपुण्य जसे सूचित होते, तसेच त्याची दक्षता, सज्जता, सावधानताही सूचित होते. शब्दांना शराची उपमा कवींनी अनंतकाळापासून दिलेली आहे. म्हणून लगेच हे सांगितले जाते की, हे शर शब्दांचे नाहीत. शब्दाने तो कुणाला दुखविणारा नाही, शरधर तर खराच पण तरीही मृदुवचनी. 'शरधर' या शब्दा-

तून अर्थांची—वाच्यार्थांची व ध्वन्यर्थांची जी वलयं बाहेर पडतात, त्यांना सीमित करण्याचं काम ' मृदुवचनी ' हा पुढचा शब्द करतो.

हाती जर शर धरला आहे, तरी ' वचनी ' मात्र तो मृदू आहे, असे सुंदर विरोधालंकरण साधले आहे. शराचा भेदकपणा, तीक्ष्णपणा, जखमी करण्याची शक्ती, टोकदारपणा एकीकडे आणि दुसरीकडे रामाच्या वचनाचा ( व पर्यायाने व्यक्तित्वाचा ) मृदुपणा, या दोन परस्परविरोधी गुणांचा सुंदर तोल साधला आहे. कोण अनामिक सहजप्रतिभेतून या ओळी लिहून गेला कोण जाणे ! पहिल्या ओळीत ' र ' अक्षरावर जोर असणारी संस्कृतप्रचुर शब्दरचना तर दुसऱ्या ओळीत केवळ दोन अक्षरी, साधे, रोजच्या व्यवहारातील शब्द वापरले आहेत. पहिल्या ओळीतील ' रघुवीर ', ' शरधर ', ' मृदुवचनी ' हे सर्व शब्द समासाधिष्ठित आहेत. जेवढ्या सहजपणे हे सामासिक शब्द वापरलेले आहेत, तेवढ्याच सहजपणे पुढच्या ओळीत, नित्याच्या वापरातले शब्द. अगदी ' धाडी ' सारखा साधा ढोबळ, ( बोलीभाषेतून आज नाहीसा होऊ पहाणारा ) शब्द. ' नच धाडी त्या वनी ' मधील काकुळती खरोखरीच शब्दांनीच व्यक्त केलेली आहे.

### विरोधसूत्राची जादू

वियोग, दुःख, वेदना, काकुळती, असहाय्यता इ. सर्व विविध भावनांचा आविष्कार तीन–चार साध्या शब्दांतून करून दाखवला आहे. हीच काव्यभाषेची चमत्कृती काय ? कोणत्याही कोषात ही भाषा सापडणारी नाही. दुसऱ्या ओळीतील ' कैकयी ' या शब्दावर थोडासा विराम घेऊन ' नच धाडी त्या वनी ' अशी पुनरुक्ती आहे. पुनरुक्ती हे काव्यभाषेचे एक वैशिष्ट्य आहेच हे नमूद करण्याची जरूर नाही. मातापित्यांच्या प्रतिक्रियांमधील भेद, नृपाचे नृपत्व आणि असहाय्यता त्यातून आलेली मूर्च्छा यातसुद्धा सतत विरोधाचे सूत्र खेळवले आहे. अशाच प्रकारचे विरोधसूत्र ' सुख पाहता जवापाडे, दुःख पर्वताएवढे ' किंवा ' काटा, माझ्या पायी रुतला , ' शूळ तुझ्या उरी का ' अशा सर्वपरिचित काव्यपंक्तीतही अनुभवास येतो. यातील विरोध सोपान पहा : जव/पर्वत, सुख/दुःख, किंवा काटा, शूळ / कोमल ऊर, पाय / ऊर, मी / तू अशा अनेक विरोधसंबंधांवर आधारलेल्या जोड्या निघत जातात. शिवाय कविवर्य तांब्यांच्या ओळीत एका ठिकाणी जखम व तिची वेदना मात्र दुसऱ्या ठिकाणी अशी अनन्यसाधारण परिस्थिती ध्वनित केलेली आहे आणि या परिस्थितीतून दोन माणसांच्या मनांची, संवेदनांची, अनुभूतीची एकता व्यंजनेने सुचवली आहे. तर तुकारामांच्या ओळीत मानवी जीवनातील सुखदुःखाचे व्यस्त प्रमाण व्यावहारिक दृष्टान्ताच्या साह्याने दाखवून जीवनाच्या दुःखमयतेवर भाष्य केले आहे.

## पुनरुच्चार पुनरुक्ती

काव्यभाषेच्या अभ्यासाला बालकवींच्या ओळींसारखे सुस्पष्ट उदाहरण घेण्याचा मोह आवरत नाही, या ओळी 'फुलराणी'च्या सुरुवातीच्या ओळी आहेत :

हिरवे हिरवे गार गालिचे
हरित तृणाच्या मखमालीचे
त्या सुंदर मखमालीवरती
फुलराणी ही खेळत होती

या ओळींमध्ये सापडणाऱ्या चमत्कृतींचा अभ्यास आनंददायी ठरेल. 'हिरवे हिरवे' यात पुनरुक्तीचे सर्वप्रचलित गमक वापरले आहे. 'हिरवे' या शब्दातच 'हिरवे रावे' थोडेसें अध्याहृत आहेतच. हिरवेपणाची एक दृक्प्रतिमा डोळयां-समोरून निश्चितच तरळून जाते. 'हिरवे हिरवे गार' या तीन शब्दांमधून दोन संवेदनांचे संमिश्रण अनुभवास येते. या भाषागुणाला Synaesthesia असा शब्द इंग्रजीत वापरला जातो. मराठीत 'संमिश्र संवेदन' असे म्हणता येईल. एक दृक् अनुभव व दुसरा स्पर्शानुभव असे दोन वेगवेगळे अनुभव एकत्रपणे जाणवून देण्याचे सामर्थ्य या शब्दात आहे, शिवाय 'र', 'ल', 'ग', 'म' या अक्षरांच्या पुनरु-च्चाराची एक नक्षीच या चार ओळीत विणलेली आहे. ही भाषा प्रासयुक्त आहे. पुनरुच्चारांमुळे साधेच शब्द अर्थाबरोबरच, ध्वनीच्या साधर्म्यरेखांनीसुद्धा एक-मेकांबरोबर बांधले गेले आहेत. त्यानंतर येणारी दुसरी ओळ : 'हरिततृणाच्या मखमालीचे'. हरिततृणाच्या मखमालीमध्ये काव्यभाषेचा एक महत्त्वाचा विशेष म्हणजे रूपक हे तर सापडतेच शिवाय, विविध विरोध, व्यत्यास, यांच्याद्वारा साधलेला समतोल प्रत्ययास येतो. 'हिरवे हिरवे' या पहिल्या ओळीतील रंगछटेचा व 'ह' व 'र' या अक्षरांचा पुनरुच्चार 'हरित' मध्ये केलेला आहेच, त्याखेरीज 'हिरवा' या बोली भाषेतील व मराठी भाषेतील शब्दासाठी 'हरित' हे संस्कृत भाषेतील रूप प्रतिशब्द म्हणून वापरून पुनरुक्ती साधली पण आहे आणि टाळली पण आहे. 'हरित' हा शब्द आपल्यापाठोपाठ 'तृण' या दुसऱ्या संस्कृत शब्दाला घेऊन येतो. 'तृण'मध्ये तृणाचे साधेपण, लहानपण, निसर्गदत्तता, रग, मुलायम-पणा, विपुल उपलब्धी हे सगळे अभिप्रेत आहे. तृण व (मखमाली) गालिचे यांच्या साम्यविरोधाचा जो सोपान आपल्या डोळयासमोर उभा राहतो तो असा :

| | |
|---|---|
| तृण | (मखमाली) गालिचे |
| निसर्गदत्त | मनुष्यनिर्मित |
| सर्वत्र विपुलतेने सापडणारे | क्वचित सापडणारे |
| साधे | गुंतागुंतीचे |

| | |
|---|---|
| कस्पटासमान | श्रीमंती, राजेशाही, |
| मैलोगणती पसरलेले, | सीमित |
| मृदुस्पर्शी | मृदुस्पर्शी |
| संस्कृतातून आलेला शब्द | मराठी, उर्दूचा स्पर्श झालेला शब्द. |

'हरिततृणाच्या मखमालीचे' या दोन शब्दांच्या सान्निध्यात वरील विरोधांचे जे ध्वन्यर्थ प्रत्ययाला येतात तेच त्या शब्दांना त्यांचे घन अर्थ देतात या परस्पर-संबंधातून निर्माण झालेल्या अर्थांची एक मालिकाच त्यांच्यामागे उभी राहते. विस्मयाची प्रचीती येथे आल्याशिवाय राहत नाही. पहिली ओळ व दुसरी ओळ यांच्या रचना–आकृतीही खूप संबंधांनी एकमेकांशी जडलेल्या व जोडलेल्या आहेत.

| | | | |
|---|---|---|---|
| १ २ ३ | ४ ५ ६ | ७ ८ | ९ १० ११ |
| हिरवे | हिरवे | गार | गालीचे |
| हरित | तृणाच्या | मख | मालीचे |

दोन्ही ओळीतील पहिले शब्द हिरवे = हरित. दोन्ही शब्द वेगळे, त्यांचे ध्वन्यर्थ थोडेसे वेगळे पण ढोबळ अर्थ एकच. दुसऱ्या शब्दाच्या वेळी मात्र पहिल्या ओळीतील 'हिरवे'ला परत 'हरित'ची पुनरुक्ती नाही. एक वेगळीच संकल्पना 'तृण' या शब्दांद्वारे तिथे योजली आहे. 'गार गालिचे'ला 'मखमाली'चे हे शब्द पुढे येतात गालिचे व – मालीचे यात तीन अक्षरांचे स्वरांकित व दोन अक्षरांचे वर्णासह असे यमक भूल पाडणारें आहे. नंतर दुसऱ्या ओळीतील 'मखमल' हा शब्द घेऊन कवी तिसऱ्या ओळीत उतरलो. मखमल म्हटल्यावर राजस्पर्श आलाच. मखमालीच्या गालीचावर कोण? तर फुलराणी. एका साध्याशा रानफुलांचे कविस्पर्शाने 'फुल-राणीत' रूपांतर होते. एका विलक्षण कविकल्पनेचा विलास इथे सापडतो. (ही कल्पना पुढच्या फुलराणी–रविकर विवाहाच्या विस्मयकारक कल्पनेची निव्वळ सुरुवात आहे.) 'फुलराणी' ही काही कोणी दिमाखात विराजमान झालेली राज-कन्या नव्हे, तर साधीभोळी, निष्पाप, निरागस बालिका. ती काय करत होती तर 'खेळत होती', 'खेळत होती' या अतिशय साध्या रोजच्या वापरातील शब्दातून फुलराणीचे साधेपण, बालिशपण सुचवले जाते.

'मखमल' या शब्दाचे सामान्यरूप 'मखमलीचे न करता 'मखमालीच' असे केले आहे. त्यामुळे काव्यपंक्तींचा धावता ठेका तर कायम राहतोच, शिवाय या 'मा'च्या आघाताने शब्दाला एक वेगळेपणाचा हिंदोळाही मिळतो. 'हिरवे हिरवे' कडून 'गार'कडे, 'गार'कडून, 'गालिचे'कडे, 'गालिचे'कडून 'मखमाली'कडे, 'मखमाली'कडून 'फुलराणी' कडे अशा तऱ्हेनें एका शब्दाचे बोट धरून त्या

अनुषंगाने ( association ) सहजच वाढत जाणारी एक साखळी पण आपल्या प्रत्ययाला येते.

कवितेत योजलेल्या शब्दांची अन्योन्यता, परस्परसापेक्षता, विरोधसाम्यसंबंध, रूपके इत्यादी गुणांनी काव्यभाषा तयार होत असते. ही भाषा अनुभवांच्या– बौद्धिक, भावनिक ऐंद्रिय अनुभवांच्या – सरमिसळीचे एक अनोखे रसायन असते. शिवाय काव्यभाषा ही काव्यभाषेतूनसुद्धा निघत असते. आधीच्या काळातील काव्याने, भाषेच्या शतकानुशतके चालत आलेल्या अर्थवाहित्वाने अर्थांचे जे न्यास, संस्कार, भाषेवर झालेले असतात. त्यामुळे त्या शब्दांना विविध पैलू प्राप्त झालेले असतात. ध्वन्यर्थांचे तसेच वाच्यार्थांचेसुद्धा असे पैलूदार शब्द एकमेकांशेजारी जडवून, त्यांच्या अन्योन्य संबंधातून अगणित अर्थ सूचित केले जातात. प्रकाशकिरण पडल्याने रत्न चमकून उठावे त्याप्रमाणे दोन शब्द एकमेकांशेजारी ठेवल्याने निव्वळ त्या दोन शब्दांच्या अर्थांच्या पलीकडचे अनेक अर्थ निघत जातात. हे अर्थ शोधण्याची, जाणण्याची, सांभाळण्याची तपस्या काव्यजिज्ञासूंना करावयाची असते.

(इर्विन हॉस्पिटलजवळ, कॅम्प २, अमरावती)

---

## साभार स्वीकार

### काव्य

- **उषा** – सं. पां. पाटील, सतीश शीलवंत, सदाशिव पेठ, पुणे, १–१९८८, एकतीस रुपये पन्नास पैसे.
- **कातरवेळ** – तुकाराम पाटील, प्रपंच प्रका., शनिवार पेठ, पुणे १–१९८८, पंधरा रु.
- **कलिका** – तुकाराम पाटील, दिलीप गवळी, सागरमाळ, कोल्हापूर ८, १–१९८७, वीस रु.
- **आता होऊन जाऊ द्या** – यशवंत लोकनाथ, मुक्तछंद प्रका., चंद्रपूर, १–१९८९, पंचवीस रु.
- **रग्रंथ** – र. म. शेजवलकर, प्रका. सुनीता शेजवलकर, भास्कर कॉलनी, ठाणे, १–१९८९, तीस रु.
- **बालबोधमेव्यातील कुसुमाग्रज** – पद्मा मोरजे, पॉप्युलर प्रका., मालवीय मार्ग, ताडदेव मुंबई ३४–१९८९, पंधरा रु.
- **पारंब्या** – कुमार अनिल, भलरी प्रका., मुंबई, १–१९८९, सात रु.

---

अनुक्रमणिका

| | मूळ किंमत | सवलतीने |
|---|---|---|
| मॉडर्न डिक्शनरी, (इंग्लिश-इंग्लिश-मराठी) | १२०–०० | ९६–०० |
| श्रीमुद्गलपुराण खंड १ व २ (ओवीबद्ध), सी. म. देसाई | १२०–०० | ९६–०० |
| श्रीगुरुचरित्र कथामृत, कामत, घैसास | १२०–०० | ९६–०० |
| श्रीसमर्थ ग्रंथ भांडार, ल. रा. पांगारकर | १२५–०० | १००–०० |
| श्रीसमर्थावतार, शंकर श्रीकृष्ण देव | १२५–०० | १००–०० |
| महाराष्ट्र–गीत गाथा, दि. मा. प्रभुदेसाई | १२५–०० | १००–०० |
| पातांजल योगदर्शन, कृ. के. कोल्हटकर | १४०–०० | ११२–०० |
| सार्थ श्रीज्ञानेश्वरी, बा. अ. भिडे | १४०–०० | ११२–०० |
| सार्थ श्रीतुकारामाची गाथा, जोगमहाराज | १६०–०० | १२८–०० |
| सार्थ एकनाथी भागवत, आठल्ये–कामत | १६०–०० | १२८–०० |
| सुबोध भृगुसंहिता, फलित व कुंडलीखंड | १८०–०० | १४४–०० |
| ३० वर्षांची ढवळे बृहत् पंचांगे, (१९५८ ते १९८६) | २४०–०० | १८०–०० |
| दिव्यामृत धारा खंड १, २ व ३, आर्वीकर | २४०–०० | १८२–०० |
| स्टॅण्डर्ड डिक्शनरी, (मराठी-इंग्रजी-मराठी) खंड १ सरकोदम, २ व ३ खानोलकर | ४००–०० | १८०–०० |

कमीत कमी २०० रुपयांची पुस्तके घेतल्यास २५ टक्के कमिशन !
अधिक कोणतीही ३० रुपयांची पुस्तके भेट देण्यात येतील.
ही योजना १४ ऑक्टोबर ८९ पर्यंतच आहे.

---

# मन आणि मनाचे श्लोक

डॉ. सुशीला पाटील

प्राचीन मराठी संतपरंपरेत समर्थ रामदासांचे स्थान वैशिष्टयपूर्ण आहे. समर्थ-वाङ्मयात 'मनाचे श्लोक' विशेष लक्षवेधी आहेत. आजवर अनेकांनी मनाशी संवाद साधला आहे. माणसाचे मन ही एक अजब चीज आहे. ज्याला मन आहे तो मानव अशी 'मानव' या शब्दाची एक व्युत्पत्ती सांगितली जाते. त्यानुसार मन हे माणसाचे इतर प्राणिमात्रांहून एक लक्षणीय वैशिष्टय ठरते. आपल्या पूर्वजांनी मनाचें सामर्थ्य पुरते ओळखले होते. 'मन एव मनुष्याणां कारणं बन्धमोक्षयो: ।' म्हणजे मनामुळेच आपण बंधनात पडणार आणि मनामुळेच आपण बंधनातून सुटणार असे त्याचे दुधारी महत्त्व त्यांनी लक्षात घेतले होते. त्यामुळे मन:शक्तीचा विधायक उपयोग करून घेण्यावर प्राचीनांनी भर दिला. त्याकरता मनाची मन-धरणी त्यांनी केली. माणूस मनानेच कुठेतरी गुंतत जातो आणि मनानेच कुठूनतरी निखळून पडतो. कुठेतरी गुरफटणे आणि कुठूनतरी तुटणे हे मानवी जीवनात—मनाच्या राज्यात सतत सुरू असते. मन ही एक शक्ती आहे. कोणतीही शक्ती म्हटली की तिचा वापर आपण कसा करतो यावर तिची उपयोगिता अवलंबून असते. कोणत्याही शक्तीचा वापर आपण चांगल्या व वाईट अशा दोन्ही कामां-करिता करीत असतो — करू शकतो. एकच शक्ती परस्परविरुद्ध परिणामाकरताही वापरता येते. विद्युत्शक्ती एकीकडे 'गिझर'मध्ये पाणी गरम करते तर 'रेफ्रिजरेटर'मध्ये तीच शक्ती पाणी थंड करते. विजेमुळे आपण पाण्याचा बर्फ करू शकतो आणि वाफही करू शकतो. विद्युत् उपकरणांच्या साह्याने एखादे कठीण 'ऑपरेशन' होऊन मानवास नवजीवन मिळू शकते. अन् चुकून विजेचा धक्का बसला तर माणूस मरूही शकतो. विजेसारखी स्वभावाने अचेतन असणारी शक्ती-देखील आपण अशी उपयुक्त आणि घातक रूपात अनुभवू शकतो. आपली मानस-शक्ती तर स्वभावत:च सचेतन असते. चैतन्यमयतेमुळे ती चंचल असते. विजचे बटन दाबणे तरी माणसाच्या हाती असते. पण माणसाचे मन चंचलत्वामुळे — सचेतनत्वामुळे कुठे अन् कसे जाईल ते आपणास सांगता येत नाही. त्यामुळेच

मनावर नियंत्रण ठेवणे विलक्षण जड जाते. पण विवेक सतत जागता ठेवून या मनाचा विधायक वापर केला तर याच मनाच्या साह्याने जीवनाचे अंतिम ध्येय-देखील सहजी गाठता येते. पुरातन ऋषीमुनींनी या मनाच्याच साह्याने मोक्षदेखील मिळवला आहे. म्हणूनच संत–सज्जनांनी 'मन करा रे प्रसन्न । सर्व सिद्धींचे कारण ।' असा आदेश दिला आहे.

श्रीकृष्णाचे गीतेतील समत्वयोगाचे विवेचन अर्जुनाला आवडते, पटते. पण मनाच्या चंचलत्वामुळे हा समत्वयोग साधेल की नाही ही शंका त्याला येते. पण हे चंचल मन अभ्यास व वैराग्य या दोन उपायांनी काबूत आणता येते असे म्हणून श्रीकृष्णाने अर्जुनाला नि:शंक केले आहे.

## वैराग्य आणि अभ्यास

समर्थ रामदासांनी देखील 'मनाच्या श्लोका'त आपल्या मनाला अभ्यासाचे अन् वैराग्याचेच धडे दिले आहेत. मनाकडून असणाऱ्या अपेक्षा त्यांनी या श्लोकांत बोलून दाखविल्या आहेत. मनाची शक्ती सत् व असत् अशा दोन्ही रूपात असलेली त्यांनी ओळखली आहे. त्यापैकी मनाच्या सत्‌शक्तीला त्यांनी हाताशी धरले आहे. 'मना सज्जना' अशी साद घालून त्यांनी आपल्या श्रेयासाठी मनाशी हृदयसंवाद साधला आहे.

मनाच्या श्लोकांना रामदास स्वत: 'मनाची शते' म्हणतात. 'मनोबोध' म्हणूनही हे श्लोक ओळखले जातात. यात समर्थांचे अनेक वर्षांचे पारमार्थिक चिंतन आणि सामाजिक अवलोकन यांचा परिपाक उतरला आहे. म्हणूनच या रचनेला 'अपौरुषेय वाणी' असे म्हणून वेदांचा दर्जाही जाणकारांकडून दिला जातो. कुणाला या श्लोकांचे उपनिषदांशी साम्य दिसते. त्यामुळे 'दासोपनिषद्' या शब्दात ते या श्लोकांचा गौरव करतात. या दोनशे पाच श्लोकांना अशी भिन्न भिन्न नावे असली तरी 'मनाचे श्लोक' म्हणूनच ते सर्वप्रसिद्ध आहेत.

या श्लोकांची रचना रामनवमीच्या उत्सवासाठी साधनसामग्री मिळावी या उद्देशाने झाली अशी एक आख्यायिका हनुमंतस्वामीच्या बखरीत आली आहे. चाफळ येथे समर्थांनी सुरू केलेल्या रामजन्मोत्सवाकरता शिवाजी महाराजांकडून शिधासामग्री येत असे. एका वर्षी मात्र उत्सव जवळ येऊन ठेपला तरी शिधासामग्री आली नाही. शिष्यवर्ग अस्वस्थ झाला. समर्थांनी या संदर्भात शिवाजी महाराजांना लिहावे अशी विनंती शिष्यांनी त्यांना केली. उत्सवाकरता का होईना पण याचना करणे समर्थांना प्रशस्त वाटले नाही. पण प्राप्त परिस्थितीच्या विचाराने तेही अस्वस्थ झाले होते. अशा अस्वस्थ मन:स्थितीत या श्लोकांची रचना झाली. त्यानंतर समर्थ मठातून निघून गेले ते गुढीपाडव्यालाच परतले. त्यांच्या अनुपस्थि-

तीतच शिष्यांनी यापैकी एकेक श्लोक म्हणून 'जयजयरघुवीरसमर्थ' अशी ललकारी देऊन भिक्षा मागावी असे कल्याण स्वामींनी शिष्यांना सांगितले. योगायोग म्हणा वा श्लोकांचा प्रभाव म्हणा पण भरपूर भिक्षा गोळा झाली. उत्सव उत्तम प्रकारे पार पडला अशी आख्यायिका आहे.

पण या श्लोकांचे अंतरंग तपासले तर केवळ भिक्षा मागण्याकरता या श्लोकांची निर्मिती झाली असेल असे दिसत नाही. उदरंभरण वा उत्सव साजरा करणे असला लौकिक हेतू त्यात कुठेही डोकावत नाही. मनाच्या अवस्थेतून या श्लोकांचा जन्म आहे एवढे मात्र खरे ! उत्सवाच्या काळजीमुळे समर्थांचे मनःस्वास्थ हरवले असावे, त्यामुळे आपल्या विचलित मनाला समजावण्याच्या हेतूने त्यांनी आपल्या मनाशी हे हितगुज केले असावे आपल्या अशांत मनाला शांत करण्यासाठी त्यांनी हा मनाशी संवाद साधला असावा. हृदयस्पर्शी आर्तता या श्लोकांत जाणवते. आपल्याच मनाशी बोलताना – म्हणजे स्वगत बोलताना – समर्थांमधील साधकच अधिक प्रभावी ठरलेला येथे दिसतो. जातिवंत साधक कोणत्याही शक्तीजवळ – ईश्वराजवळदेखील कोणतीही भौतिक वा लौकिक वस्तू मागूच शकत नाही. आपल्या साधनेची सिद्धीच त्याला अभिप्रेत असते. त्याचे मागणे ज्ञानभक्तिवैराग्याचेच असते. त्याचा सारा मोहराच मुक्तीकडे वळलेला असतो. समर्थही याला अपवाद नाहीत ते समारोपाच्या श्लोकात म्हणतात –

'मनाची शते ऐकता दोष जाती ।
मतीमंद ते साधना योग्य होती ।
चढे ज्ञान वैराग्य सामर्थ्य अंगी ।
म्हणे दास विश्वासता मुक्ति भोगी ।' २०५

साधना, ज्ञान, वैराग्य, सामर्थ्य यांचीच आकांक्षा समर्थांना होती. त्यांची निवड प्रेयापेक्षा श्रेयाची होती. आणि म्हणूनच केवळ भिक्षा जास्त मिळावी याच हेतूने श्लोकांची रचना झाली असावी असे म्हणता येत नाही. भरपूर भिक्षेची प्राप्ती हा त्या श्लोकांचा असलाच तर आनुषंगिक परिणाम म्हणावा लागेल.

रामदास सर्वप्रथम रामभक्त आहेत. समर्थ आणि पराक्रमी रामाची उपासना हे त्यांचे जीवनध्येय आहे. या 'मनाच्या श्लोकात' देखील ते आपल्या मनाला पुनःपुन: रामभक्तीचाच उपदेश करतात. पहिल्याच श्लोकात नमनाच्या पाठोपाठ 'गमो पंथ आनंत या राघवाचा' असे श्लोकरचनेचे प्रयोजनच जणू ते सांगतात. आणि नंतरही सतत –

'मना सज्जना, राघवि वस्ती कीजे' – ३८
'मना सज्जना, भेटी राघवासि करावी' – २१

'न ये राम वाणी तया थोर हानी' – ९०
'मना पावना भावना राघवाची
परि अंतरी सोडि चिंता भवाची' – ७९
'अहो ज्या नरा रामविश्वास नाही
तया पामरा बाधिजे सर्व काही' – ७८
'बहु चांगले नाम या राघवाचे' – ८८

– असे रामभक्तीसंबंधीच आपल्या मनाला विनवीत राहतात. रामाच्या वतीनेही ते आपल्या मनाला आश्वासन देतात की 'नुपेक्षी कदा राम दासाभिमानी' – समर्थांच्या अंतरंगातील उत्कट रामभक्तीचे दर्शन मनाच्या श्लोकात घडत राहते. वरवर पाहिल्यास हे श्लोक सुटेसुटे वाटत असले तरी त्यातील भक्तीचा प्रवाह अखंड आहे. त्यातही एक विकासक्रम आहे. ल. रा. पांगारकर म्हणतात – 'विवेक-वैराग्याच्या साह्याने राघवाचा पंथ सगुणोपासनेच्या द्वारा कसा आक्रमावा, नंतर निर्गुणबोध कसा साधावा, अखेरीस सगुणनिर्गुणातील शुद्ध स्वरूप कसें पाहावे ते या श्लोकात दिसते.' आदर्श भक्तीचे सारे गुणविशेष मनाच्या श्लोकात प्रगटले आहेत. बा. ग. तळवलकर यांना या श्लोकात 'दोन मनांचा प्रत्यय' येतो तर शिवाजीराव भावे यांना यात 'शुद्ध अध्यात्माची संगती' जाणवते.

मनाच्या श्लोकात असे अर्थाचे अनेक पदर एकत्र गुंफले आहेत. त्यातील मुख्य सूत्र भक्तीचे आहे.

'मना जे घडी राघवाविण गेली।
जनी आपुली ते तुवा हानी केली।' (४६)
'मना सज्जना हित माझे करावे
रघुनायका दृढ चित्ती धरावे।' (२२)
'न बोले मना राघवाविण काही (२३)
'सदा राम निःकाम चिंतित जावा
मना कल्पनालेश तोही नसावा' (५८)
'रिता ठाव या राघवेवीण नाही' (१९६)

या रामभक्तीच्या आड येणाऱ्या आपल्या मनाच्या काही दुष्प्रवृत्ती आहेत. त्यापासून दूर राहण्याचा सल्ला ते मनाला देतात. किंबहुना मनाच्या श्लोकांची जडण-घडण पाहिली तर त्यातील काही भाग विधायक विचार मांडणारा तर दुसरा नकारात्मक सूचना देणारा आहे. मनाचे स्वरूपच संकल्पविकल्पात्मक आहे. आपले मन काहीतरी करते, नाहीतर काहीतरी टाळते. काहीतरी करावेसे वाटणे अन् काहीतरी टाळावेसे वाटणे. हा मनाचा स्वभाव आहे. तो लक्षात घेऊन समर्थांनी

मनाने काय करावे अन् काय टाळावे याचे एक टाचणच केले आहे. विधायक बाबी अशा :

'धरी रे मना संगती सज्जनांची' (१३५)
'मना सत्यसंकल्प जीवि धरावा' (५)
'मना सज्जना हित माझे करावे' (२२)
'मना सज्जना सत्य शोधूनि पाहे' (६६)
'जनी बोलण्यासारखे चाल बापा' (१०५)
'स्वयें सर्वदा नम्र वाचे वदावे' (७)
'सदा सर्वदा प्रीती रामी धरावी' (१०)

काय करू नये ते सांगणारे निषेधरूप चरणही खूप आहेत.

'मना वासना दुष्ट कामना नये रे' (४)
'नको रे मना द्रव्य ते पुढिलांचे' (९)
'मना मानसि दुःख आणू नको रे' (१२)
'मना सर्वथा शोकचिंता नको हो' (१२)
'मना सर्वथा सत्य सांडू नको रे' (१९)
'नको रे मना क्रोध हा खेदकारी' (६)

मनाच्या कर्तव्याचा आणि अकर्तव्याचा मार्ग समर्थांनी असा रेखीवपणे आखून दिला आहे.

समर्थांच्या विवेकशीलतेमुळे कितीतरी श्लोकातील चरणांना सुभाषितांचे — म्हणींचे ऐश्वर्य प्राप्त झाले आहे.

'जगी सर्व सुखी असा कोण आहे ?' (११)
'मना चंदनाचे परी त्वां झिजावे' (८)
'क्रियेविण वाचाळता व्यर्थ आहे' (११४)
'विवेके क्रिया आपुली पालटावी' (१०५)
'जनी बोलण्यासारखे आचरावे' (११५)
'मना श्रेष्ठ धारिष्ट जीवि धरावे' (७)

या गोळीबंद विचारातून समर्थांचे जीवनविषयक चिंतन प्रगट होते.

आपल्या उथळ, अवखळ मनाला शिकवण्याच्या दृष्टीने समर्थांनी अधून मधून काही मार्मिक शब्दचित्रेही रेखाटली आहेत. या जगाचे स्वरूप नश्वर आहे. येथे उद्याचाच काय पण पुढच्या क्षणाचाही भरवसा नाही. आणि तरीही माणूस अमर असल्याच्या आभासात नेहमी वावरत असतो. नश्वरता समोर पाहूनही तो जणू

शाश्वततेचे स्वप्न बघत राहतो. जेव्हा एखादा माणूस मरतो तेव्हा त्याचे साथी धाय मोकलून रडतात. पण त्यापैकी प्रत्येकजण पुढे केव्हा ना केव्हा तरी त्याच मार्गाने जातो. हा नित्याचा अनुभव लक्षात घेऊन मानवी नश्वरतेचे चित्र ते उभे करतात.

मरे एक त्याचा दुजा शोक वाहे
अकस्मात् तोही पुढे जात आहे ' (१६)

माणसाचे सामर्थ्य अगदी तोकडे ! त्याच्या हाती काहीच नसते. तो आपली चिंता करीत राहतो. अशा चिंतातुराचे चित्र समर्थ रेखाटतात—

' मनी मानवा व्यर्थ चिंता वहाते
अकस्मात् होणार होऊनि जाते ' — (१७)

माणसाने कुणाची संगत टाळावी, कुणाची धरावी यासंबंधीही ते एक चित्र रंगवतात.

' जयांचेनि संगे समाधान भंगे
अहंता अकस्मात् येऊनि लागे
तया संगतीची जनी कोण गोडी
जिये संगतीने मती राम सोडी ' — (४५)

आपल्या मतीने 'रामा'ला कधीही सोडता कामा नये अशी त्यांची अपेक्षा आहे. ' राम ' हा शब्द समर्थ केवळ दशरथपुत्र राम या मर्यादित अर्थाने उपयोजित नाहीत. राम म्हणजे सामर्थ्य, राम म्हणजे अन्यायनिवारण, राम म्हणजे पराक्रम, राम म्हणजे कर्तृत्व, राम म्हणजे बाणेदारपणा, राम म्हणजे गुणवत्ता, असा त्यांचा ' राम ' वैभवसंपन्न आहे. हा ' राम ' त्याच्या सेवकालाही तितकाच समर्थ करतो ही त्यांची श्रद्धा म्हणूनच ते म्हणतात—

समर्थाप्रिया सेवका वक्र पाहे
असा सर्व भूमंडळी कोण आहे ? (३०)

माणसाचे मन अत्यंत चपळ आहे. ' अचपळ मन माझे नावरे आवरिता '— असे खुद्द समर्थही ' करुणाष्टका 'त म्हणतात. मनाचा हा चंचलत्वाचा गुण बालकाचा गुण आहे. लहान मूल जसे क्षणभर स्वस्थ राहत नाही, तसेच आपले मनही घटकाभरदेखील शांत राहात नाही. मन चंचल असल्याने एकदा सांगितलेली गोष्ट बालकाप्रमाणे ते चटकन विसरते. म्हणूनच मनाच्या श्लोकात काही ओळींची पुनरुक्ती झाली आहे. ' नुपेक्षी कदा रामदासाभिमानी ' हा चरण एकवीस वेळा पुनरुक्त झाला आहे. राम आपली उपेक्षा करणार नाही हे त्यांना आपल्या मनाला वारंवार सांगावे लागते आहे. ' जगी धन्य तो दास सर्वोत्तमाचा ' आणि ' प्रभाते

मनी राम चिंतीत जावा ' हे चरण प्रत्येकी दहा दहा वेळा येथे आले आहेत. ' जुने ठेवणे मीपणे आकलेना ', ' मना संत आनंत शोधूनि पाहे ', ' सदासंगती सज्जनाची धरावी ' हें चरण प्रत्येकी पाच पाच वेळा आले आहे. ' परि संग सोडोनि सुखी राहावे ' हा चरण चारदा आला आहे. ही पुनरुक्ती नाठाळ मनाला चुचकारण्याकरता येथे आली आहे असे वाटते.

' मनाच्या श्लोका 'त समर्थांच्या मनाचे प्रतिबिंब उमटले आहे. त्यांचे अंतर्मन त्यांच्या जीवननिष्ठा, त्यांचे चिंतन, त्यांची ध्येयदृष्टी, त्यांच्या आशाआकांक्षा या ठिकाणी प्रगटल्या आहेत. पण हे मन सार्वत्रिक मानवी मनही आहे. त्यामुळे वाचकांना आपल्या मनाची चाहूलही येथे ऐकू येते. मनाच्या श्लोकातील समर्थांचे मन निरखून पाहता पाहता वाचकही समर्थांच्या मनोगताशी एकरूप होतात. आणि नकळत गुणगुणू लागतात,

' जनी निंद्य ते सोडोनि द्यावे
जनी वंद्य ते सर्व भावे करावे –

( ज्ञानदीप, राठीनगर, अमरावती ४४४६०३ )

## साभार स्वीकार

### चरित्र

- प्रा. पु. ग. सहस्रबुद्धे चरित्र व साहित्य – ब. ग. सहस्रबुद्धे, कॉन्टिनेन्टल प्रका., विजयानगर, पुणे ३०, १–१९८९, २५ रु.
- स्वा. वीर सावरकर एक रहस्य – द. न. गोखले, मौज प्रका., खटाववाडी, गिरगाव मुंबई ४००००४, १–१९८९, १२५ रु.
- महारवेटाळ – श्रीरंग रोडगे, साकेत प्रका., ११५ म. गांधीनगर, स्टेशन रोड, औरंगाबाद ५, १–१९८९, ७० रु.
- एक अविस्मरणीय मामा – गंगाधर महांबरे, श्रीविद्या प्रका., २५० शनिवार पेठ, पुणे ३०, १–१९८९, ३५ रु.
- विज्ञानयोगी डॉ. बाबा आमटे – द. दा. जोशी, सुरेश एजन्सी, पुणे २, १–१९८९, २० रु.
- मी एक न्यायाधीश – प्रताप ना. बेहेरे, श्री विद्या प्रका., २५० शनिवार पेठ, पुणे ३०, १–१९८९, कि. ६० रु.
- माझ्या संगीत जीवनाची वाटचाल – मालती पांडे, श्री विद्या प्रका., २५०, शनिवार पेठ, पुणे ३०, १–१९८९, ५० रु.
- दीप उजळे आमुच्या घरी – ले. डॉ. हा. मा. नायक, अनु. प्रा. एस. पी. पाटील, मुंबई विद्यापीठ – कन्नड विभाग, १–१९८९, ३२ रु.

# केशवसुतांची कविता : प्रीती आणि निसर्ग

सदा कऱ्हाडे

केशवसुत म्हटले की प्रामुख्याने त्यांची सामाजिक कविता लक्षात येते. 'तुतारी' या कवितेने नवे युग घडविले, 'स्फूर्ति' या कवितेने कविकलावंतांना सामाजिक उत्तरदायित्वाचे नवे भान दिले, आणि 'नवा शिपाई' या कवितेने सामाजिक परिवर्तनाला प्रेरक ठरणारी, गतिमान करणारी समता, स्वातंत्र्य व बंधुता ही विचारमूल्ये दिली, समाज या लौकिक विषयाला काव्यानुभवाचा विषय म्हणून केशवसुतांनी प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. दुरवस्थेने समाजाला घेरलेले आहे, ही जाणीव 'स्फूर्ति' या कवितेत दिसते. म्हणून ते म्हणतात : 'क्लृप्तीची मग करूनी नौका व्योमसागरावरि जाऊ' तसेच 'पद्यपंक्तीची तरफ आमुच्या करीं विधीनें दिली असे। टेकुनि ती जनता शीर्षावरि जग उलथुनिया देउं कसे ।।' हे सामाजिक परिवर्तनाविषयीचे, समाजक्रांतीविषयीचे भान आणि या कार्यासाठी लागणाऱ्या सामर्थ्याविषयीचा आत्मविश्वासही या कवितेत व्यक्त झाला आहे. क्लृप्ती म्हणजे सर्जनशील कल्पकता. कवीजवळ नुसती प्रतिभाशक्ती असून पुरेसे नाही. 'नव-नवोन्मेषशालिनी प्रज्ञा प्रतिभा' अशा प्रज्ञेला, प्रतिभेला प्रत्यक्ष निर्मिती करण्यासाठी कल्पकतेचीही जोड असावी लागते. ही केशवसुतांची काव्यदृष्टी लक्षात घ्यायला हवी. केवळ वास्तवात जे नाही, प्रत्यक्षात जे नाही तें कल्पनीय स्वरूपात निर्माण करणारी शक्ती म्हणजे क्लृप्ती नव्हे. वास्तवालाच नवे रूप देणारी, वास्तवाचा नवा अन्वयार्थ लावणारी आणि वास्तवातूनच नवनिर्मिती करणारी शक्ती या अर्थाने ही संकल्पना वापरतात. प्राप्त परिस्थितीत समाजाला घेरणाऱ्या दुरवस्थेला दूर करून समाजाची नवनिर्मिती करण्यासाठी कलावंताने आपल्या सर्जनशील कल्पकतेचा उपयोग करावा अशी केशवसुतांची दृष्टी होती. केशवसुतांच्या सामाजिक कवितांतील आशयाचे सारतत्त्व 'स्फूर्ति'मध्ये आले आहे.

समाज या लौकिकविषयाला काव्यानुभवाचा विषय बनवणे याचा लाक्षणिक अर्थ असा की कोणताही सामाजिक अनुभव हा काव्याचा विषय होऊ शकतो. सामाजिक अनुभव हे लौकिक जीवनातील सुखदु:खाशी निगडित असतात. म्हणून

लौकिक जीवनातील सुखदुःख हाही काव्यानभवाचा विषय होऊ शकतो हे नवे भान केशवसुतांच्या कवितेने दिले.

समाज हा जसा केशवसुतांच्या चिंतनाचा विषय होता, तसाच प्रेम आणि निसर्ग हाही त्यांच्या चिंतनाचा विषय होत होता. गोविंदाग्रजांनी प्रेम या विषयावर आपल्या व्यक्तिमत्त्वाची मुद्रा उमटविली आणि बालकवींनी निसर्ग या विषयावर आपली मुद्रा उमटविली. गोविंदाग्रजांनी आपल्या कवितांतून प्रेमाचे तत्त्वज्ञान सांगितले. तर बालकवींनी निसर्गाचे तत्त्वज्ञान सांगितले. अशी एकदा मांडणी करू लागलो की मग केशवसुतांनी आपल्या कवितांतून सामाजिक तत्त्वज्ञान मांडले असे म्हणता येणे शक्य व संभवनीय होते. केशवसुत म्हटले की 'तुतारी', 'स्फूर्ति', 'नवा शिपाई' इ. सामाजिक आशय असणाऱ्या कविताच लक्षात येतात. प्रेम आणि निसर्ग या विषयांनाही काव्यानुभवाचा विषय म्हणून प्रतिष्ठा प्राप्त करून दिली याकडे दुर्लक्ष होते.

जीवनाला व्यापून टाकणारी, मानवी मनाला मोहून टाकणारी प्रेमभावना हीच मानवी सुखदुःखाचा मूलस्रोत आहे.

> प्रीति मिळेल का हो शेजारी ?
> प्रीति मिळेल का हो बाजारी ?
> प्रीति मिळेल का हो बागांत ?
> प्रीति मिळेल का हो शेतात ?
> प्रीतिची नसे अशि ग मात;
> पहा शोधुनी हृदयात !

शब्दकळा, कल्पनाविलास, प्रतिमासृष्टी इ. गुणवैशिष्ट्यांच्या दृष्टीने वरवर पाहता साधी व सामान्य वाटणारी ही कविता या लौकिक भावनेविषयीचे नवे भान देत होती.

नवे युग घडविणाऱ्या सामाजिक कविता केशवसुतांनी नंतरच्या काळात लिहिल्या. 'तुतारी' (१८९३), 'स्फूर्ति' (१८९६) आणि 'नवा शिपाई' (१८९८). 'प्रीति' ही कविता केशवसुतांनी १८८८ मध्ये म्हणजे प्रारंभीच्या काळात लिहिली आहे.

केशवसुतांच्या काव्यलेखनाचा कालावधी १८८५ ते १९०५ असा आहे. हा कालावधी पूर्वार्ध आणि उत्तरार्ध अशा परिभाषेत मांडायचा तर १८९२ पर्यंत पूर्वार्ध आणि १८९३ नंतर उत्तरार्ध असें स्थूलमानाने म्हणता येईल.

'"पण लक्षात कोण घेतो ?" च्या कर्त्यास' ही हरिभाऊ आपटे यांना उद्देशून लिहिलेली कविता केशवसुतांनी १९ ऑक्टोबर १८९२ रोजी लिहिली. (कदाचित



अनुक्रमणिका







हा दिनांक कवितेच्या प्रसिद्धीचाही असेल.) हरिभाऊंच्या ह्या कादंबरीने मराठी सामाजिक कवितेचे युग घडविले असें मानले जाते. " रूढिका राक्षसीला चीत करून आपल्या टाकाने जुना दुराग्रह मर्मी विंधून स्त्रीजातीस असाच वर काढ आणि कीर्ति संपादन कर –" असे हरिभाऊंना उद्देशून केशवसुतांनी या कवितेत म्हटले आहे. स्त्रीजातीप्रमाणेच शूद्रातिशूद्रांनाही चातुवर्ण्याधिष्ठित समाजव्यवस्थेत अन्याय सहन करावा लागतो. सामाजिक विषमतेचे हे भान केशवसुतांना अधिक स्पष्टपणे व नेमकेपणे 'पण लक्षात कोण घेतो ?' ही कादंबरी वाचल्यानंतर झाले असावे. कारण युगप्रवर्तन करणाऱ्या त्यांच्या सामाजिक कवितांचे लेखन १८९२ नंतरच्या काळातील आहे.

केशवसुतांची पहिली कविता 'खिडकीकडे मौज पहावयास' १८८५ मध्ये लिहिलेली आहे. 'रघुवंशे श्रीकालिदास:' असा उल्लेख कवितेच्या शेवटी आहे.

प्रारंभीच्या काळात त्यांच्यावर संस्कृतमधील विदग्ध काव्याचा प्रभाव होता. संस्कृत काव्यातील शृंगारिक वर्णने, संभोग शृंगारापेक्षाही विप्रलंभ शृंगाराची वर्णने, विविध संकेत इत्यादींचा संस्कार त्यांच्या काव्यात दिसतो. उदाहरणार्थ,

'विदेशी गे भुंगा प्रियकर कळीला स्मरुनि तो
स्वगुंजालापाला फिरुनी फिरुनी घेत असतो।'

अशा प्रकारची अभिव्यक्ती केशवसुतांच्या प्रारंभीच्या कवितांत दिसून येते. ('अपरकविता–दैवत', १८८६) आणि —

नाही ज्यापरि डोंगळा कधिहि तो गेला क्षणी साखरे,
नाही ज्यापरि चालला कधिहि तो तो मार्जार साईकडे,
नाही कृष्ण कधीहि ज्यापरि सखे गेला दह्यांडीप्रत,
तैसा येइन मी समुत्सुक गडे तुझ्याकडे चालत।'

संभोग शृंगारातील, मीलनातील ही 'समुत्सुकता' केशवसुत व्यक्त करतात. ('नाही ज्यापरि डोंगळा कधिहि तो गेला क्षणी साखरे –' १८८७) हा संस्कृत-मधील काव्याचा प्रभाव आहे. त्या काव्यातील प्रेम, प्रणय, आणि शृंगार याचे आकर्षण केशवसुतांना होतें. सामाजिकतेचे भान त्यांना प्रारंभीच्या काळात नव्हतें. म्हणजे 'तुतारी', 'स्फूर्ति' इ. कवितांच्या कालखंडात जितक्या प्रकर्षाने व डोळसपणाने हे भान होते तितक्या प्रकर्षाने प्रारंभीच्या काळात नव्हते असे म्हणा-वयाचे आहे. जी एक क्रांतिकारक बंडखोरी किंवा आजचाच परिचित शब्द वापरायचा तर विद्रोही वृत्ती प्रारंभीच्या कवितांमध्ये जाणवत नाही. 'एक खेडे' यासारखी वेगळ्या अर्थाने पण स्वप्नरंजनात्मक कविता केशवसुतांनी पूर्वार्धात लिहिली. जगापासून दूर निसर्गाच्या सान्निध्यात स्वत:चे जग निर्माण करू पाहणारी कवीची

ही स्वप्निल वृत्ती एका अर्थी समाजसन्मुखतेचा अभाव दर्शवणारीच आहे. केशवसुत हे बहिर्लक्षी कवी होते, म्हणून सामाजिक विषमतेतून निर्माण झालेली दुरवस्था त्यांना तीव्रतेने जाणवली. आणि रूढीरूपी राक्षसीची संतानं गाडून पुरून टाकण्याचा व समतेचा ध्वज हाती घेऊन नवसमाजनिर्मितीचे बंड करण्याचा आवेश त्यांच्यात निर्माण झाला. ही बहिर्लक्षी वृत्ती पूर्वार्धात स्पष्ट, स्फुट व ठाम स्वरुपात जाणवत नाही. अशा विद्रोही वृत्तीचा आविष्कार प्रारंभीच्या कवितांत नाही.

'अंत्यजाच्या मुलांचा पहिला प्रश्न' (१८८८) 'मजुरावर उपासमारीची पाळी' (१८८९) या कवितात सामाजिक विषमता आणि आर्थिक विषमता यांतून निर्माण होणारे प्रश्न ते मांडतात. म्हणजे सामाजिकतेचे भान पूर्वार्धात अगदीच नव्हते असे नाही. परंतु तुतारी, स्फूर्ती व नवा शिपाई ह्या कवितांनी वैचारिक उत्क्रांतीचे नवे पर्व निर्माण केले.

केशवसुतांच्या काव्यलेखनाच्या पूर्वार्धात संस्कृत काव्याप्रमाणेच इंग्रजी काव्याचाही प्रभाव केशवसुतांवर पडत होता. प्रेम, प्रणय, शृंगार हे अनुभव विषय इंग्रजी कवितेतही विपुल आणि विविध रूपात परिचित होत होते. त्यातील एक वैशिष्टय केशवसुतांना विशेष जाणवले असावे. ते म्हणजे इंग्रजी कवितेतील आत्मपरता. संस्कृतमधील विदग्ध काव्यात नायक-नायिका हयाच मुळात रामायण, महाभारत, भागवत इत्यादी पुराण ग्रंथातल्या म्हणजे अलौकिक व अद्‌भुत विश्वातल्या. तेव्हा त्यांचे भावजीवन व भावजीवनातील प्रेम, प्रणय, शृंगार इत्यादीही अलौकिकच. याउलट केशवसुतकालीन परिचित इंग्रजी कवितेतील नायकनायिका लौकिक, हयांचे भावजीवन लौकिक व त्यांचे भावानुभवही लौकिक होते. (काव्यात त्याला कलात्मक अभिव्यक्तीमुळे अलौकिकता प्राप्त होणे अथवा प्लेटॉनिक व रोमॅंटिक वृत्तोमुळे लौकिक अनुभवच अलौकिक पातळीवर नेणे इ. प्रकार वेगळा.) प्रारंभीच्या काळातील प्रेमकविता केशवसुत प्रथमपुरुषी निवेदन अनेकदा करतात. त्यातला 'मी' प्रातिनिधिक आहे.

"माझ्या या नयना दिसे न — ' असे केशवसुत म्हणाले असले तरी ते सगळ्या कामी जनांचा एकाअर्थी कैपक्ष घेतात. 'कामान्धत्व' (१८८८) या कवितेत केशवसुत म्हणतात—

"व्यंगे प्रियेची बघतील, मोकळे
कामी जनाचे जर नेत्र राहिलें
म्हणूनि का आणुनि त्यांत आसवे
हे धूर्त कामा ! करितोस आंधळे ?"

"प्रीती जगाचे वसन विणितसें" — "प्रीतिचा पथ वर्तुळ आहे" इत्यादी

विधानरूप विचारातून ( प्रयाण गीत – १८८९ ) केशवसुत 'प्रीती' या लौकिक विषयाकडे बघण्याचा नवा दृष्टिकोन देत होते. 'कांट्यांवांचुनि गुलाब नाही !' या कवितेच्या प्रकाशनवर्षाविषयी निश्चिती नाही, परंतु पूर्वार्धाच्या अखेरीस लिहिली असावी. जग हे सुखदु:खांनी भरलेले आहे. सुख हवे असेल तर सुखाबरोवर येणाऱ्या दु:खाचाही स्वीकार करायलाच हवा. छाया आणि प्रकाश मिळूनच चित्र होते. काट्यावाचुनि गुलाब नाही हे त्रिकालाबाधित सत्य आहे.

"स्पृहणीय असे काय जगीं या एक असे ?– तर प्रीत
हृदयभेदकर काय हो ? – तर तीच हे खचित !"

हा दैववाद त्यांच्या उत्तरार्धातील सामाजिक विद्रोही कवितेत दिसत नाही. प्रारंभीच्या काळात ही नियतिशरणता केशवसुतांच्या व्यक्तिमत्त्वातच होती का ? ( संस्कृत साहित्यात अशी नियतिशरणता आपल्या प्रत्ययाला येते.)

'जायाचें जग का असेच' (१९८८) या कवितेचा आशयही विषमतेच्या संदर्भातच आहे. ज्याचे सर्व जगावर नियमन चालते त्या ईश्वरानेच ही विषमता निर्माण केलेली आहे. म्हणून केशवसुतांचा देवांनाच प्रश्न आहे–

'जायाचे का जग असेच ? सगळे ऐसेच का चालणे ?
ऐसा न्यायच का जगामंधि अम्हांलागी सदा लाभणे ?'

पूर्वार्धातील अनेक कवितांत दैवाधीनता प्रत्ययाला येते. बहुतांशी कवितात, म्हणजे हा अनुभवविषय व्यक्त झालेल्या कवितात वियोगाचे–विरहाचे दु:ख आहे. अथवा असेही म्हणता येईल की, अशा कविता एकार्थी विप्रलंभ शृंगारप्रकृतीच्या आहेत.

कलावंतांच्या स्वातंत्र्याचा पुरस्कार करणारी कविता केशवसुतांनी १८८६ मध्ये लिहिली.

अशी असावी कविता, फिरून
तशी नसावी कविता, म्हणून
सांगावया कोण तुम्ही कवीला
अहांत मोठे ? पुसतो तुम्हाला

प्रेयसीचा अनुनय प्रियकराने कसा करावा हे जसे कोणी त्याला सांगत नाही, त्याप्रमाणे कविता कशी असावी हे कोणी कवीला सांगू नये. "करूनिया काव्य ...त आणणे । न मुख्य हा हेतु तदीय मी म्हणे ।" असे सांगून केशवसुत म्हणतात काव्य करून त्यात दंगून जाणे, मनातल्या मनात गुंगून जाणे हाच काव्याचा हेतू आहे. प्रेम, प्रणय, शृंगार हे भावानुभव आत्मानंदाचे विषय आहेत. त्यांची व्यक्तीही आत्मानंदासाठी आहे. ही अभिव्यक्ती मुक्त असायला हवी,

निर्बंधमुक्त असायला हवी. मोरोपंतांच्या कवितेवर पोसलेल्या मराठी मनाच्या सनातनी अभिरुचीला हा मुक्त आविष्कार मानवण्यासारखा नव्हता. म्हणून केशवसुतांनी काव्यलेखनाला प्रारंभ करून वर्षभरातच काव्यरसिकांना हा इशारा दिला "कवीस सोडा कवितेवरोबरी। – न जाच वाटेस तयाचिया तरी।" हा इशारा केशवसुत देत होते, त्यावेळी केशवसुतांच्या मनात सामाजिक जाणिवांचा उद्‌भव झालेला नव्हता. दुरवस्थेने घेरले असल्याचे भान त्यांना आले नव्हते. सामाजिक आणि आर्थिक विषमतेविरुद्ध, धर्माच्या अवडंबराविरुद्ध बंड उभारण्याची ईर्षा त्यांच्या मनात निर्माण झाली नव्हती. परंतु संस्कृतमधील विदग्धकाव्य आणि इंग्रजीतील रोमॅण्टिक काव्य वाचून अभ्यासून मानवी जीवनाचा मूलस्रोत असलेल्या 'प्रीती'चे नवे भान त्यांना निश्चितच झाले असावे.

"साऱ्याही विषयात आशय कधी मोठा किती आढळे" हे सैद्धान्तिक विवेचन केशवसुत उत्तरार्धात करतात. (१८९६ च्या सुमारास) पूर्वार्धात मात्र केशवसुत 'प्रेम' या लौकिक विषयाला काव्यानुभवाचा विषय म्हणून प्रतिष्ठा प्राप्त करून देत होते, असे वाटते.

क्लृप्तीची म्हणजे सर्जनशील कल्पकतेची संकल्पना यापूर्वीच केशवसुतांनी मांडली होती. कलानिर्मितीचे स्वातंत्र्य घेऊन, सर्जनशील कल्पकतेच्या द्वारे समाजाचे उत्तरदायित्व कवींनी पार पाडले पाहिजे, अशी काळाचा युगधर्म म्हणून नवी दृष्टी केशवसुतांनी दिली होती. अधूनमधून क्लृप्तीचं सामर्थ्य निष्प्रभ होत असल्याची जाणीव केशवसुतांना होत असावी, म्हणून प्रीतिभावनेचा आश्रय घेऊन कवितेलाच प्रेयसी कल्पून तिची आळवणी केली असावी.

प्रेमभावनेने झपाटलेल्या माणसाची मन:स्थिती व भाववृत्ती केशवसुतांनी फिर्याद, रुष्ट सुंदरीस या रूपकात्मक कवितांतून व्यक्त केली आहे. सकृद्दर्शनी उत्कट प्रेमकविता वाटणाऱ्या या कविता मूलत: कवीच्या सर्जनशील कल्पकतेला उद्देशून आहेत. परंतु कवितेचा संपूर्ण परिवेश प्रेमकवितेसारखा – प्रणयगीतासारखा आहे.

'माझा अन्त' (१८९०) या कवितेचा उल्लेख तर करायला हवाच.

मी पाहिली एक सुरम्य बाला;
वर्णूं कसा त्या स्मरसंपदेला ?
वृक्षावरी वीज जधीं पडावी
त्याच्या स्थितीतचि तिची महंती पहावी

प्रेमासाठी करावे लागणारे समर्पण हाही एक दिव्य अनुभव आहे. वृक्ष–वीजन्यायाने केशवसुत त्या अनुभवाची अन्वर्थकता जाणवून देतात.

बालकवींनी ज्या अर्थाने निसर्गकविता लिहिली त्या अर्थाने केशवसुतांनी निसर्ग-

कविता लिहिली नाही. निसर्गाकडे बघण्याचा एक नवा दृष्टिकोन त्यांनी दिला. प्राचीन कवींपेक्षा वेगळया दृष्टीने केशवसुत निसर्गाकडे पाहत होते. परमेश्वर हा जली, स्थळी, काष्ठी, पाषाणी असतो. कोणत्याही क्षणी, कोणत्याही रूपात तो प्रकट होतो. साक्षात्कार घडवितो; ही प्राचीनांची श्रद्धा होती. निसर्ग हे परमेश्वराचेच एक रूप आहे, अशी त्यांची धारणा दिसते.

केशवसुतांना निसर्गाचे प्रथमतः आकर्षण वाटले ते 'अढळ सौंदर्य' सृष्टीतच निसर्गरूपात असते म्हणून. सृष्टीत वास करणारे हे 'अढळ सौंदर्य' सर्वांनाच मोहून टाकणारे आहे. निसर्गसौंदर्याचे आकर्षण केशवसुतांना प्रारंभापासून होते.

'उगवत असलेल्या सूर्याला' ही त्यांची क्रमाने दुसरी कविता असावी. 'खिडकीकडे मौज पहावयास' ही कविता नोव्हेंबर १८८५ मध्ये आणि 'उगवत असलेल्या सूर्यास' ही डिसेंबर १८८५ मध्ये लिहिली. पक्षी गाऊन सूर्याचे स्वागत करतात. वेलीफुलांनी डवरून वन्दन करतात. कवी त्यांचेच अनुकरण करतो. तसेच कवी पद्मिनीचेही अनुसरण करतो. अनन्यभावे सूर्याला शरण जातो नम्रपणे. कारण सूर्य उगवला म्हणून त्या प्रकाशात सृष्टीतील 'अढळ सौंदर्य' (१८८६) न्याहाळता आले. 'एक खेडे' (१८८७) या कवितेतही केशवसुतांनी आपले मनोगत व्यक्त केले आहे. त्यांना सह्यगिरीच्या पायथ्याला सुपीक रम्य खोऱ्यात निसर्गाच्या कुशीतच एक खेडे हवे आणि तिथेच एका साध्या कुटिरात त्यांना साधेपणानेच वास्तव्य करावयाचे आहे.

'सृष्टि, तत्त्व आणि दिव्यदृष्टि' (१८३०) या कवितेत सौंदर्यतत्त्व हे सृष्टीत सर्वत्र असते, प्रत्येक वस्तूत असते, श्रद्धेने त्याचा शोध घेतला म्हणजे त्याचा बोध होतो हा आशय नवी दृष्टी देणारा होता.

सृष्टीमध्ये सौंदर्य आहे, काव्याला लागणारे सगळे विषय सृष्टीत आहेत. असे एकही रहस्य नाही की जे पुष्पामधे प्रकट होत नाही. सृष्टीत असा एकही ध्वनी नाही की जो खगकूजितात उमटत नाही. जगात असा कोणताच निगूढ इतिहास नाही की ज्याचा प्रत्यय सृष्टीत येत नाही. शेतकरी जसे शेतामधून समृद्ध पीक आपल्या घरी नेतो आणि साठवून ठेवतो, त्याप्रमाणे सृष्टीची जमीन कवीला सौंदर्याचे अमाप पीक देते. कवी तेच सौंदर्यधन आपल्या काव्यात साठवून ठेवतो. ("सृष्टि आणि कवि') काव्यनिर्मिती आपण करीत असलो तरी कवी ते श्रेय स्वतःकडे घेत नाही.

> "शारदेने जो मंत्र दिला कानीं,
> तसे लिहिलें मी; काव्य तिचे मानीं !
> दिव्यशक्तीने स्फुरे गंध पुष्पी,

रंग खुलतीही तिने इंद्रचापी;
सृष्टिमाजी जे रम्य असे काही
तीच कारण त्या शक्ति असे पाही " (काव्य कोणाचे १८९७)

निसर्गामध्ये सौंदर्य निर्माण करणारी जी दिव्य शक्ती आहे तीच दिव्य शक्ती काव्य-निर्मितीस कारणीभूत होते. सृष्टी स्वतःच कवी आहे. सृष्टी हेच काव्य आहे. आणि सृष्टी हाच ईश्वराचा महान ग्रंथ आहे. परंतु 'आम्ही मूर्ख सगळे त्या अज्ञ बालापरी'. पुस्तकाचे रंगीत पुठ्ठे आणि सोनेरी कडा असणारी पाने याचाच अज्ञ बालकांना आनंद होतो. तसे आम्ही गौण गोष्टीकडे लय पुरवतो आणि अवघे उत्कृष्ट जे आहे ते टाकून देतो.

"त्या मोठ्या कविचा अम्ही न झटतो इष्टार्थ जाणावया।"
अशी खंत केशवसुतांनी व्यक्त केली आहे. ('ईश्वराचा ग्रंथ' १८८८)

केशवसुतांच्या अशा अनेक कविता आहेत की ज्यातून केशवसुतांना निसर्गाविषयी जिव्हाळा, निसर्गाविषयी आत्मीयता दिसून येते. केशवसुतांमधील 'मी'ने निसर्गाशी प्रारंभापासूनच असे अतूट नाते जोडले आहे त्यामुळे त्यांच्या सर्वच कवितांत प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे निसर्ग वेगवेगळ्या संदर्भात, वेगवेगळ्या रूपात अवतरतोच. केशवसुतांच्या कवितांत निसर्गाबरोबरच त्यांच्यातला 'मी' अपरिहार्यपणे येतो. बालकवींच्या निसर्गकाव्यात 'मी' क्वचित अपवादाने येतो.

केशवसुतांच्या कवितेत वेगवेगळ्या संदर्भात निसर्ग येतो. किंबहुना असेही म्हणता येईल की केशवसुत निसर्गाच्या भाषेतच लिहितात, बोलतात. एखादा अनुभव व्यक्त करताना, भावना व्यक्त करताना, कल्पना रंगवताना केशवसुत उपमा, उत्प्रेक्षा, रूपक, दृष्टान्त इत्यादी अलंकारांची मूलद्रव्ये निसर्गातूनच निवडतात. एखादे त्रिकालाबाधित सत्य किंवा तथ्य सांगावयाचे असले तरी केशवसुत निसर्गातलाच अन्वर्थक दाखला देतात. याची असंख्य उदाहरणे त्यांच्या कवितांतून दाखविता येतील.

निसर्ग आणि मानव यांच्यातील साहचर्य, यांच्यातील सख्यसंबंध आणि यांच्यातील अनुबंध या सर्वांचे केशवसुतांना भान होते. हे भान अर्थातच मराठी कवितेत नवे होते. प्राचीन मराठी कवितेने लौकिक व पारलौकिक जीवनाचा अन्वयार्थ अध्यात्माच्या – परमेश्वर आणि माणूस, आत्मा आणि परमात्मा, ब्रह्म आणि जीव यांच्यातील परस्परानुबंधांच्या संदर्भाने जाणून घेण्याचा प्रयत्न केला. केशवसुत हे इहवादी होते, बुद्धिवादी होते. गरीब घरेला आकाशातील नक्षत्रांनी ऐश्वर्यसंपन्न करताना –

" अडवतील जर देव, तरी
झगडू त्यांच्याशी निकरी,
हार न खाऊ रतीभरी !

देवदानवा नरें निर्मिले, हे मत लोकां कळवू या !" (स्फूर्ति)

अशी वैचारिक बंडखोरी केशवसुतांनी दर्शविली तरी मूलत: केशवसुतांचा झगडा देवांशी नव्हता. ज्या परमेश्वराने देवादिकांसाठी स्वर्ग निर्माण केला, त्याच परमेश्वराने मानवासाठी पृथ्वी निर्माण केली. अथवा पृथ्वीवर माणूस निर्माण केला.

'स्वर्ग, पृथ्वी आणि मनुष्य' यांच्यातील अनुबंध व्यक्त करणारी एक कविता केशवसुतांनी लिहिली. (१८९०) ही कविताही अर्थातच काव्यलेखनाच्या पूर्वार्धातील आहे. म्हणजे समाजाच्या उत्तरदायित्वाचे भान येण्यापूर्वीची आहे. कवितेतील कल्पना अर्थपूर्ण आहे. पूर्वी स्वर्ग आणि पृथ्वी एकमेकांच्या अगदी जवळ जवळ होते. स्वर्ग नेहमी आपले कांतिप्रसन्न नेत्रकटाक्ष पृथ्वीवर टाकी असे. त्यामुळे गंधवतीच्या मनात स्वर्गाविषयी प्रीती निर्माण झाली. गंधवती पृथ्वीने स्वत:च्या मळीतून मनुष्य निर्माण केला. या हेतूने की मनुष्य आपल्या कौशल्याने स्वर्गाला मोहून या पृथ्वीवर आणील. म्हणजे पृथ्वीला स्वर्गाचा चिरसहवास लाभेल. परंतु मनुष्य इतका कृतघ्न की त्याने पृथ्वीलाच नि:सार असार मानून स्वर्गात जाण्याची आकांक्षा धरली. स्वर्ग लोपला. चूक उमगल्यावर पृथ्वीला स्वर्गसदृश करण्याचा प्रयत्न आरंभला.

निसर्गात 'अढळ सौंदर्य' आहे म्हणून केशवसुतांना निसर्गाचे आकर्षण होते. निसर्ग हेच एक महान काव्य आहे. म्हणून केशवसुतांचे कविमन निसर्गाशी सतत संवादी होते. कदाचित हा निसर्गच पृथ्वीला स्वर्गतुल्य करू शकेल अशी त्यांची श्रद्धा होती निसर्गाकडे पाहण्याची नवी दृष्टी केशवसुतांनी दिली.

निसर्ग आणि माणूस यांचा सहवास असला तरी त्या दोघात प्रचंड दरी आहे. निसर्ग सुंदर आहे, आनंदी आहे, प्रसन्न आहे, चैतन्यपूर्ण आहे, चिरतरुण आहे. उलट मानवी जीवनात या सर्व गोष्टींचा अभाव आहे. मानवी जीवन हे काळोखात वावरणारे मृत आशांच्या चिता धगधगणारे, स्वत:चेच पिशाच्च त्या चिताभोवती नाचणारे.

'पुष्पाप्रत' आणि 'फुलपाखरू' या दोन कविता केशवसुतांनी १८९२ नंतरच्या काळात लिहिलेल्या आहेत. बालकवींनी जसे 'बालविहग' हे मुक्त, अनिर्बंध, पूर्ण आणि आनंदमय जीवनाचे प्रतीक वाटते तसेच केशवसुतांना 'पुष्प' आणि 'फुलपाखरू' हे प्रतीकच वाटत होते. त्यांना उद्देशून लिहिताना लाक्षणिक अर्थाने केशवसुत निसर्गाला उद्देशूनच लिहितात. फूल आणि फुलपाखरू यांच्यातील संबंधाला केशवसुतांनी पुष्पपतंगस्थिती असे म्हटले आहे. मानवी जीवनावरचे ...क जड बंधने मानवी जीवनाची एका अर्थी बद्धावस्था, अपूर्णता आणि त्यातून

मानवी जीवनात निर्माण होणारे अपरिहार्य दुःख लक्षात घेतले की ही पुष्पपतंग-स्थिती मानवाला कधी प्राप्तच होणार नाही म्हणून निसर्गाची ओढ असणे, तल्लीन होणे, निसर्गाची गाणी गाणे आणि प्रत्यक्षात न मिळणारा आनंद अप्रत्यक्षपणे अनुभवणे एवढेच माणसाच्या हाती असते. अशी भूमिका उत्तरार्धात केशवसुतांनी मांडली आहे. आणि बालकवींच्या कवितेतील निसर्गतत्त्वज्ञानाचे बीज केशवसुतांच्या निसर्गविषयक भूमिकेत आहे, असे म्हणता येते.

प्रीती या विषयाच्या बाबतीत कालानुक्रमाने विचार केला तर शेवटी केशवसुत 'कांट्यावांचुनि गुलाब नाही' या अनुभवसत्यापर्यंत आले आणि --

"अविकृत ऐसे नसेचि काही, विकृतिरूप संसार
ओळखुनी हे सोडुनि देई शोकदुःख अनिवार."

असा तडजोडीचा निर्णय त्यांनी दिला.

निसर्ग या विषयाच्या बाबतीतही कालानुक्रमाने विचार केला तर केशवसुत "पुष्पपतंगस्थिती ही कोठुनि आम्हाला मिळणे" या अनुभवसत्यापर्यंत आले आणि

'जे रम्य ते बघुनिया मज वेड लागे;
गाणे मनात मग होय सवेंचि जागे;
गातो म्हणून कवनी फुलपाखराते,
व्हायास सौख्य, मम खिन्न अशा मनातें.

तसा तडजोडीचा निर्णय त्यांनी घेतला.

परंतु वैफल्याने ते संपूर्णपणे ग्रासले गेले नव्हते. कारण काव्यलेखनाच्या उत्तरार्धात त्यांना सामाजिकतेचे नवे भान आले होते. 'तुतारी'द्वारे 'जुने जाऊ द्या मरणालागुनि' असे आवाहन करून 'प्राप्तकाल हा विशाल भूधर । सुंदर लेणी तयात खोदा । निजनामें त्यावरती नोंदा ।" असे भवितव्याचे स्वप्न देता आले. 'स्फूर्ति'द्वारे "बंडाचा तो झेंडा उभवुनि धामधूम जिकडे तिकडे । उडवुनि देउनि जुलमाचे या करू पहा तुकडे तुकडे । --" अशी क्रांतीची प्रेरणा त्यांना देता आली, आणि समता, स्वातंत्र्य, बंधुत्व या तत्त्वत्रयीवर आधारलेली नवसमाज रचना करून शांतीचे साम्राज्य स्थापन करू पहाणाऱ्या काळाचा प्रेषित 'नवा शिपाई' निर्माण करता आला. आणि हे सर्व करीत असतानाच सर्जनशील कल्पकतेच्याद्वारे पृथ्वीवर स्वर्ग निर्माण करण्याचे, 'पृथ्वीला सुरलोकसाम्य' करण्याचे स्वप्न देता आले.

समाज या विषयाच्या बाबतीतही केशवसुत शेवटी 'भिकार या जगि इच्छित न मिळे काही' या अनुभवसत्यापर्यंत आलें. आणि "केशवसुत म्हणे : देवा दीन-नाथा । तुझे पायीं माथा । वाहियेला !" अशी शरणता पत्करली.

केशवसुतांच्या काव्यलेखन प्रवासात, शेवटी त्यांच्या बुद्धिवादाची शोकांतिका प्रत्ययाला येते. परंतु तो स्वतंत्र विवेचनाचा विषय आहे. मात्र एवढे खरे की समाज, निसर्ग आणि प्रीती या तीनही लौकिक विषयांना काव्यानुभवाचे विषय म्हणून केशवसुतांनी प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. त्यांच्या सामाजिक कवितांना गौरविताना निसर्ग आणि प्रीतिविषयक कवितांकडे दुर्लक्ष होऊ नये. किंबहुना तेही लक्षात घेतले तरच केशवसुतांच्या काव्यातील समग्रतेचे आकलन होऊ शकेल.

(चैतन्य, १०९ जयप्रकाश नगर, गोरेगाव पूर्व, मुंबई ६३)

---

## साभार स्वीकार

### कथासंग्रह

- **प्रतीती** – सानिया, प्रका. – मौज प्रकाशन, खटाववाडी, गिरगाव, मुंबई ४, १–१९८९, ६४ रु.
- **ऑर्फियस** – ले. दिलीप पुरुषोत्तम चित्रे, साकेत प्रकाशन, ११५ म. गांधीनगर, औरंगाबाद ४३१००५, २–१९८८, ४० रु.
- **गोष्ट एका कपड्याच्या जोडाची** – ले. बाबा भांड, प्रका. साकेत प्रका., ११५ म. गांधीनगर, औरंगाबाद ४३१००५, १–१९८८, ७ रु.
- **गोष्ट एका गावाची** – बाबा भांड, साकेत प्रका., ११५ म. गांधीनगर, औरंगाबाद, ४३१२०५, १–१९८७, ७ रु.
- **कायापालट** – बाबा भांड, साकेत प्रका., ११५ म. गांधीनगर, स्टेशन रोड, औरंगाबाद ५, १–१९८८, ३५ रु.
- **निहारिका** – मुकुंद बापट, प्रका. प्रपंच प्रका., ३८९ शनिवार पेठ, पुणे ३०, १–१९८९, ४० रु.
- **समस्या साहचर्यांच्या** – बागेश्री परीख / प्रतिभा घीवाला, श्री विद्या प्रका., २५० शनिवार पेठ, पुणे ३०, १–१९८८, ५० रु.
- **चंद्रबनातल्या सावल्या** – नलगे चंद्रकुमार, सुरेश एजन्सी, पुणे २, १–१९८९, ५० रु.
- **आमने सामने** – केशव मेश्राम, सुरेश एजन्सी, पुणे २, १–१९८९, ४० रु.
- **इस्पितळ आणि पतंग उडवणारा माणूस** – आगाशे सुकन्या, श्री विद्या प्रका., २५० शनिवार पेठ, पुणे ३०, १–१९८९, २७/६० रु.

---



अनुक्रमणिका

# कवी यशवंत : एक आकलन

डॉ. आशा सावदेकर

कवी यशवंत ऊर्फ यशवंत दिनकर पेंढारकर हे रविकिरण मंडळातले लोकप्रिय कवी ! त्यांच्या वाङ्मयाचे मूल्यमापन करताना रविकिरणमंडळाने मराठी कवितेला काय दिले याबरोबर यशवंतांनी रविकिरणमंडळाला आणि पर्यायाने कविताधारेला काय दिले याची चर्चा होणे आवश्यक आहे. यशवंताची स्फुटकविता, त्यांचे खंडकाव्य या सगळया काव्यसंभारातून प्रकट होणारे त्यांचे व्यक्तिमत्त्व अजूनपर्यंत समीक्षकांना पूर्णपणे गवसले आहे, असे म्हणता येत नाही. 'आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास' कर्ते डॉ. अ. ना. देशपांडे यांना तर "नवल वाटते आणि खेदही वाटतो तो एवढयासाठीच की, या 'दऱ्याखोऱ्यातल्या कवी'ने, कणखर वृत्तीच्या श्रीसमर्थांच्या वास्तव्याने पुनीत झालेल्या चाफळच्या परिसरात ज्याचे बालपण गेले अशा या कवीने इतके स्वयंकेंद्रित व्हावे, स्वतःचीच सुखदुःखे उगाळीत बसण्यात समाधान मानावे...' (आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास भाग २ रा : पृ. ३३३–३३४) यशवंतांनी लिहिलेल्या काही कवितांचेच हे एकांगी आकलन आहे. यशवंतांनी लिहिलेली मनःसामर्थ्याची कविता; त्यातील त्यांची दृष्टी याचे खरे आकलन ह्या समीक्षेत नाही. याउलट वा. भा. पाठक म्हणतात–

"वर्तमानातील आजच्या जीवनात पराक्रम करून दाखविण्याची ही आशादायक वृत्ती हेच यशवंतांच्या जीवनविषयक विचारांचे वैशिष्टच होय यात शंका नाही." (आधुनिक मराठी काव्याचे अंतःप्रवाह : पृ. ६२) अशा परस्परविरोधी आकलनातील धूसरपणामुळे यशवंतांचे खरे आकलन घडलेच नाही. आणि त्यामुळे रविकिरणमंडळातील त्याचे वेगळेपणही कुणाच्या ध्यानी आलें नाही.

कुसुमावतीबाई देशपांडे यांनी रविकिरणमंडळाबद्दल म्हटले होते की, कवितेला एक प्रकारे लोकाभिमुख करणे व लोकांच्या रोजच्या साध्या जीवनातल्या अनुभवांना वाचा देणे हे त्यांचे कार्य होते. (कवींची काव्यदृष्टी–मौज–दिवाळी–१९४५.) कवी यशवंतांच्या बाबतीत त्यापलीकडे जाऊन असे म्हणता येईल की, कवितेला लोकाभिमुख करण्यासाठी साध्या साध्या अनुभवातील नाटयात्मता लक्षात

घेऊनच लेखन केले. तांब्यांच्या नाटयगीतात ज्या सूक्ष्म भावानुभवांच्या छटा टिपल्या गेल्या ती सूक्ष्मता त्या नाटयात्मतेत नव्हती. पण वैविध्य, वैचित्र्य आणि विरोधलय या दृष्टीतून येणारी नाटयात्म वृत्ती कवी यशवंतांनी आपल्या कवितेत आणली. त्यात आत्मनिष्ठ वृत्ती होती ती आत्मबद्ध, आत्मगत स्वरूपाची होती आणि वस्तुनिष्ठ दृष्टी नाटय टिपण्यातून निर्माण झालेली होती. त्यात केशवसुतांचा ' अपुल्यामध्ये विश्व पाहुनी मी पूजी आपल्याला ' ही वृत्ती नव्हती किंवा तांब्यांची ' आय सी माय सेल्फ इन ऑल आय सी ' अशी आत्मौपम्य भावनाही नव्हती. स्वपासून दूर असणारे वा ' स्व 'बद्ध असे अनुभव टिपतानाही नाटय टिपण्याची वृत्ती सदैव जागी असल्यामुळे यशवंतांना स्फुट काव्ये, खंडकाव्ये याबरोबर भाव-मालिका काव्याचा स्वरूपातील ' जयमंगला ' वा राजनिष्ठेचा जयजयकार करणारे ' काव्यकिरीट ' अशीही काव्यनिर्मिती करता आली. यशवंतांच्या काव्यदृष्टीचे हे महत्त्वाचे सूत्र लक्षात घेतले म्हणजे संप्रदायवृत्तीपेक्षा हे कार्य कसे वेगळे होते, हे लक्षात येईल.

एकीकडे सौंदर्यवादी वृत्तीबद्दलचे प्रेम आणि दुसरीकडे वास्तववादाची चाहूल अशा वातावरणात नवता, नवध्येयवाद यांनी भरलेली नवतरुण काव्यात्म मनें ' रविकिरणमंडळातून ' काव्यरचना करू लागली. ते केवळ मंडळ नव्हते तर स्त्रीपुरुष भेदाच्या, रूढीसंकेतांच्या अतीत जाऊन नवनवे सामाजिक आणि सांस्कृतिक प्रयोग करू पहाणारे एक व्यासपीठ होते. त्यात व्यक्तिविकासाबरोबर कलाविकासालाही महत्त्व होते. त्यांची सामाजिक जाणीव होती पण ती व्यक्तिकेंद्री वृत्तीतूनच जन्माला आलेली होती. ' नको मज कुणाचे संबंध, तुझाच केवळ आता छंद ' या यशवंतांच्या दृष्टीचा उगमही या व्यक्तिवादी दृष्टीत होता. पण रवि-किरणमंडळाने निर्भय आणि निरपेक्ष व्यक्तिगत प्रेमाचा मुक्तकंठाने पुरस्कार केला ज्यात व्यक्तित्व जागृत होऊ पाहाणाऱ्या नव्या स्त्रीचे मन मोकळेपणाने डोकावू लागले. तांबे यांच्या कवितेत नसलेला व्यक्तिगत प्रेमाचा धीर, मोकळा आविष्कार रविकिरणमंडळाला प्रिय होता. माधव जूलियन आणि यशवंत यांच्या कवितांमधून तो प्रथम दृष्टीस पडतो. त्यातही वास्तवाच्या स्पर्शाबरोबर एक वेगळ्या विरोध-लयीचे नाटय आहे. ' चिन्तेचे ध्वज फडकवणारे ' प्रियेचे कपाळ प्रिय वाटते, असे म्हणताना रूपसौंदर्याच्या नेहमीच्या कल्पनांनी विरोध दाखवणारे नाटयही अभिप्रेत असते. भावनेच्या उत्कटतेपेक्षाही दृश्य टिपताना जाणवलेले नाटय महत्त्वाचे ठरले आहे. ' मालु नको ग ' या गाजलेल्या कवितेत

' गालासन्निध गाल बिलगला
गळ्याभोवती हात चिमुकला
दुजा आईच्या पुशि नयनाला '

हे जे नाटयचित्र उभे राहते आहे ते बाळाला मारणाऱ्या आणि मारता मारता रडणाऱ्या आईच्या भूमिकेतले नाटय आहे. 'आई'सारख्या गाजलेल्या कवितेतही

'चारा मुखी पिलांच्या चिमणी हळूच देई
गोठयात वासरांना ह्या चाटतात गाई' (यशोधन : ४१)

या दृश्यात्म नाटयातून काव्य फुलले आहे.

ध्येयवादी कविता

भावविभ्रमांचे सगळे हलके हेलकावे टिपणारी यशवंतांची प्रतिमा ध्येयवादी कवितेतही त्या अनुभवांचे नाटयात्मदर्शन घडविताना विरोधलयीचा नेमका वापर करते आणि काव्याचे सामर्थ्य वाढविते.

'तुझ्या हाती सुवर्णाचे मिळावे मोल मातीला
हिऱ्याचे तेजही तैसे चढावे गारगोटीला
दिसावी पावलांखाली खड्यांना तारकाकान्ती
विषारी तीक्ष्ण काटयांची तुझ्या स्पर्शे फुले होती'
(यशोधन : ५१ : यशःश्री पायिची दासी)

अशा नाटयाचे वेड जपल्यामुळे भावनेच्या उत्कटतेपेक्षा कल्पनेची भरारीच जास्त लक्षात राहते. सौंदर्यनावीन्याच्या वेडामुळे काव्य सुंदर बनले पण ते भावोत्कटतेच्या उच्च पातळीपर्यंत पोचू शकले नाही. त्यामुळे मनोभंग उत्कटपणे न टिपता 'प्रेमाचा पाडाव जाहला' अशा शब्दजंजाळात भावना विरून गेल्याचे जाणवते.

पण कधी कधी हे अनुभवांमधील विरोधलयींचे पदर विलक्षण वाटतात जेव्हा जेव्हा रोजचे जिणेही कवीला गाणे होऊन भेटते. म्हणून रोजचे पत्नीने पतीचे वाट पहाणेही त्यांना नाटयरूपातच जाणवते–

'दार वाजले, उठून धावले
पाहिले, परंतु नाही कोणी पातले!'
(यशोधन : १४१ : प्रतीक्षा)

प्रेमाचा व्यवहारी जगापासून दूर नेत संजीवनी देणारा अनुभवही त्यांना नाटयरूपातच भेटतो. त्यात भावनांच्या आवर्ताला फारसा वाव नसतो. त्यांची प्रतिभा नाटयात्मदृष्टीने प्रीतिदेवतेचे मनमोहक दृश्यरूप रेखाटण्यातच कधी कधी तल्लीन होते.

'तू तशीच राही उभी जराशी भिंतीशी रेलुनी
घेऊ दे प्रतिमा मज काढुनी

तो किंचित निळसर शुभ्रपणा भिंतिचा
करि हेवा ज ु की तुझ्या अंगकांतिचा
हा मधुन लोंबतो धवल पदर स्कंधिचा
असा जुळुनि संयोग समसमा येइल कधि कोठुनी '

( यशोगंध : ६३ : प्रतिमालेखनी )

**नाटयात्म अनुभव**

या नाटयात्म अनुभवांमधील विरोधलय वा कधी कधी संवादी लयीच्या टिपण घेण्याच्या सोसामुळे यशवंतांचे काव्य हे केवळ वैशिष्टयपूर्ण भूमिकांचे त्याच त्या प्रतिमांच्या आवर्तात फिरणारे मनोगत बनते. त्यात जिव्हाळा असतो पण भावनांचे वादळीपण नसते. स्त्रीपुरुषसामंजस्याचे १९३०–३२ काळात स्वप्नमय भासणारे सुंदर दर्शन असले तरी ते फारसे उत्कट नसतें.

' घरास येशिल जेव्हा दमूनभागून तू
सजेन मी पुसण्याते त्वदीय घर्मजला
श्रवून उत्सुकतेने पराक्रमा तुझिया
हळूच बक्षिस लाभेल गोडसे तुजला '

( यशोगंध : ८८ : संसारसखी )

त्याच संग्रहातील 'दिवंगताचे स्मारक' ही कविताही नाटयसदृश अनुभवातून जळत्या वास्तवाचे चटके देऊन जाते. ज्याच्या नावाने स्मारक उभे झाले त्याची बायकामुले एक रात्रीचा निवाराही तिथे घेऊ शकत नाहीत. अशा अस्सल अनुभवाचा बाज त्या कवितेने पेलला आहे. 'सखीस' सारख्या कवितेत नृपतीचा पाहुणचार घेतानाही तो आपल्या जोडीदारणीच्या कष्टाची आठवण करीत राहतो आणि ते ऐश्वर्य त्याच्या जिवाला रुतत राहते.

मेहार आणि सुहिणी यांची प्रेमकथा सांगणारी 'दुर्दम्यता प्रीतीची' सारखी कविताही कथानाटयावर भर देताना दिसते. मस्तानीचे मनोगत सांगणारी 'एक मस्तानी' सारखी कविताही नाटयमय बनलेली आहे ती यशवंतांच्या याच प्रतिभावैशिष्टयांमुळे.

' मिरवणूक निघता तुझी यशस्वी वीरा
मिरवु दे रथातुन तुझी मंगला दारा ...
स्पृहणीय मला नच ह्यास्तव हे उपचार
जाणते राजसा, मी अपुला अधिकार '

(ओजस्विनी : १५–१६ : एक मस्तानी)

राख म्हणून राहण्यात समाधानी असणारे मुके प्रेम आणि जगाच्या दृष्टीने पवित्र असणारे लौकिक मंत्रबंधनांनी बांधलेले प्रेम यातील विरोध दर्शविणारे नाट्य इथे सहज अवतरले आहे.

राणीचे खरे वैभव कोणते हे वर्णन करताना त्यांच्या कवितेतली राणी सांगते –

'तुजनिकटी मी जणु फुललेल्या पारिजात – तळवटी
तनु अनुभविते तव निःश्वसनी नाना परिमळ–उटी
तव राज्याचा खुशाल बघ तू तपशिल राजेश्वरा
तूच उदारा राज्यच माझे अवघे प्राणेश्वरा'

(यशोगिरी : १०७ : राणीचे राज्य)

किती लांब राज्य पसरले याचे गणित करण्यापेक्षा त्याच्या विशाल वक्षावर विसावण्यात आणि त्याची 'करांगुली', 'कुंतली' फिरत असण्याचे सुख अनुभविण्यात खरे 'राज्य' आहे ही भावना नाट्यातून अशी अवतरलेली आहे.

व्यवहारी जगाची जाणीव लौकिकाच्या पाशांनी बांधलेली आहे म्हणूनच प्रेमाला त्याची पर्वा नाही. हे सांगताना यशवंतांच्या कवितेतला प्रियकर आपल्या प्रेयसीला हे भावनेचे विरोधी नाट्य सांगत प्रीतीबद्दल बोलून जातो –

'लाजू नको, बुजू नको, आत येई ग सरळ
जनतेला वाटेल ते ओकू दे की ग गरळ
मनामनाचे मीलन त्यांना लागते कशाला ?
स्वास्थ्य लौकिक त्यांना पुरे उशापायशाला'

(ओजस्विनी : २६ : मन मराळ पाखरू)

ह्या नाट्यमयतेतून, नाविन्याच्या हव्यासातून कधी कधी विचार करू पाहणारे नवे स्त्रीचे मनही यशवंत यशस्वी रीत्या चितारून जातात. ते प्रेम कमी पडेल तिथे भर घालू पाहणाऱ्या नव्या विकसनशील स्त्रीवृत्तीचे प्रेम आहे. तिला हे प्रेम शोभा म्हणून, अलंकार म्हणून नको आहे. म्हणूनच अबला होण्यापेक्षा तुल्यबला होऊ द्या हे तिचे मागणे आहे. तिला वास्तवाची जाणीव आहे आणि प्रेमाच्या धीरोदात्त वृत्तीचीही. म्हणून ती म्हणते –

काच बाहुलीसमान जपणे का प्रीत तरी ?
आपुलिया सारखेच करणे ही प्रीत खरी !
मज अपुल्या सारखीच करूनी घ्या श्रमजीवी
गेह नव्हे देव्हारा, गृहिणी मी, नच देवी.'

(ओजस्विनी : ६२ : गृहिणी मी नच देवी)

कधीकधी हे नाट्य हृदयातळीच्या भावनांमधील नाट्यमय हेलकावेही रंगवते.

रूळावरून गाडी जाताना पाहून ओसाड माळाला 'क्षणभराचा सोहळा झाला साजरा केव्हढा' असे वाटते. रूळ मात्र उत्कंठा संपली, क्षणभरांची स्पंदने संपली आणि निरर्थक जीवन उरले असे म्हणणारा आहे. त्यावर माळाने दिलेले उत्कट भावनेचा थरार जपणारे उत्तर मोठे सुंदर आहे, त्यात भावनेतील नाट्य आहे आणि संवेदनांचे शाश्वतपणही!

'क्षण भोगाया प्रेमाचा गाढ उत्कट पाऊस
काय तिष्ठण्याचा शोक अरे, युगे अठ्ठावीस ?'
(वाकळ : ३४ : रूळ आणि माळ)

यातील नाट्य दोन विरोधी भूमिकांमध्ये सामावलेले आहे. अशीच एक 'जाई निघून भ्रमर' अशी यशवंतांची कविता आहे. त्यात अनोळखी जाणीवेने प्रेमाचे मोल मोजणारा भ्रमर आणि ओळखीची वेडी भ्रमराच्या पायात न घालता त्याने दिलेले मोलच पूजणारे फूल अशा विरोधी भूमिका भेटतात. आणि देहाच्या धग-धगीबरोबरच मनाच्या तगमगीतील कल्लोळाचे नाट्य निर्माण करून जातात.

'काय एव्हढीच होते तुझिया मी हिशेबात ?
'पोटभरू' म्हणून का तुझा धरिला मी हात ?
तुझ्या हातची म्हणून पूजीन ही मोहोर मी
तुझे उच्छिष्ट सेवून मोहरेन रोमरोमी.'
(वाकळ : ५९–६०–६१ : जाई निघून भ्रमर)

यशवंतांच्या कवितेत नदीही कालव्याच्या फुशारकीला मोठे सुंदर उत्तर देते आणि विरोधी भूमिकांमधील भावनांचे नाट्यवैभव दाखवून देते.

'चालवीते बोलवीते तुझे धनी वेगळेच
तुझ्या वरद हस्तांना जखडले कांच–पेच
वेडी वाकडी चालीन परि स्वतंत्र राहीन
अवखळ सौंदर्याला मूढ म्हणतात हीन
पंजरीच्या पोपटाने रिझविता मालकाला
उगाच का हिणवावे भिरभिरत्या घारीला ?'
(वाकळ : ६९ : कालवा आणि नदी)

**यशवंतांची जीवनदृष्टी**

यशवंत नेहमी निराशेचा सूर आळवतात अशी टीका केली गेली आहे. त्यांची जीवनदृष्टीच 'स्थिर नैराश्याची' आहे असे रा. श्री. जोग म्हणत (अर्वाचीन मराठी काव्य – पृ. १०६). पण ते नियतीवादी नव्हते. जीवन ही सुखान्तिका



अनुक्रमणिका

नाही, माणूसच माणसाच्या दुःखाला जबाबदार आहे असे ते मानत. बधीर करून टाकणाऱ्या दुःखाचे स्वर आणि त्यातून आशावादी सामर्थ्याचा हुंकार अशा नाट्यमय प्रतिभादृष्टीतूनच यशवंतांच्या जीवनदृष्टीचा अर्थ लावता येतो.

| | |
|---|---|
| 'जूं बैसले मानेवरी | चाबूक पाठीवरी |
| ह्या कर्दमी मार्गावरी | चौखूर धावावे परी |
| हाकावया जो बैसला | सत्तामदे तो झिंगला |
| माया–दयेची आर्द्रता | नाही तयाच्या अंतरी' |

झगडणारा आणि आसूड मारणारा या भूमिकांच्या विरोधलयीतूनच 'बक्षिसाच्या पोतड्या' आणि 'माझ्या तनूच्या चिंधड्या' यातील नाट्य निर्माण झालेले आहे. (पाणपोई : २० : गुलामाचे गाऱ्हाणे).

'शरणागती परिस्थितीपुढे – म्हणजे राहणे जिवंत मढे'. (कमण्डलू : १३ परिस्थितीपुढे) असेच ते म्हणतात. मनाच्या सामर्थ्यावर त्यांचा पूर्ण विश्वास आहे.

'द्या आम्हाला सुळीं, जाहलो आम्ही तुमचे बळी
जगी चिरंतन नांदतील परि अमुच्या शाण्णव कुळी
खुडून टाका अम्हास – आम्ही दुर्वांकुर भूतळी
पाताळापर्यंत आमुची परंतु रुजली मुळी'
(ओजस्विनी : ७८ : 'द्या आम्हाला सुळी')

देशप्रेमाच्या भावनेच्या चित्रणातही काळावर पाय रोवण्याची जी वृत्ती आहे त्यात मनाला नवी उभारी देण्याचे बळ आहे, निराशेच्या गर्तेत लोटू पहाणारी हतबलता इथे डोकावतही नाही ही विचार करण्याची बाब आहे.

अंगार झेलून सुखाने धूम्रवलयातून नाचत दरवळणारी गंधित उदबत्ती आपल्या भूमिकेचे अनुभवनाट्य सांगतानाही ज्वलनातून जगण्याचे स्वप्न बाळगते.

'ऐशी मी धुंद फुंद
भरत भोवती सुगंध
अंगारासंगतीत मी सतीच की जाते'
(कमण्डलू : १७ : चुंबुनि अंगार सुखे)

खंडकाव्य, भावगीत मालिकारूप काव्य किंवा महाकाव्य अशा भूमिकांमधून काव्यनिर्मिती करीत असतानाही कवी यशवंतांची प्रतिभा नाट्यगुणांवरच आधक झालेली दिसतें. भावनांच्या चढउतारांचे दृश्यनाट्य, वा भावनाट्याला पार्श्वरूप देणारें वातावरणातील नाट्य यावरच कवींचें लक्ष खिळलेले दिसते.

**जयमंगला**

'जयमंगला' या त्यांच्या खंडकाव्यात प्रत्येक भावगीत हे वेगळे आहे आणि समग्र

कथेचा दुवाही आहे थोडक्यात त्या काव्याचे रूप हे भावगीत मालिकारूप आहे. त्यातही कवी यशवंतांची दृष्टी भावनांच्या नाट्यलयीवर खिळलेली आहे त्याच्या मनोगतातून तिचे दर्शन, तिच्या मनोगतातून त्याचे, त्यांच्या प्रेमाला बांध घालणाऱ्या जुलमी राजसत्तेचे वर्णन यातून नाट्यावर प्रकाश टाकणारी कवीची दृष्टी प्रकटते. नाट्यामध्ये जे परस्पर संवादाचे बळ प्रकटते, त्यातून जे भावनांचे, भूमिकांचे विभ्रम प्रकटतात ते सारे 'जयमंगला' मध्ये अनेकदा दृष्टीस पडतात. अनेकदा सपाट निवेदन असले तरी कवीला मुख्यत: राजकन्या आणि तिला शिकविणारा राजसेवक यांच्या भावनांमधील चढउतारांचेच नाट्य टिपायचे आहे.

'तुजकडे पाहतो पुन्हा पुन्हा
हा काय गडे माझाच गुन्हा ?'

( जयमंगला : ३९ )

यातील भावनांच्या उढउतारात केवळ बाह्य निवेदन नाही तर 'जननांतरीच्या खुणां'चे विलक्षण मोह घालणारे अंतर्नाट्यही तिथे खेळते आहे. त्यातून नृपासमोर ताठ उभे राहण्याचे बळ त्याच्या मनात संचारते आहे.

'त्या हिमांगीच्या भुजा
बिलगल्या गळ्यास ज्या
काय मृत्युचे तयास भिववितील पाश ते ?
मूर्त ती तडिल्लता
झेलिली जये स्वता
कोणतेही अग्निदिव्य त्यास सौम्य भासते !

( जयमंगला : ५९-३० )

प्रीतीने मने सहकंप पावणे हा जिथे गुन्हा आहे तिथे जगण्यापेक्षा मरणेच बरे ही भावना त्याच्या मनात आहे, ती मूळातच नाट्यमय आहे. ज्या महालात अधिकार, स्वातंत्र्य हिरावून घेतो त्यात ऐषारामात जगण्यापेक्षा वधस्तंभावर चढून बंदिवास संपणे हे भाग्यच ! खंडकाव्याला आवश्यक अशा वस्तुनिष्ठ दृष्टीपेक्षा यशवंतांचे आत्मतत्त्वच या भावकाव्यमालिकेला वेगळेपण देऊन गेलेले आहे.

अर्थात् ही भावमालिका मुक्त नाही; मुख्य ओवल्या गेलेले कथेचे मध्यत्व हा तिचा केंद्रबिंदू आहे.

### भावनांचे नाट्य

भावनांच्या नाट्यमयतेवरच दृष्टी खिळविल्यामुळे यशवंतांचे 'काव्यकिरीट'-सारखे जयसिंह गायकवाड महाराजांचे राज्याभिषेकाचे काव्यही केवळ प्रासंगिक

ठरत नाही. कारण यात राजाच्या मनात यावेत अशा भावनोर्मीचे आणि प्रजेच्या अंतरंगात घुसळणारे भावौघ यांचे नाटचपूर्ण दर्शन आहे. तुरुंगातल्या कैद्यांची मुक्तता वर्णिताना पुन्हा हे तुरुंगच उरू नयेत ही भावना मुख्य आहे. ज्याला शिरावर मुगुट हवा आहे, बसायला तख्त हवे आहे त्याने सामान्य जनतेला विसरायचे का? हा कवीचा सवाल आहे. 'स्वराज्यी अशा विषमतेला द्यावया हवी मूठमाती' असे सुंदर स्वप्न कवीच्या डोळ्यात फुलते आहे.

'बंदीशाळा' या खंडकाव्यातही विधवा गुणिला आणि तिचा निर्व्याज पोर संजीव यांच्या भावनांमधून जग हेच बंदीशाळा आहे हे तत्त्व नाटचपूर्णरीतीने कवी यशवंत उभे करू पाहतात. पण त्यातील नाटच हे पूर्ण भावनामय असे न उरता घटनामध्ये, दुष्ट जगाच्या कठोर कपटी नीतीत, दडलेले आहे असा ठसा पडतो. 'डोके वरती काढू देणे हे न जगाचे शील' या व्यवहारी जगाच्या अमर्याद भेसूरपणाने एका कोमल मनाचा चोळामोळा होतो आहे. शेवटी गुणिलेला भेटतात ती या रणशय्येवर कायमच्या निजलेल्या मुलाला मिळालेली शौर्यपदके! खरे तर यात भावनांचे वादळी जग आहे, पण 'जग हे बंदीशाळा' या सूत्राच्या वारंवार उच्चारणाने ते नाटच सूक्ष्म न बनता ढोबळ बनलेले आहे.

'मुठे लोकमाते' या दीर्घकाव्यात मात्र प्रलयंकरी विनाशातून प्रकटणारे भावनांचे तांडव प्रकटणारे नाटच पानोपानी भेटते. त्यात भावनांचे आक्रंदन आहे, शाश्वत भासणारे सारे डोलारे ठरून सर्वभक्षक काळाच्या पोटात स्वाहा झाले या आक्रोशामागील नाटच आहे.

जीवनदायिनी मुठाच जीवनविनाशक ठरली हे वास्तवाचे भयाण विरोधनाटच अनेक सुंदर कल्पनामधून फुलत गेलेले आहे.

पण ह्या विराट जगड्व्याळ मृत्यूदर्शनाने यशवंतांची आशाबद्धता नष्ट होत नाही. अजूनही ह्या हुंदक्यांच्या मागे, नवी स्वप्ने जपणारे मन आहे.

पंचेचाळीस पानाच्या 'मुठे लोकमाते' ह्या छोटचा पुस्तकात काव्य कथामय बनत नाही, कथात्मता काव्यसदृश बनत नाही तर विनाश आणि उत्पत्ती यातील नाटचच काव्य बनले आहे.

### छत्रपती शिवराय

अशा नाटचपूर्ण दृष्टीने आत्मनिष्ठा व वस्तुनिष्ठेच्या ऐक्यातून फुललेल्या नाटचनिष्ठेने महापूजेची सांगता या रूपातच छत्रपती शिवराय प्रकटले आहेत. दऱ्याखोऱ्यातून आलेला हा कवी डोंगरांना कथा ऐकवा म्हणू लागतो आणि शिवकथा साकार घेते. या मूळ कथाकाव्यबीजातच नाटच आहे.

शहाजी, जिजाबाई, त्यांचे स्वप्न साकार करण्याचे संकल्प आणि भोवतालची

प्रतिकूल अरण्यासारखे कराल वास्तव यातून ही नाट्यवेधी प्रतिभा मोठ्या दिमाखाने नटली आहे. जिजाईचे वात्सल्यच अशा तेजस्वी स्वप्नांनी मोहोरलेले आहे.

भव्य कल्पना, भावनांना स्पर्श करण्याची हातोटी, आणि इतिहासाकडे सौंदर्यपूर्ण नजरेने पाहू शकणारे जिजाईचे मन यामुळे स्वातंत्र्याकांक्षा चेतविणारे, स्वप्न पहाणारे रंगवले आहे.

रूपबंधाचा विचार केला तर आनंदवर्धन, रुद्रट, भोज आदींनी 'महाकाव्याच्या रसात्मकतेवरच' भर दिलेला आहे, असा डॉ. द. भि. कुलकर्णी यांचा निष्कर्ष आहे. ( महाकाव्य : स्वरूप व समीक्षा पृ. ११ ) असाधारण नायक, जीवनदर्शन सालंकृत अभिव्यक्ती ही महाकाव्यवैशिष्ट्ये येथे दिसतात. फक्त सुखपूर्ण शेवट मात्र येथे नाही. याचे कारण यशवंतांनी तंत्रदृष्टया 'महाकाव्य' हा प्रकार हाताळलेला नाही. महाकाव्य हे खरे तर निवेदनातून साकार होणारे वाङ्मयरूप आहे. पण यशवंत निवेदनापेक्षा निवेदनातील नाट्याला महत्त्व देतात. कधी कधी ते नाट्य कथाबीजात असते, तर कधी प्रसंगाकडे वेगळेपणाने पाहण्यात असते तर कधी गतकालीन वैभवाचे भावनामय आकलन असे स्वरूप आल्यामुळे निर्माण होणारे असते. 'प्रदीर्घ व महान अंतरगाचे काव्य' अशी महाकाव्याची व्याख्या डॉ. ह. कि. तोडमल यांनी केलेली आहे. ( अर्वाचीन मराठीतील खंडकाव्ये : पृ. २६–३०.) नाट्यात्म अर्थाने पाहिले तर 'छत्रपती शिवराय' हे बऱ्याच ठिकाणी संवादात्म बनले आहे. त्याचे अंतरंग 'महान' आहे ते महान माणसाची कथा ह्याच अर्थाने नव्हे तर ते माणसाच्या अंतरंगाचा वेध घेण्याचा प्रयत्न या अर्थाने होय. भावकाव्याप्रमाणे महाकाव्य हा आत्मनिष्ठ वाङ्मयप्रकार नाही. पण 'छत्रपती शिवराय'मध्ये जीवनाच्या विशाल दर्शनापेक्षा शिवाजी, जिजाऊ, शहाजी, संभाजी या व्यक्तिदर्शनातील नाट्यच जास्त टिपलेले दिसते. महाकाव्य हा व्यापक अर्थाने 'इतिहास, धर्म, तत्त्वज्ञान आदींना आपल्या पोटात घेणारा असतो' हे डॉ. द. भि. कुलकर्णी यांचे मत विचारात घेता यशवंतांचे हे काव्य उणे ठरते. (महाकाव्य : स्वरूप व समीक्षा पृ. ११८ ) इतिहासाला ते पोटात घेत असले तरी धर्म, तत्त्वज्ञान यांना समावेशक स्पर्श त्या काव्याला करता आलेला नाही. महाकाव्यात कवीच्या वा महाकाव्यातील नायकनायिकांच्या वैयक्तिक सुखदुःखाचे सूर नसतात; तर 'या व्यक्ती समाजजीवनाशी समरस झालेल्या, त्यातील निर्णायक व्यक्ती असल्यामुळे त्या व्यक्तीचे सुखदुःख म्हणजे त्या सकल समाजाचेच सुखदुःख असते' असे डॉ. द. भि. कुलकर्णी यांचे मत आहे. त्या दृष्टीनेही महाकाव्यातील पात्रांना येणारे साधारणीकृत स्वरूप येथे नाही.

महाकाव्याचे हे आंतरस्वरूप आणि यशवंतांचा कविदृष्टीचा धर्म ह्या गोष्टी

लक्षात घेता, त्यांना संपूर्ण अलिप्तता साधलेली नाही हें स्पष्टच होय. लौकिक आत्माविष्काराच्या पलीकडे वा भावनांच्या, प्रसंगांच्या नाट्यीकरणापलीकडे न जाणारे हे काव्य महाकाव्य मानावे की नाही हा प्रश्न पडतो. महाकाव्यातील सर्ग, अलंकार, रस, ऋतू, चंद्रसूर्याचे उदयास्त इत्यादी वर्णनसंकेत न पोळता व्यक्ति-दर्शनाच्या भोवती यशवंतांचे मन घुटमळते. ह्या महाकाव्याने वीरमहाकाव्यपरंपरेला उजाळा दिला आणि प्रसंगी मुक्तछंदाचा वापर करून पारंपरिक बंधनांना वेगळा छेद दिला. इतिहास कल्पिताचे मिश्रण आणि शोकान्त. याबाबतीत यशवंत पाश्चात्त्य महाकाव्यांमधील काही भाग स्वीकारतात. मनोविश्लेषण, मूलगामी आकलन, विशालता अशा गुणांना जीवनभाष्याची जोड देतात. त्यांची कलात्मक स्वयंप्रेरणा प्रभावी आहे. सांस्कृतिक संचिताकडे नाट्यात्मदृष्टीने पहाणारे महाकाव्यसदृश काव्य असे त्याचे वर्णन करावे लागेल. प्रचंड रूपदर्शनाचा आवाका डोळ्यापुढे ठेवून यशवंतांनी प्रसंगचित्रे व व्यक्तिचित्रे रेखाटली आहेत. भव्यता व भावपूर्णता यांचा मेळ घातला आहे.

अखेरच्या सर्गात केलेला मुक्तछंदाचा सुंदर वापर म्हणजे शिवबाचे ' मृत्युस्तोत्र ' आहे.

> अगा मृत्यो,
> माझ्या पाऊलखुणांचे तूच कौतुक केलेस
> काटेखांदीही घेऊन मजला तूच मिरवलेस
> माझ्या क्षेमकुशलाचे श्रेय तुलाच आहे
> मी जाणून आहे.
> म्हणूनच मी कृतज्ञ आहे, कृतज्ञ आहे.
> अखेरचा जय माझाच आहे.

एकूण १३७०० पद्यपंक्तींचे हे खंडकाव्य. बखरभाषेचा शिडकावा, काही भाषा-वैशिष्ट्ये यामुळे रगत वाढली असली तरी त्या काळाचे भान राखता आलेले आहे असे म्हणता येत नाही. निगाहदाश्ती, बुनियाद, फिकिरमंद हे शब्द जाणूनबुजून अवतरल्यासारखे वाटतात. आणि त्यामुळे इतिहासाचे मौन बोलते करण्याचे श्रेय देता येईल या पातळीवरील खंडकाव्य यशवंत लिहू शकले एवढेच फक्त म्हणता येईल.

खंडकाव्य साधूनही महाकाव्यनिर्मितीसाठी यशवंत अपुरे का पडले असा प्रश्न विचारला जातो. वस्तुनिष्ठ निवेदनप्रकारातून काव्यनिर्मिती करता न येणे हे त्याचें एकपरीचें उत्तर आहे. इंग्रजीत हडसनने ' एपिक ऑफ आर्ट'ला ' एपिक ऑफ ग्रोथ'पेक्षा कमी महत्त्व दिलेले आहे. त्यापेक्षाही सी एम बॉवरा यांनी ' रोमँटिक

एपिक ' ह्या प्रकार मानलेला आहे. ( महाकाव्य स्वरूप व समीक्षा : पृ २०९ ) रंजकता आणि रसात्मकता याला त्यात महत्त्व असते. ' छत्रपती शिवराय'ला नवे सौंदर्यवादी महाकाव्य असे वाटते. अर्थात सौंदर्यवादी या शब्दातून ' अवास्तव ' असा अर्थ अभिप्रेत नाही. वास्तवाचा नवा अर्थ लावू पहाणारे महाकाव्य हे अभिप्रेत आहे, म्हणावेसे वाटते.

यशवंतांची संपूर्ण काव्यदृष्टी अशी आत्मनिष्ठ, आणि वस्तुनिष्ठ ऐक्यातून आणि विरोधलयीतून सौंदर्यदर्शन, भावदर्शन घडवू पाहाणारी म्हणून ' नाट्यात्म ', नाट्य-सदृश आहे. म्हणूनच दुसऱ्याच्या मनाचा ठाव घेऊ पाहणाऱ्या वृत्तीमुळे त्यांना खंडकाव्य लिहिता आले, स्फुट काव्यात बरीच कामगिरी बजावता आली आणि महाकाव्यातही याच नाट्यमयतेमुळे इतिहासाच्या मौनाचे गूढ सोडविता आले. नव्या युगाची चाहूल घेत नव्या युगाला सामोरे जाऊ पाहाणाऱ्या मनांमधील भाव नाट्यनिष्ठ दृष्टीमुळे टिपता आले.

मनाला स्त्री, प्रेम, जीवन याबद्दल एक नवी प्रयोगशील भूमिका घेता घेता व्यक्तिवादी सुधारणांच्या उद्‌घोषात त्यांची साहित्यनिर्मिती विशिष्ट रूपाची बनली. अद्‌भूतरम्यतेला वास्तवाची जोड देत, परंपरा टाळीत जाऊ पहाणारी तत्कालीन तरुण कवींची मने सौंदर्याकडे केवळ स्वप्नरंजन म्हणून पहात नव्हती. व्यक्तिस्वातंत्र्याच्या पोटतिडिकेतून समाजाचा निषेध आजवर झाला नव्हता, तो रविकिरणमंडळाने केला.

### सामर्थ्य आणि मर्यादा

यशवंतांनी तांब्यांच्या काही वरवरच्या गोष्टी टूम म्हणून स्वीकारल्या. उदा. जाति, वृत्तांची नावे, राग वगैरे किंवा माधव जूलियनांच्या अनुस्वार उच्चाटनाचा स्वीकार केला. त्यामुळे त्यांचे काव्य नवे काय करू शकले हे ह्या झापडांमुळे लवकर लक्षात आले नाही. व्यक्तिदुःखाला वाचा फोडता आली तरी अन्यायाविरुद्ध बंड पुकारता आले नाही. वैयक्तिक दुःखाला वाचा फोडणे या दृष्टीचे स्वरूप त्यामुळे ' मध्यमवर्गविषयक त्यांची ही कौटुंबिक गीते ' एवढ्याच रूपात मर्यादित वाटले. भ. श्री. पंडित म्हणतात तसे त्यांचे मन ' भावगीतकाराला अनुकूल ' होते. नाट्यमय दृष्टीमुळेच यशवंतांच्या आप्तविस्तारात अनेक नव्या दृष्टिकोनांचा आणि जुन्या आदर्शांचाही समावेश झालेला दिसतो. त्यामुळे त्यात व्यक्तिवादाचा कलाविलास, स्वप्नरंजनाला वास्तवाभिमुखतेची जोड अशा गोष्टी साधलेल्या दिसतात.

यशवंतांच्या आकलनाद्वारे रविकिरणमंडळाचे नवे आकलन होऊ शकेल.

(इर्विन हॉस्पिटलमागे, कॅंप नं. २, अमरावती ४४४६०२)



अनुक्रमणिका

# मराठी कवितेतील एकाकीपण

प्रा. निर्मला मोने

मराठी कवितेत आमूलाग्र क्रांती करणारा कवी म्हणून आपण केशवसुतांचे नाव घेतो. आधुनिक कवितेचा जनक म्हणताना आधीच्या पंडिती कवितेपेक्षा सगळ्याच बाबतीत वेगळे रूप केशवसुतांच्या कवितेने धारण केले होते. तिचे पूर्वाभिमुख रूप बदलून तिचे तोंड आजच्या काळाकडे वळवले होते. इंग्रजीचा अभ्यास केल्यानंतर, युरोपातील समाजव्यवस्था, संस्कृती पाहिल्यानंतर कवितेचा मध्यबिंदू पौराणिक अतिमानवी नायकांकडून आजच्या सामान्य माणसांवर केंद्रित केला होता. यासाठी पल्लेदार शब्द, खंडकाव्यासाठीचे चरित्रपर विषय बदलले, कविता आजची केली. हे श्रेय केशवसुतांचे असले तरी कुठलाही एवढा मोठा बदल एका क्षणात होत नाही. अशा प्रकारचा बदल करणारे केशवसुत पहिलेच नव्हेत.

केशवसुतांनी स्फुट कविता केल्या, पण त्याआधी विष्णु मोरेश्वर महाजनींनी इंग्रजी कवितांची (स्फुट) भाषांतरे मराठीत आणलेली आहेत. म. मो. कुंटे यांनी काव्याचा नायक राष्ट्रीयविभूती कल्पित संस्कृत कथांतून वा पुराणातून न घेता राजा शिवाजी हा इतिहासातून निवडला. यक्षकिन्नर गंधर्वदेवांपेक्षा माणूस निवडला. चिंतामणी पेठकरांनी गंगावर्णन लिहिताना गंगेच्या पारलौकिक महत्तेपेक्षा तिच्या ऐहिक उपयुक्ततेवर भर दिला. तरीही कवितेतील क्रांतीचे श्रेय यांच्यापैकी कुणाकडे जात नाही. कुंट्यांनी तर अतिरेकी भाषालालित्यावर आक्षेपच घेतला आहे. सामाजिक आशयाच्या प्रकटीकरणाला सजवलेली भाषा कशाला असे ते स्पष्टच विचारतात. कुंटे हे कवी म्हणून फार थोर नसले तरी नक्कीच द्रष्टे होते. पण केशवसुत हे मोठेच कवी. या द्रष्टेपणाबरोबर आजच्या वास्तवाचे भान, सामाजिक अन्याय, विषमता यांची जाण त्यांना आहे. कवीचे स्वातंत्र्य जपण्यासाठी ते जागरूक आहेत. कवीचं कवी म्हणून काही जीवितकार्य असतं, मिशन असते. याची जाणीव त्यांना आहे. म्हणजेच कवितेला काळानुसार वळवताना पुढे कविता हे साध्य न राहता तिचा साधन म्हणून ते वापर करू शकतात हे त्यांचे क्रांतदर्शित्व आहे. नव्या मनूचा नव्या दमाचा शूर शिपाई असल्याचा दावा करताना विज्ञानाने



अनुक्रमणिका

आजच्या ज्ञानाच्या कक्षा विस्तारल्याची त्यांना जाणीव आहे. त्याचा वापरही त्यांनी केला आहे. 'पद्यपंक्तीची तरफ' किंवा 'कठीण शब्द या धोंड्यानी करितो हाणाहाण' असे म्हणणे हा कवितेच्या प्रचलित शिष्टमान्य रूपाला धक्काच आहे. ही क्रांती केशवसुतांनी केली. त्यांच्यानंतर ती धुरा तितक्या समर्थपणाने पेलली ती मर्ढेकरांनीच. केशवसुत ते मर्ढेकर या शतकोत्तर प्रवासात कवितेच्या या नव्या म्हटलेल्या रूपाला साचलेपण आले, पुन: संकेतांच्या चाकोऱ्या मळल्या गेल्या. शंभर वर्षात काळाबरोबर समाजाचे, माणसाचे, आदर्शांच्या प्रतीकांचे रूप इतके पालटले की पुन्हा कुणा क्रांतिकारक कवीच्या उदयाची गरज भासू लागलीच होती. ती मर्ढेकरांनी पूर्ण केली.

केशवसुतांनी केलेल्या क्रांतीची बीजे जशी आधीच्या कवीत दिसली तशीच मर्ढेकरांच्याही बाबतीत दिसली. मर्ढेकरांवर माधव जूलियनांचा खूप प्रभाव आहे. दोघेही विलक्षण संवेदनक्षम. त्यातून साधेसोपे अस्सल मऱ्हाटमोळे छंद. अभंग, ओवी, हे मर्ढेकरांनी स्वीकारले आहेत. ही सुरुवात त्यांच्याआधी अनिलांनी केली. भाषा आणि विषय या दोन्हीवरील पकड यामुळे मर्ढेकरांच्यात अल्पाक्षरत्व आले आहे. भोवतालच्या भयाण आणि विद्रूप वास्तवाची अस्वस्थ करणारी जाणीव वेगाने अंगावर चालून आलेली यंत्रसंस्कृती आणि तिचा अपरिहार्य परिणाम म्हणून विशेषत: महानगरात माणसाला आलेले क्षुद्रत्व, नगण्यत्व, त्याबरोबरच फार मोठ्या अपेक्षांनी आणि जबरदस्त किंमत देऊन मिळालेल्या स्वातंत्र्यानंतर समाजात निर्माण झालेल्या अपप्रवृत्ती या गोष्टी त्यांच्या काव्यांत फार ठळकपणे उमटल्या आहेत. या नव्या जाणिवा व्यक्त करायला उपलब्ध आणि सर्वमान्य शब्दप्रतिमा कमीच पडतात हा अनुभव आहे. नव्या प्रतिमा घडवणे आवश्यक आणि अपरिहार्यच ठरते. अशावेळी – त्यामुळे अन् रोबोंचा खडा पहारा, पंक्चरली जरी रात्र दिव्यांनी, शतशतकांच्या पायलन्सवरती, वन बांबूचे पिवळ्या गाते, यासारख्या प्रतिमा निर्माण झाल्या. त्या अपरिचित असल्या तरी समर्पक होत्या हे मान्य करावेच लागते.

समाजातील दांभिकतेचीची ओळख पटल्यावर पारंपरिक आदर्शांना आणि त्यानिमित्ताने परिचित संदर्भांचे, लोकांच्या ओठावर सतत खेळणाऱ्या ओळींचे विरूपीकरण, विडंबन करून धक्के देणे मर्ढेकरांनाही आवश्यक वाटले, पण तोवर 'थांब उद्याचे माऊली' किंवा 'दंवात न्हालीस भल्या पहाटे' अशा पारंपरिक आदर्शांना जपणाऱ्या कोवळ्या भावबंधांचं नेमकं मर्म टिपणाऱ्या कविता मर्ढेकरांनी लिहिल्या आहेतच. 'सौंदर्यवादी संदर्भाची मोडतोड करणाऱ्या 'डोळे हे फिल्मी गडे', 'घनश्याम सुंदरा, गिरणोदय झाला', 'गयागोपीचा उतरे राजा, सुटला म्हणती सारे प्राणी', 'अजुनी चालतोचि वाट, माल हा खपेना' अशा ज्ञात कवितांचं विडंबन मर्ढेकरांनी केले. यामुळेही त्यांच्याबद्दल गदारोळ उठला. पण मर्ढेकरांना समाजात

आदर्शांची दुसरीच बाजू जाणवली त्यामुळे त्यांची ही विडंबने लोकांच्या डोळ्यात चरचरीत अंजनच आहे. युद्धोत्तर वास्तव जीवन त्याची कितीतरी विरूपे, ही स्वप्नभंग करणारीच होती. स्वातंत्र्य कशासाठी या प्रश्नाचे उत्तर निराश करणारे होते. मर्ढेकरांच्यावर अनेक आक्षेप केले जातात. उघडी नागडी वर्णने, (निवरट किरटी हाडबंडले अशा बायका ...) अति स्पष्टवक्तेपणा यांनी वाचक दचकले हे तर खरेच. मर्ढेकरांनी वैफल्यवाद, निराशा, अश्लीलता कवितेत आणली असा आरोप त्यांच्यावर केला जातो. पण त्यांच्या संवेदनक्षम कविमनाला वास्तवाच्या दर्शनाने बसलेल्या धक्क्याचा हा उग्र आविष्कार आहे. तो धक्का त्यांनाच बसला, त्या आधी सेज पाहूनही, कवी म्हणवणाऱ्या अनेकांना काव्य आणि वास्तवातली ही विसंगती जाणवली नव्हती हा मर्ढेकरांच्या तरल संवेदनक्षमतेचा पुरावा आहे.

क्रांतिकारक कवी म्हणून मर्ढेकरांचं हे वैशिष्टय लक्षात घेतल्यावर दुसरी गोष्ट जाणवते ती म्हणजे त्यांना जाणवलेला एकटेपणा. पण मर्ढेकरांच्या सगळ्या कवितेचा विचार करताना जाणवते की हा एकटेपणा त्यांच्या घडणीतच आहे. एलिअनेशन–परात्मभाव वा तुटलेपण असे म्हणता येईल. त्याचा विचार आज जग-भरच्या कवितेत जाणवतो. कशाशीही बांधिलकी नसल्याने येणारे सुटेपण – हा विचार तसा नवा नाही. त्याचा धागा पार जुन्या कवितेपर्यंत जाऊन पोहोचतो. हे असे एकटेपणा जाणवणे ही एक सनातन प्रवृत्ती आहे. ती बहुतेक ठळक कवीत कमीअधिक तीव्रतेने सर्वत्रच जाणवते.

अध्यात्मातही त्याची जाणीव आहे. त्याने तो स्वीकारलाय. तो धागा मर्ढेकरात आहे एवढेच नव्हे तर आजवर सगळ्यात तो दिसून येतो. मुळात परब्रह्मही एकटे–त्यामुळे बेचैन आहे ही कल्पना आहे. 'स इह एकाकी न रमते, स द्वितीयं ऐच्छति' या कल्पनेतून पुढे माया–ब्रह्म आणि त्यातून हे जग निर्मिती – या एकटेपणाच्या जाणीवेतूनच सहनौ भुनक्तु, सहनावक्तु ही गरज निर्माण झाली. एक असणाऱ्याला अनेक असण्याची इच्छा त्या एकटेपणातून सुटण्यासाठीच. 'एको ऽहं बहुस्याम्' – संतांनाही अध्यात्माची ओढ ही या एकटेपणातून सुटण्यासाठी, परमेश्वराचा आधार घेण्याच्या कल्पनेतूनच. मुळात भज् या धातूचा अर्थ भजणे – भक्ती करणे याबरो-बरच विभक्त, भाग करणे हाही आहेच. म्हणूनच संतकवींना – वारकऱ्यांना अद्वैताची बैठक असली तरी द्वैताची त्यांना गरजच आहे. ती अगदी मानवी आहे. म्हणूनच परमेश्वराच्या निर्गुणतेची जाणीव ठेवूनही सगुण भक्तीचेच आकर्षण, ओढ त्यांना आहे. तुकाराम म्हणतात – 'एकला निःसंग – फाकती मारग' इथं वाटणारी ही एकटेपणाची भीती – यातूनच व्यभिचारी प्रेमाचे प्रतीकही स्फुरलेले आहे. भांडणे, रुसणे हे आविष्कार, साथीदाराची आवश्यकता सुचवणारेच. एकाने द्वैतरूप घेऊन मग एकत्र येणे ह्या कल्पनेमागे भक्तच एकटा असतो असे नव्हे तर

देवही एकटा असतो. म्हणूनच भक्ताचे अप्रूप त्यालाही आहेच त्यामुळेच 'तयाते माथा धरू ... माथा मुकुटु करू ... तयाचि टाच हृदयी धरू आम्ही, किंवा 'तो पाहावा हे डोहळे, म्हणौनी अचक्षुसी मज डोळे...' असे ज्ञानेश्वरांनीही वर्णन केले आहे. मोक्षाच्या कल्पनेमागेही व्यक्तिगत एकटेपणातून वेगळे होऊन ईश्वराचा आधार घ्यायचा ... शेवटी अध्यात्माचा ध्यास काय किंवा कोणताही अन्य मोठा ध्यास काय – वेगळा मार्ग चोखाळणारा हा एकटाच होतो. त्यासाठी दुसरा बरोबर हवा, सोबत हवी. सामान्यांची संगत नकोशी वाटते... म्हणून ... रुचे एकांताचा वास असे म्हटलं तरी माझे मज भेटो कोणी हा टाहो आहेच.

ही माणसाच्या मूलभूत एकाकीपणाची भावना रामदासांसारख्या सर्वाधिक लोकसंग्रह करणाऱ्या संतातही दिसते. सामान्यांचा कळवळा असल्याने सतत त्यांच्या भल्याचे चिंतन केले. दासबोध सांगितला, पण करुणाष्टकात हा व्याकुळ करणारा एकटेपणा प्रकट होतोच. करुणाष्टके हे तर आजच्या कवितेचेच रूप मानायला हवे. मानवी नात्यांची क्षणभंगुरता, त्याच्या भावबंधाची क्षणिकता जाणवल्यावर 'सकळ जन भवाचे, आथिले वैभवाचे म्हणौनी करुणा हे बोलतो दीन वाचे' असे म्हटले आहे. लोकांना कार्यप्रवण करणाऱ्या रामदासांच्या आतल्या रामदासालाही जाण आहे हे त्यांनी उदासपणाने मान्यच केले आहे, या एकटेपणावर उपाय म्हणून संतांनी श्रद्धेने ईश्वर जवळ केला.

पंडित आणि शाहीर कवींच्या काळात कविता स्वतःपासून दूर गेली. बाह्य-वर्णनातच रमली पण इंग्रजी राजवटीत इंग्लिश कवितेच्या अभ्यासानंतर केशवसुतांना पुनः ही बालकवी, जाणीव झालेली दिसते. निर्मळ निसर्ग, शैशव ही दुरावतात, परमेश्वरालाही पर्याय सुचू लागले. स्त्रीकडे पहाण्याची दृष्टी इंग्रजांच्या परिचया-नंतर बदलली. ती निव्वळ भोगदासी न रहाता स्फूर्तिदेवता झाली. पुरुषाला शारीर आणि मानसिक दोन्ही पातळ्यांवर साथ देणारी स्त्री आणि तिचा शृंगार यावेळच्या कवींनी स्पष्टपणानं मान्य केला आहे. संवेदनाक्षम व्यक्तीला वैचारिक पातळीवरही सतत जाणवणारं हे एकटेपण आहे. निसर्ग, ध्येय, स्त्रीप्रेम यामुळे ते काहीसे कमी झाले – यामागच्या इहवादी दृष्टिकोनामुळे सुसह्य वाटलं तरी त्यातूनच पुढे प्रेमभंग आणि पुन्हा एकलेपण येत गेलं. तसं व्यवहारात निसर्गाकडून तुटावे लागले. प्रौढ वयात व्यवहाराच्या रुक्ष गुंत्यात अडकल्यावर शैशवातले मुग्धत्व गेले. 'लुटुपुटूच्या संसारी ... ते सुख खऱ्या घरीही न येता हाता' इथे ते जाणवतेच. वास्तवाचा परिचय अधिक रोकडा तो माणसातली कोवळीकच काढून येतो. ( तुझ्या माझ्यामध्ये आहे रुंद दरी रे )

साहित्यात तरी मनाचे रितेपण बुडवायला स्त्रीप्रेम हे चांगले साधन मिळाले होते. त्यामुळे यापुढील काळात प्रेमाची कविता बहरली. अर्थात् अनुषंगाने प्रेम-

भंगाचीही. गडकऱ्यांमध्ये अतिशय बुद्धिमान कवीचा, तर बालकवीत अतिशय संवेदनाक्षम व्यक्तीचा एकटेपणा दिसून येतो. अतिशय बुद्धिवादी, ध्येयवादी, तरल संवेदनांच्या माणसांना एकटेपणाचा शापच आहे.

जोडीचा महिमा असे चहुंकडे धिक् सर्व जोडीविणे
लाभे जोड तरी कुणास न रुचे शून्यांतलेही जिणे
किंवा
जगावाचुनी लाभतीस तर हे जग मी केले असते
तुझ्यावाचुनी जग परि आता हो असत्याचे नसते

दुर्लभतेवरूनही जीव ओवाळून टाकण्याची वृत्ती त्यात आहे. आत्यंतिक गुणवत्तेमुळे लोकांपासून तुटल्याचे दुसरे ढळढळीत उदाहरण म्हणजे माधव जूलियन. बुद्धिमत्ता, संवेदनक्षमता, ज्ञानासक्ती सर्वच बाबतीत सामान्यांहून वेगळा, उंचावरचा या व्यवहारी जगात न शोभणारा आउटसाइडर जगाची बांधिलकी न मानणारा सामान्यांच्या आणि व्यवहारी जगाच्या जीवितविषयक कल्पना, आदर्शवाद, समकालिनांच्या जीवितसाफल्याच्या कल्पना न मानणारा हा कवी आहे. त्यांच्या प्रेमविषयक कल्पनांनीही त्यांना अधिक तुटक बनवले आहे. अपार्थिव प्रेम आणि व्यक्तिगत आलेले अनुभव यांमुळे माधव जूलियन ही स्वप्नाळू, ध्येयवादी माणसाची शोकांतिका बनली आहे. वेगळेच दुदुंभिनाद त्यांच्या कानावर येतात. अशा मोठ्या कलावंताच्या नशिबी येणारे एकाकीपण त्याची चित्रे, तुटलेले दुवे स्फुट कवितात दिसतात. पुढे 'सुधारक'मध्ये तर त्याला एक जळजळीत उपरोधाचा फाटा फुटलेला दिसतो.

प्रेमाची तृप्तता ज्यांच्या नशिबात लाभली, त्यात ना. वा. टिळक, तांबे, बोरकर या सर्वांना एक आध्यात्मिक पदर जगाकडे अधिक समंजसपणे पहाण्याचा दृष्टिकोन देतो. कुसुमाग्रजातही प्रेम आणि समाज हे द्वंद्व दिसते. उजेडात दिसू वेडे... इथे धुंद प्रेमातही ते सावध आहेत. हा वास्तवाचा स्पर्श आहे. पण त्याबरोबरच 'सर्वच इथे नश्वर' तर प्रीती तरी शाश्वत कशी असणार ? म्हणून जाणाऱ्या क्षणावर तुझी नाममुद्रा रेखांकित असणं तुला पुरेसं व्हावं हा समंजस सुजाणपणा आहे.

वाळवंटी तू एक पदाती ना कुणाची सोबत ना सांगाती
पायदळी पेटेल आग उद्दाम, शिरावर ऊन

मर्ढेकरांना ही पोकळी तीनचार पातळ्यांवर जाणवते. ते लिहू लागले त्या काळात परमेश्वर आपण गमावला. विज्ञानाला सर्वस्व समजताना त्याच्या रेट्यापुढे परमेश्वर आपल्या जीवनातून हद्दपार झाला. (तो प्रयोगशाळेत सापडत नाही म्हणून नाही. हा रोखठोक हिशेब) पण नंतर विज्ञान अपुरं वाटल्यावर, असल्याचं

जाणवल्यावर दिलासा देणारा भोळा भक्तिभाव आपण हरवल्याची जाणीव, ती पोकळी हतबल करते. विज्ञाननिष्ठ जगात यंत्रयुगीन मानवाचं रूप क्षुद्र, नगण्य आहे. विज्ञान देवाची जागा घेऊ शकत नाही, हे कळल्यावर ज्ञानाचं कुंपण स्मशानात ही कबुली द्यावी लागते आणि कळवळून शेवटी—

> दिल्या जरी तुज शिव्या कितीही, तुझ्याच पायी आलो लोळत
> मुठीत धरूनी नाक लाविले, तव डोळ्यांशी डोळे पोळत
> फक्त तुझी जर दगडी भिवई — चळेल थोडी डोळ्यांदेखत

असे म्हटलं आहे. कुसुमाग्रजही ' मी हे वितंड केले म्हटले तू नाहीस, आहेस म्हणे मन माझे तू आहेस ' असं कळवळून म्हणतात.

विज्ञानात जितके प्रगत व्हावे तितक्या त्याच्या मर्यादाच व्यक्त होत राहतात. म्हणून तर येणाऱ्या दिवसागणिक हे एकटेपण अधिकाधिक तीव्र होत जाते. स्वातंत्र्योत्तरकाळात अनेक बाबतीत आपला भ्रमनिरास झाला आहे. जुनी मूल्ये हरपली. कुटुंब हा मोठा आधार तुटफुटू लागला, व्यक्तित्ववादाचा अतिरेक झाला. आदर्श जीवनाच्या अपेक्षेनं सर्वस्व ओतलं तरी मूल्यच हरपल्यावर प्रेम, नातेसंबंध, ईश्वर, निसर्ग सर्वांचीच साथ क्षणभंगुर असल्याच्या दाहक सत्याचा साक्षात्कार झाला आणि एकीकडे शतशतकांच्या संस्कृतीचं घट्ट ताण्याबाण्याचं ऊब देणारं आश्वासक पांघरुण अंगावर आहे असं म्हणताना तो थर सहज खरवडण्यानं खपल्या गळून पडण्याइतका तकलादू आहे याही सत्यानं थरकाप झाला. मग हताशपणानं, ' अनोळख्यानं ओळख कैशी गतजन्माची द्यावी सांग ' किंवा ' डोळ्यामधल्या डाळिंबाचा सांग धरावा कैसा पारा ' असं म्हणायची वेळ आली. आत्यंतिक प्रेमातून आत्यंतिक तुटलेपण येतं. आणि नाळेनं प्राचीनतम पूर्वपरंपरेला जोडलेला माणूस अखेर ती तुटल्यावर अपरिहार्यपणे एकाकी परिभ्रमण करीत राहतो. हे बघून

' नाही कुणी का कोणाचा, बाप, मामा किंवा भाचा'. मग अर्थ काय या बेंबीचा, विश्वचक्री ?

असं मर्ढेकर विचारतात. यंत्राधिष्ठित संस्कृतीनं दिलेली मोठी देणगी म्हणजे माणूस हा निसर्गाचं लेकरू हा दिलासाही तोडून टाकणं हीच आहे. मग या विराट चक्रात झालेल्या स्वत:च्या क्षुद्रत्वाची जाणीव ' मी एक मुंगी ' या शब्दात साकारते. मर्ढेकरांवर ते वैकल्यवादी, शून्यवादी असल्याचा आरोप केला जातो. पण त्यांना माणसाबद्दल प्रेम आहे. माणुसकी, मूल्यं यावर विश्वास आहे. आणि गुणांची कदर होत नसल्यानं येणारं वैकल्य नंतरच्या अनेक कवींना ग्रासतं आहे. त्यांचं समष्टीतलं व्यष्टित्व झपाटत आहे. निरीश्वरवादी असल्यानं देवळात जाता येत नाही. ही तक्रार विंदा करंदीकरांनी व्यक्तित्ववादाच्या अतिरेकानं आईबापांचा आधार तुटला, ही

जाणीव वसंत आबाजी डहाके यांच्यात प्रकर्षाने दिसते. 'या विराट महानगरात मी आत्यंतिक एकाकी' असं ते म्हणताताच. 'मी देठ तुटलेल्या या शहरी काळोखाचा राजपुत्र' किंवा 'मी या युगाचा कातडीवरील लहान जळता डाग.' 'मी भुसा भरलेल्या देवाच्या हातातील नकली माणूस, नकली डोळ्यांतून पहातोय भुसा भरलेलं जग' किंवा 'मी नाकारतो सर्व माझ्यासह मीच नाकारतो सर्वांतून.' यासारख्या वर्णनांतून या अतिशय आत्मनिष्ठ कवीची कडवट निराशा प्रकट होते. 'सोबतीसाठी मी असत्य एकाकी तुला हाक मारतो.'

आजच्या दलित कवींतही ही जाणीव दिसते. समाजाने बहिष्कृत केल्याने येणाऱ्या एकटेपणावर उपाय म्हणून दाद मागण्यासाठी संघटित होणे हाच मार्ग आहे. हे त्यांच्या कवितांतून जाणवतं हे गुरुनाथ धुरी, प्रभा गणोरकर यांच्या काव्यातून हे एकटेपण जाणवतं. 'Man is a lonely animal' हे पटलं की त्यावर वाट शोधताना आजच्या कवीची स्त्रीकडे बघण्याची दृष्टीही बदललेली दिसते. आजची बरीचशी कविता स्त्री-पुरुष नात्यापेक्षाही माणसाला माणसाची असलेली भूक, दिलासा, समजून घेणाऱ्याची गरज या जाणीवेतून निर्माण झाली आहे. आरती प्रभू, डहाके यांच्या काव्यातून हा प्रत्यय येतो. डहाके – 'हात तुझे हाती परि का मग एकटेपणा' किंवा दिलीप चित्र्यांच्या 'कोसच्या कोस पसरलेले ओस वाळवंट' किंवा गुरुनाथ धुरींच्या 'गळतो अनामिक शिशिर हाती...' वगैरे ओळीत साक्ष पटते. धुरींच्या कवितेत आज सेक्सचा टॅबू गेला असला, पूर्ण उपभोगातही एकत्रपणाचे, विश्वाचे समाधान नाही, आत प्रत्येकजण एकटाच आहे हे जाणवल्याचे आढळते.

स्त्रियांच्या कवितेपैकी इंदिराबाईंच्या कवितेत सुरुवातीचं पतिविरहानं येणाऱ्या एकटेपणाचं 'उभे दुःख हे उभे पुढ्यातच' असं स्वरूप बदलून कालांतरानं साऱ्या निसर्गातच त्यांचा सहचर विखरलेला जाणवतो. स्त्रीला प्रेमाचं साफल्य पतीत, अपत्यात मिळतं. पण मातृत्वामुळे पूर्ण होणारी आई मूल मोठं झाल्यावर पुन्हा एकटी पडते, हे अनुराधाबाईंच्या तडफड, आज तू आणि मी, मी उभी राहिले, आईपण, या कवितातून दिसतं. वेगवेगळ्या प्रकारांनी पुनःपुन्हा वेढून टाकणाऱ्या एकटेपणात स्वतःचीही ओळख पटेनाशी होते. हे शांता शेळक्यांच्या 'हे रान चेहऱ्याचे... माझ्याही चेहऱ्याची मजला न शाश्वती, किंवा 'अनोळख' या संग्रहातील अनेक कवितांतून कळतं. काळ पुढे गेला, माणसांची गर्दी झाली तरी माणूस इतका एकेकटा होत जातो, हे एकटेपण गर्दीतही जोपासलं जातं, नव्या आचारात रीतीभातीत स्वतःपासून तुटत जाणं हेच नशिबी असतं. हे ययातीला झालेलं ज्ञान आज प्रत्येकाला नव्यानंच कळतं आहे. कळू लागल्यापासून स्वतःची ओळख पटवून घेत-देत, व्यक्तित्वाचा ठसा जपण्याचा अट्टाहास करीत अखेर 'स्वतःच्या घरी

दूरचा पाहुणा मी ' असं म्हणायची वेळ येते. (विंदा करंदीकर) हे फक्त मराठीचंच वैशिष्टय नसेलही – माणसालाच मूलभूतपणानं झालेली ही जाणीव, हिचे पडसाद सगळ्या भाषांतून उठत असतीलच 'वॉटर वॉटर एव्हरी व्हेअर नॉट ए ड्रॉप टू ड्रिंक ' असे म्हणणे काय किंवा ' शामे गमकी कसम ' म्हणणे काय !

या सत्रींच्या संवेदनशीलतेला जाणवलेल्या ह्या एकाकीपणातून माणूस म्हणून एकत्र येण्याची गरज पुन्हा भासेल, तशी ती माणसे भेद विसरून एक होतील, तर पूर्वीचा ईश्वर मानला नाही तरी नवा ईश्वर त्यातून निर्माण होऊ शकेल. या आशेवर विसंबून रहाणे हेच रसिकांच्या हाती आहे. आपण माणूस असल्याची सनातन वैश्विक जाणीव हीच या एकटेपणावरची फुंकर आहे.

(४९१/४ एच. आय. जी., गृहनिर्माण मंडळ, लक्ष्मीनगर, पर्वती, पुणे ९)

---

## साभार स्वीकार

### कादंबरी

- जगबुडी – वामन पात्रीकर, पॉप्युलर प्रका., ३५ सी. पं. मालवीय मार्ग, ताडदेव मुंबई ३४, १–१९८९, ८० रु.
- ज्ञानेश्वर माऊली – दत्ता ससे, साकेत प्रका., ११५ म. गांधीनगर, औरंगाबाद, ४४१००५, १–१९८७, १० रु.
- अग्निपुष्प – रेखा बैजल, साकेत प्रका., गांधीनगर, औरंगाबाद, ४३१००५, १–१९८९, ४० रु.
- महाराणी पद्मिनी – रघुवीरसिंह राजपूत, साकेत प्रका., गांधीनगर, स्टेशन रोड, औरंगाबाद ४३१००५, १–१९८८, ५५ रु.
- आमदार सौभाग्यवती – रा. रं. बोराडे, साकेत प्रकाशन, गांधीनगर, औरंगाबाद ५, १–१९८८, ३५ रु.
- रानखळगी – भीमराव वाघचौरे, साकेत प्रकाशन, गांधीनगर, स्टेशन रोड, औरंगाबाद ५, १–१९८८, ७० रु.
- आम्ही डिका – कल्पना गोसावी, देसाई, प्रका. श्री विद्या प्रका., २५० शनिवार, पुणे ३०, १–१९८९, ७० रु.
- महासागर – ले. हिमांशु जोशी, अनु. डॉ. पद्माकर जोशी, प्रका., प्रीतमसिग जुनेजा, जनवाणी प्रेस, ४५ अ बुधवार पेठ, पुणे २, १–१९८९, ४० रु.

---



अनुक्रमणिका

# सारस्वतांची पत्रसंपदा

## प्रा. बाळकृष्ण दाभाडे यांचे शंकर सारडा यांना आलेले पत्र

प्रा. बाळकृष्ण दाभाडे, एम्. ए.
कार्पोरेशन कॉलनी,
नागपूर, ४४००१०

२१–८–७६

प्रिय शंकर सारडा यांना स्नेहपूर्वक नमस्कार.

तुमचे कृपापत्र प्राप्त झाले. आनंद वाटला. मी आपल्या पत्राची उत्सुकतापूर्वक प्रतीक्षा करीत होतो. झालेला परिचय कायम राहावा व तो वाढत जावा ही इच्छा करतो. समय थोडाच राहिला आहे. माझे अस्तित्व कधी पडद्याआड अदृश्य होईल सांगता येणार नाही.

छायाचित्रकार श्री. वा. ना. भट यांना मी मोकळया मनाने सर्व परिस्थिती स्पष्ट केली. त्यांनी त्या घटनेवर पडदा टाकला व माझे वाढदिवसानिमित्त मनःपूर्वक अभिनंदन केले. त्यांच्या या वागण्याने मी भारावून गेलो – महाराष्ट्र टाइम्समध्ये मुलाखत प्रसिद्ध झाल्यापासून परिचितांची अशी सुमारे ४० हून अधिक पत्रे मला प्राप्त झाली. पत्रे सामान्य वाचकांचीच होती. सर्वांनी मुलाखतीबद्दल प्रशंसा करून समाधान व्यक्त केले आहे. मुलाखतीचा प्रवाह संथ, उत्साहवर्धक असून कथनशैली प्रसन्न झाली आहे. बहुतेकांनी माझ्याविषयी नवीन माहिती उपलब्ध झाली असे लिहिले आहे. पहिलेच पत्र उमाकान्त ठोमरे यांचे आले. सप्टेंबरच्या 'नवनीत' अंकात माझा "मथुरेच्या लावण्यवती यक्षिणी" हा लेख प्रसिद्ध होत आहे याची सूचनाही त्यांनी दिली. त्यांच्या संग्रही माझे तीन लेख पडले आहेत. माननीय बाबूराव सडवेलकर आर्ट डायरेक्टर यांच्या पत्रात ते माझा परिचय करून घेण्यास उत्सुक आहेत असे लिहिले होते. दिल्लीहून म. ल. व शोभा वऱ्हाडपांडे, मुंबईहून प्राचार्य रा. भि. जोशी, ना. गो. तवकर, पुण्याहून वा. ना. भट, पां. र. अंबिके, कोल्हापूरहून नवकिरणकार विलास साळोखे, राम देशपांडे (खाण्डेकर यांचे लेखक), गारगोटीहून हिंदीतील कथाकार राम शिर्के, नेसरीहून डॉ. डवरे,

सौंसरहून प्रा. उपासनी, सांगलीहून प्रा. कु. सुमन बेलवलकर, ल्युसाकाहून माझे बंधु प्रा. वसन्त दाभाडे इत्यादींनी तुमच्या लेखनशैलीबरोबर माझ्या छायाचित्राची सुद्धा प्रशंसा केली आहे. माझ्या गरीब नातेवाइकांना तर या लेखामुळे फार आनंद वाटला. माझ्याबद्दलचा त्यांचा अभिमान अधिक दृढ झाला. नागपुरातील अनेक साहित्यिक मनापासून काही शिष्टाचार म्हणून अभिनंदन करून गेले. ऑगस्टचा पहिला पंधरवडा कुतूहलाचा गेला.

गेल्या दीड महिन्यात सांसारिक अडचणीत गुंतून पडलो आहे. आर्थिक गुंता सोडविताना मन थकून जाते. मुलगा नं २ खण्डेराव गेल्याच आठवड्यात नागपूर विद्यापीठात तात्पुरता व्याख्याता म्हणून नियुक्त झाला आहे. ही नियुक्ती ७॥ महिन्यापुरतीच आहे. मुलगी एम्. ए. ला गेली आहे. तिने Ancient Indian History, Culture and Archaeology हा विषय घेतला आहे. त्या विषयावर मराठीतून ग्रंथ उपलब्ध नाहीत. तिच्या अभ्यासासाठी ग्रंथ जमविण्यात तूर्त व्यस्त आहे. तिचे अध्ययन मार्गाला लागावयास हवे. मी आहे तोवरच तिचे शिक्षण निर्विघ्नपणे चालू शकेल. याच काळजीने मन अस्वस्थ असते. या गोष्टीमुळे लेखनाचे गाडे मार्गाला लागले नाही. रविवारीच केसरीने लेखांची मागणी केली पण अद्याप लिहिणे जमले नाही.

तुम्ही नव्या लेखासाठी विषयाचा सूत्रपात केला. तुमच्या दृष्टीचा भेदकपणा दिसून आला. ललित लेखनासाठी अशा विषयात खुसखुशीतपणा येऊ शकेल. या छंदापायी आलेले माझे अनुभवही फार मजेशीर आहेत. काही अनुभव अपमानास्पद तर काही विश्वास बसणार नाही असे नाट्यपूर्ण होते. अपमान ब्राह्मणांनी केला पण मुख्यत: त्यांच्याचकडून मला हस्तलिखित ग्रंथ प्राप्त झाले. ज्यांना घरात हा कचरा नको होता त्यांना माझ्यासारखा प्राध्यापक याचक भेटला म्हणून त्यांनी तो कचरा माझ्या पदरात टाकून आपली घरे स्वच्छ केली व वर दानाचे, मोठेपणाचे श्रेयही मिळवले. मी याचक होऊन गेलो नसतो तर त्या पोथ्या तलावात बुडून नष्ट झाल्या असत्या. काही पोथ्या अदलाबदलीत मिळाल्या. बऱ्याच ठिकाणी मी केलेल्या उपकाराची फेड करावी म्हणून पोथ्या दिल्या गेल्या. एका शिष्येने पतीच्या हातून पोथ्यांचे दान करवून कृतज्ञता व्यक्त केली. मी धारला गेलो तेव्हा पहिल्याच वर्षी मी या मुलीला मराठी व संस्कृत या विषयात मार्गदर्शन करून इंटरची परीक्षा पार पाडण्यास मदत केली होती. मी जीवनात शालेय अथवा महाविद्यालयीन अभ्यासात शिकवण्या करताना एक पैसाही कधी घेतला नाही. त्यामुळे सर्वत्र सतत माझी प्रतिष्ठा वाढती राहिली. तलावात सोडण्यास निघालेल्या त्या B.A., B.Ed. शिक्षक पतीला त्या पोथ्या मला देण्याची सूचना केली त्या मुलीने. एके दिवशी मला चहाला बोलावून त्या पोथ्यांचे गाठोडे त्याने माझ्या स्वाधीन केले व ' अर्थोहि

कन्या परकीय एव ' असे समजून तो चिन्तामुक्त झाला. दुसऱ्या दिवशी दुपारी ती गृहिणी माझ्या घरी आली व एक लिफाफा देऊन म्हणाली ' सर, या लिफाफ्यातील पोथ्या आमच्या मालकांच्या हाती पडू देऊ नका. ' ती मुलगी निघून गेली. लिफाफा फोडून पाहिला तर त्यात दोन ' रजस्वला स्तोत्रे ' निघाली. एक स्तोत्र श्रीकाली-तंत्रातील, दुसरे स्तोत्र श्री रुद्रयामलातील. पतीला न कळविता ती स्तोत्रे माझ्या स्वाधीन करून तिने आपल्या मनातील संशयपिशाच्च काढून टाकले. पती बिचारा ती स्तोत्रे कुठे गहाळ झाली हे न समजल्याने काही दिवस हैराण झाला होता.

मी शिक्षण विभागात जिल्हाधिकारी असतानाची गोष्ट. माझे मुख्य कार्यालय भेलसा (विदिशा) येथे होते. पहिल्याच महिन्यात एका ब्राह्मण तरुणास मी त्याच्या जन्मग्रामी उदयपुरास बदली करून त्याला त्याच्या वडिलांची सेवा करण्याची संधी दिली होती. ही गोष्ट १९४५ मधली. एक वर्षानंतर मी उदयपुरास तेथील मिडल-स्कूलची तपासणी करण्यास गेलो. तपासणी केली. मी बदली केलेल्या शर्मांचे काम संतोषजनक आढळले. परत येताना बैलगाडीत बसलो तेव्हा शर्मांच्या वृद्ध पित्याने एक हस्तलिखित पोथ्यांची गोणी आणून माझ्या गाडीत ठेवली. त्याच्या दृष्टीतून कृतज्ञता ओसंडत होती. त्या वृद्धाच्या मुलाची बदली केल्यानंतर एक वर्षाने ही अनपेक्षित घटना घडली. या गोणीतील पोथ्या फार जुन्या व महत्त्वाच्या निघाल्या. जुन्नरकर विद्यार्थ्याने आपल्या आईच्या आज्ञेचे पालन करून पोथ्या लेण्डया तलावाच्या कोरडया जागेवर समर्पण केल्या. संध्याकाळी मी त्या पोथ्या पोत्यात घालून अंधारात घरी घेऊन आलो. तीन दिवस फेऱ्या मारून सुमारे चारशे पोथ्या मी मिळवू शकलो. ' अश्वपरीक्षा ' या मी संपादित केलेल्या प्राचीन काव्याच्या प्रस्तावनेत मी जुन्नरकर याचे आभार मानले आहेत. मला त्याने विश्वासात घेऊन सूचना दिली नसती तर त्या पोथ्या लेण्डया तलावाच्या जलात बुडून चिखल झाल्या असत्या. आज सर्व पोथ्या नागपूर महाविद्यालयाच्या हस्तलिखित ग्रंथ विभागात संशोधकांची मार्गप्रतीक्षा करीत बसलेल्या आढळतील.

या छंदाची पूर्तता करणारा एक नाटयपूर्ण अनुभव ग्वाल्हेरला आला. १९५५–५६ चा काल होता. धुलवडीचा दिवस. आम्ही एका मराठा सरदाराच्या वाडयात राहात असू. रंगाचा खेळ ऐन भरात आला होता. सारे शिष्टाचार बांधून ठेवण्यात आले होते. वृद्ध, तरुण, पुरुष, स्त्री, मुले उन्मुक्त मनाने आचरण करीत होते. सुरवातीसच त्या तरुण पोरीने माडीवरून माझ्या डोक्यावर रंगाची बादली ओतून खेळाचा डाव आरंभ केला होता. मी तटस्थतेने सर्व पहात होतो. कारण मी प्राध्यापक होतो. मी त्या रंगात उभा असूनही नसल्यासारखाच होतो. त्या मुलीची आव्हाने विफल होत होती. तिचा हैदोस चालूच होता. रंगाचा भर ओसरल्यावर मी आमच्या जिन्याकडे वळलो. त्या पोरीने झडप मारून मला पाठीमागून कवेत

आवळले. माझे शरीर घुसळून काढले. मी तिच्या मिठीतून मोकळा होत असताना तिने माझ्या दंडाला करकरून चावा घेतला व ती पळून गेली. रंगाचा खेळ संपला. मी चार दिवस दण्डाला मलमपट्टी करीत होतो. सात दिवसांनी दुपारच्या शांत वेळी ती तरुण पोर आमच्या घरी आली व झाल्या गोष्टीबद्दल क्षमा मागू लागली. माझ्या पत्नीच्या हातात तिने एक कांग्रा शैलीचे चित्र दिले व माझ्या हातात पोथ्यांचे छोटे बंडल दिले. 'माझी आठवण ठेवा' असे म्हणून ती उदास मनाने परत गेली. त्या पोथ्या मी ठेवून दिल्या आहेत. कधी पेटी उघडतो तेव्हा त्या पोथ्या दृष्टीस पडतात आणि मग मन कुठेतरी भरकटत रहाते. त्या पोरीच्या वागण्याचा अन्वयार्थ लागत नाही. ती पोरगी लग्न होऊन कुठे गेली मला माहीत नाही. पण त्या पोथ्या तिचे स्मरण देत आजही माझ्या संग्रहात असलेल्या आढळून येतील. एक की दोन अनेक भले बुरे अनुभव या ग्रंथसंग्रहाच्या छंदात मी जमविले.

नाण्यांचा संग्रह करताना असेच सुखद–दुःखद अनुभव आले. तुम्ही रसिक म्हणून एवढे लिहिण्याचा प्रपंच केला. कधीकाळी जुने अनुभव सांगावे लिहावे असे वाटले तर प्रयत्न करून पाहीन. माझी सुखदुःखे मी कुणाला अद्याप उघड करून सांगितली नाहीत. पुढेमागे कधी सांगण्याचा प्रसंग येईल असेही वाटत नाही. जीवनाचा हा भाग अकथ्यच राहील.

तुमची ओळख झाली – मुलाखतीच्या संदर्भात ती अधिक गाढ झाली याचा मला मनापासून आनंद होत आहे. आपणही मला विसरणार नाही ही इच्छा प्रकट करतो – धन्यवाद.

स्नेहशील
बाळकृष्ण दाभाडे
२१–८–७६

---

## साभार स्वीकार

### समीक्षा

- डोहकाळिम्यात डोकावताना – जाधव रा. ग., कॉन्टिनेन्टल प्रका., विजयनगर कॉलनी, पुणे ३०, १–१९८८, २० रु.
- मराठी साहित्यातील ययाती – डॉ. गिरधारी भास्कर, विभा प्रका., 'विभा' पर्णश्री को. ऑ. हौ. सोसा. एच. पी. टी. कॉलेज, वसतिगृहाजवळ, नाशिक, ४२२००५, १–१९८९, ४० रु.

---

# डॉ. द. भि. कुळकर्णी यांचे

## श्री. प्रभाकर ऊर्ध्वरेषे यांना आलेले पत्र

डॉ. द. भि. कुळकर्णी,
ए-वन् जंतरमंतर, अमरावती मार्ग,
नागपूर ४४००१०
दूरध्वनी ३२३१७
दि. १६ जून ८९

श्री. नानासाहेब ऊर्ध्वरेषे यांस,
सप्रेम नमस्कार वि. वि.

आपले ' हरवलेले दिवस ' हे आत्मकथन वाचून आपणांस एक लहानसे प्रशंसापर पत्र मी काही दिवसांपूर्वी पाठविले होते; ते काल परत आले; त्यावर मी १९८५ च्या 'प्रकाशन डायरी 'तील तुमचा पत्ता लिहिला होता! असो. झाले ते बरेच झाले कारण दरम्यान मी ' हरवलेले दिवस 'वर सविस्तर परीक्षणलेख लिहिला आहे व तो ' रुची 'कडे पाठविला आहे, इत्यादी तपशील काही त्या पत्रात नव्हता. आज ' सोबत 'चा १८ जून ८९ चा अंक आगाऊ आला व नेहमी-प्रमाणेच त्यात तुमचा पत्ता लागला.

नागपूरला मी तुम्हाला पाहत होतो, भेटत होतो तेव्हा तुमच्याबद्दल एक संमिश्र प्रतिक्रिया माझ्या मनात होत असे : हा माणूस तिरिमिरीला आलेला आहे आणि वत्सलही आहे अशी ती प्रतिक्रिया असावयाची. या तुमच्या विरोधाभासात्मक व्यक्तित्वामागे अनुभवांचा केवढा मोठा आणि मोलाचा साठा आहे हे आता ' हरवलेले दिवस ' वाचून कळले व तुमच्याबद्दलची आत्मीयता आणि आदरही द्विगुणित झाला.

' हरवलेले दिवस 'चे सगळ्यात मोठे वैशिष्टय म्हणजे त्यात अथपासून इति-पर्यंत प्रगटलेली लेखकाची शांत, निरीच्छ, निवृत्त, समाधात वृत्ती. उत्कट, स्वतःला झोकून देणाऱ्या स्वभावाच्या माणसाने आपल्या मनोभंगाबद्दल इतक्या ' आपपर-तटस्थभावरहित ' वृत्तीने लिहावे ही खरोखरच नवलाची आणि गौरवाची बाब आहे. या परिपक्व वृत्तीमुळेच तुम्ही कुठे आत्मसमर्थन करता आहात वा मूर्तिभंजन करता आहात, आत्मगौरवाने लिहित आहात वा आकसाने लिहित आहात असे वाटत नाही; असे घडत नाही. म्हणूनच बेचाळीसचा लढा, दुसरे महायुद्ध व

आझाद हिंद सेना याबाबतच्या पार्टीच्या चुका असोत वा जोशी–रणदिवे संघर्ष, डांगे यांचे कचखाऊ व्यक्तिमत्त्व याबाबतचे विश्लेषण असो किंवा खलाशांच्या बंडाची गौरवगाथा असो– सर्वत्र तुमच्या आत्मनिवेदनात समधान आणि उदात्त भाव प्रकटला आहे. असे आत्मनिवेदन विकारवश, गढूळ आणि पक्षपाती होण्याची किती शक्यता असते हें आपण एकमेकांस सांगावयास नकोच. तुमच्याप्रमाणे मीही वेळोवेळी सौ. डांगे, सौ. परुळेकर, कॉ. फडकें, कॉ. मिरजकर यांच्या ' आत्मगाथा ' वाचल्या आहेत.

ही निःपक्षपाती तटस्थता, हा संयम आणि ही विदग्ध उत्कटता दूरस्थपणाने आणि वयस्कपणाने आलेली नाही. म्हातारपणीही माणसे आपल्या लग्नातल्या मानपानासंबंधी किंवा नोकरीतील आपल्या मानहानीसंबंधी किती आवेशाने आणि एककल्लीपणाने बोलतात हे आपण नेहमी पाहतोच; ही संतुलित मनोवृत्ती अनुभव, चिंतन व मुख्य म्हणजे आत्मविलोपनातून आलेली आहे; हा लेखक न्यूनगंड आणि अहंगंड यापासून दूर आहे व म्हणूनच तो स्वतःकडे व स्वतःच्या परिसराकडे सम्यक् दृष्टीने पाहू शकतो.

गंमत म्हणजे ' ऊर्ध्वरेषे ' हा फुलटाइमर आघाडीचाही नाही की पिछाडीचाही नाही; तो अधिकार आणि भूमिका आणि मनोवृत्ती या साऱ्याच दृष्टीने ' मधल्या फळी 'चा माणूस आहे. त्यामुळेच तो मागे-पुढे सहज आणि सलग पाहू शकतो; त्याची आत्मकथा आत्मकेंद्रित न होता सहजच पार्टीकथा होते. पुढाऱ्याची आत्मकथा स्वाभाविकच स्वकेंद्रित होते; तिसऱ्या दर्जाच्या कार्यकर्त्यांची जीवनकथा स्वाभाविकच तिसऱ्या दर्जाची – रुक्ष – होते; तसे येथे होत नाही.

' हरवलेले दिवस 'ला स्वतःचा एक घाट, आशयबंध लाभला आहे. ' कौटुंबिक–आयुष्य–पार्टीतील सार्वजनिक आयुष्य–पुन्हा कौटुंबिक आयुष्य ' असा तो घाट आहे. तो तुम्ही फार ताणलेला नाही हे बरेच झाले. तसे घडले असते तर तुमच्या आत्मनिवेदनाचे अस्सल जीवनरुप ' ढासळून त्यास निव्वळ ' कलारूप ' आले असते. मी स्वतः आत्मचरित्र हा ललित वाङ्मयप्रकार मानीत नाही. ललित वाङ्मयकृतीशी वाचक आत्मविलोपनासह समरस होत असतो. उलट, आत्मचरित्र वाचत असताना त्याचे त्याच्या स्वतःच्या आयुष्याचे भान जागृत होत असते व तो पदोपदी आपल्या आयुष्याशी आत्मचरित्रकाराच्या आयुष्याशी, वेगवेगळ्या रीतीनें, तुलना करीत असतो; ही प्रक्रिया ललित वाङ्मयकृतीच्या संदर्भात रसविघ्नकारक ठरत असते; उलट आत्मकथावाचनाचे तेच सगळ्यात मोलाचे फलित असते !

आत्मकथा वाचनाचा अनुभव खरोखरच विलक्षण असतो. आत्मचरित्रकार स्वतःच्या आयुष्याकडे मरडून पाहत असतो. त्यामुळे वाचकास त्याची दोन रूपे दिसत असतात; एक वर्तमानकालीन,' दुसरे गतकालीन; आणि इकडे वाचकही

आपल्या आयुष्याशी आत्मचरित्रकाराचे आयुष्य तोलून पाहत असतो; आहे की नाही गंमत! आत्मचरित्राची निर्मिती द्विदल असते आणि आत्मचरित्राचा आस्वादही द्विदल असतो – मग आत्मचरित्राचा आस्वाद अपूर्व असतो, अजोड असतो असे म्हणायचे नाही तर मग आणखी काय म्हणायचे? असा अनुभव देणारी आत्मचरित्रे मराठीत थोडीच. ग. य. चिटणीस, वि. द. घाटे, आनंदीबाई शिर्के, दिलीप पुरुषोत्तम चित्रे अशी काही नावे कमीअधिक आढळतात. त्यात 'प्रभाकर ऊर्ध्वरेषे', हे नाव आता समाविष्ट झाले आहे; त्याबद्दल तुमचे अभिनंदन!

'हरवलेले दिवस'चे आणखी एक वैशिष्ट्य सांगावयास हवे; मनोभंगमूलक आत्मनिवेदनांचा उपयोग विरोधकांना पुरेपूर होत असतो. तुमचे आत्मनिवेदन मात्र कम्यूनिस्ट–विरोधकांना नव्हे कम्युनिस्टांना उपयुक्त, मार्गदर्शक ठरणार आहे; ठरायला हवे.

तुमच्या एक बाब लक्षात आली का? – मराठीतील अधिकांश आत्मचरित्रे दुरावलेल्यांची आहेत. बाबा पदनमजी (धर्मान्तरित), दादोबा पांडुरंग (सुधारक) लक्ष्मीबाई टिळक (धर्मान्तरिताची पत्नी), दलित (बहिष्कृत) – ही यादी खूप वाढविता येईल. असे का? ज्यांच्याबद्दल समाजात गैरसमज असतो ते आत्मचरित्र लिहावयास प्रवृत्त होतात? – त्यांना रास्त आत्मसमर्थन करावयाचे असते? त्यांना अन्यायकर्त्यांचा अन्याय वेशीवर टांगायचा असतो? त्यांचा घुसमटलेला जीव आत्माविष्कारासाठी आतुर झालेला असतो? काय कारण असेल? नीट शोध घ्यावयास हवा.

तुम्ही इंदूरचे. इंग्रजीचे एम. ए., पार्टीकालीन सहवास सारा विविध भाषक व्यक्तींचा. तुमची भाषाशैली मोकळी झाली असती तर मला आश्चर्य वाटले नसते. आश्चर्य याचे वाटते की हे सारे असूनही भाषेचे मराठीपण आणि प्रसादगुण तुम्ही सहज सांभाळला आहे – अशी मराठी दुर्मिळ होत चालली आहे. या तुमच्या भाषागुणांचे एक कारण घरचा मराठीचा वारसा आणि तुम्ही केलेले लेखन, भाषांतरकार्य. खरोखर तुमच्या वाङ्मयीन अपत्यांची (आणि प्रत्यक्ष अपत्यांचीही) सविस्तर नोंद ग्रथात यावयास हवी होती; ती का टाळलीत? असो.

पत्र बरेच लांबले. पण ते तुम्हाला कंटाळवाणे वाटणार नाही अशी आशा करतो. अलीकडे तुमची प्रकृती ठीक नसते असे कळले; काळजी घेत असावे.

इकडील क्षेम. सौ. कुलकर्णी 'तिरपुडे समाजकार्य महाविद्यालया'त प्राध्यापक असून त्यांचे व्यवस्थित चालले आहे. चि. अभिनंदन बी. ई. करून भारतीय वायुसेना दलात फ्लाइंग ऑफिसर म्हणून चंदीगढ येथे रुजू झाला होता; परंतु अलीकडेच तो नोकरी सोडून परत आला आहे. माझेही वाचन–लेखन–अध्यापन व्यवस्थित

सुरू आहे 'रुची'च्या जानेवारी ८९ च्या अंकात माझी विस्तृत मुलाखत आहे; तिच्यावरून तुम्हास अन्य तपशील कळला असेलच.

अधिक काय लिहू ?

सौ. ऊर्ध्वरेषे व घरातील धाकटी मंडळी यांना अनुक्रमे स. न. व शु. आ, कळावे.

आपला

द. भि. कुलकर्णी

---

## साभार स्वीकार

### काव्य

- **उषा** – सं. पां. पाटील, ॲड सतीश शीलवंत १४७३ सदा. पेठ, पुणे ३०, १–१९८८, ३१–५० रु.
- **कातरवेळ** – प्रा. तुकाराम पाटील, प्रपंच प्रका., ३८९ शनिवार पेठ, पुणे ३०, १–१९८८, १५ रु.
- **कलिका** – प्रा. तुकाराम पाटील, दिलीप गवळी, २० प्रतिभानगर मार्केट, सागरमाळ कोल्हापूर ८, १–१९८७, २० रु.
- **आता होऊन जाऊ द्या** – यशवंत लोकनाथ, प्रका., सुषमा लोकनाथ रायपुरे, मुक्तछंद प्रका., सिव्हील वार्ड २, चंद्रपूर, ४४२४०१, १–१९८९, २५ रु.
- **रमंथ** – डॉ. र. म. शेजवलकर, प्रका., सुनीता शेजवलकर, विजयकुंटे बिल्डिंग, भास्कर कॉलनी, नौपाडा, ठाणे ४००६०२, १–१९८९, ३० रु.
- **बालबोधमेव्यातील कुसुमाग्रज** – संपा. पद्मा मोरजे, पॉप्युलर प्रकाशन, ३५ सी. पं. मालवीय मार्ग, ताडदेव, मुंबई ३४, १–१९८९, १५ रु.
- **पारंब्या** – कुमार अनिल, भलरी प्रका., वसई, मुंबई, १–१९८९, ७ रु.
- **हा घोडा हे मैदान** – नीळकंठ महाजन, शिल्प प्रका., एम्. जे. कॉलेज जवळ, जळगाव, १–१९८८, ४५ रु.
- **पुन्हा यावे ज्ञानेश्वरा** – रा. सो. सराफ, श्रीविद्या प्रकाशन, २५० शनिवार पेठ, पुणे ३०, १–१९८९, २७–५० रु.
- **कॉलम** – ले. विलास शेळके, श्रीविद्या प्रका. २५० शनिवार पेठ, पुणे ३०, १–१९८९, ८ रु.
- **माझं आपलं माझ्यापुरतं** – ले. डॉ. सरोजिनी बाबर, प्रका. समाज शिक्षणमाला, २०९५ सदा. पेठ, पुणे ३०, १–१९८९, २–५० रु

---



अनुक्रमणिका

# तथास्तु : हरिहर आठवले

## लाल मातीचा वास असलेल्या कथा

डॉ. वसंत सावंत

'तथास्तु'मधील या सर्व कथा दक्षिण कोकणच्या दुर्गम, खडकाळ प्रदेशात आयुष्यभर वाटचाल केलेल्या एका अस्सल कोकणी व्यक्तिमत्त्वाचा प्रत्यय देतात. हरिहर आठलेकर एक आदर्श प्राथमिक शिक्षक म्हणून काही वर्षांपूर्वी निवृत्त झाले. आपले चेंदवणचे डोंगरातील घर सोडून सावंतवाडीत स्थायिक झाले. आयुष्य खेडोपाडी, कोकणच्या लाल मातीत, खडकाळ प्रदेशातील शाळांतून गेले. प्रख्यात लेखक श्री. वि. स. खांडेकर यांच्या समवेत बालपणाचे काही दिवस गेले. पण ते घरकामात. त्यानंतर पुढे कधी आठलेकर व्हं. फा. झाले. बाहेरून एस्. एस्. सी. झाले. सिनिअर ट्रेंड झाले. पूर्ण मास्तर झाले. 'बाबू' काही लिहितो, ते वाचनीय असते – त्याची जाग, श्री. खांडेकरांना त्यांच्या उत्तर आयुष्यात आलेली. त्यामुळे त्यांचे मार्गदर्शन, आशीर्वाद वगैरे या लेखनाला तसे नाहीत, ही बाब मला महत्त्वाची वाटते. कारण त्यामुळेच आठलेकरांचे लेखन मुळात आठलेकरांसारखेच झाले आहे.

आठलेकरांच्या लेखनाची मूळ उर्मी आंतरिक असावी. कोणतेही टीकाग्रंथ न वाचता, आपल्याला भेटलेली लक्षणीय माणसे त्यांनी 'साखर माणसे' या संग्रहात लिहिली. त्या साखरेसारख्या गोड माणसांनीही त्यांच्या व्यक्तिमत्त्वाला काही अर्थ-पूर्णता आणली. "माझा छंद माणूस पाहण्याचा. म्हणून मला भेटलेला माणूस या कथांतून तुम्हालाही भेटेल कदाचित. कदाचित तो पूर्वी भेटून गेला असेल. कदाचित! बस्स एवढीच या कथांची कथा." 'तथास्तु'चे छोटे प्रास्ताविक खूप काही सांगून जाते. आठलेकरांच्या एकूणच लेखनाची प्रेरणा त्यातून व्यक्त होते. रूढ अर्थाने ज्यांना तंत्रबद्ध कथा म्हणतो तशा या कथा नाहीत. कारण 'कथे'चे कोणतेही 'तंत्र' वाचून वा अभ्यासून त्या लिहिलेल्या नाहीत. काही कथा प्रसंग वर्णनपर, काही व्यक्तिप्रधान होतात. या कथांची सुरुवात अगर शेवट रूढार्थाने कलात्मक असतोच असे नाही. 'भारलेले क्षण', 'सालूची शाळा', 'एक साळसुदी

कथा ' या कथांना कथेचा आकार आलेला नाही. ' एक साळमुदी कथा तर किस्से-वजाच आहे.

पण या सर्व कथांचा काही एक संस्कार वा ठसा वाचकांच्या मनावर उमट-वण्यात आठलेकर यशस्वी झालेले दिसतील. व्यभिचारिणी आईच्या पोटी जन्म घेतलेल्या आणि कोकणात येऊन दूरच्या आत्याकडे वाढणाऱ्या एकाकी तरुण मुलीचे दुःख रेणू ही कथा सांगेल. डोहावर जीव देण्याचा प्रसंग, चित्रमय निसर्गवर्णन, संवाद रेखाटन, शेवटचे पत्र लेखन, या गोष्टी आठलेकरांच्या कलात्मक शैलीचे नमुने म्हणावे लागतील.

' न मानलेला दंड ' ही जानू सारंगच्या व्यक्तिमत्त्वाने भारलेली कथा असली तरी तिच्यात कोकण–किनारपट्टीवर चालणाऱ्या स्मगलिंगच्या यक्षप्रश्नाचा स्रोत झुळझुळत राहतो.

सागरी जीवन प्रत्ययाच्या दृष्टीने ' तथास्तु ' ही कथा अधिक लक्षणीय आहे. संघर्षमय सागरी जीवन आणि काठावर भयानक वादळ होऊन सर्वस्व नष्ट झालेले कुटुंब व त्याची वाताहात इथे चित्रित होते. कर्तबगार पित्याचा मृत्यू होतो आहे, अशा वेळी आजोबाचे रूप घेऊन नव्याने जगण्याचा संदेश देणारी सावली चित्रित करण्यात आठलेकर यशस्वी होतात. ही कथा म्हणजे एक विलापिकाच होय. तिची चित्रमय शैली व उदास वातावरण निर्मिती लक्षणीय. बहुधा या कथेला कोकणा-तील १९६२ च्या प्रसिद्ध वादळाची पार्श्वभूमी असावी. लेखकाच्या हळवेपणाचा रंग जरा अधिक गडद झाला आहे. पण शैलीची चित्रमयता लक्षणीय.

' नानू चणेकर ' या कथेची वीण उपहास, उपरोध, या वाङ्मयीन अस्त्रांचा वापर करते. ' नानू चणेकर ' ही कथा एका ध्येयवादी शिक्षकाची शोकांतिका आहे. कोकणच्या खडकाळ, दुर्गम प्रदेशातील प्राथमिक शाळा, शिक्षकांच्या बदल्यांचा यक्षप्रश्न, जिल्हा परिषदेकडे आलेली शिक्षणव्यवस्था, तिथला तालुक्याच्या पातळी-पर्यंतचा तो थेट गावपातळीवर चाललेला भ्रष्टाचार, नव्या उगवत्या नेतृत्वाने चालवलेला भ्रष्टाचार, पोसलेला जातीयवाद, ग्रामसुधारणांचा प्रश्न, या सर्व समस्यांना ही कथा सहज स्पर्श करून जाते. त्यामुळे तिची वीण एखाद्या दीर्घकथेची झाली आहे. ती बहुपेडी आहे. जीवनाबद्दल कोठेही कटुता न बाळगणारा ' नानू ' एक पूर्ण विकसित होत चाललेले व्यक्तिमत्त्व वाटते. जीवनाची एक चांगली समज आलेल्या, कलावंताचे दर्शन घडते. या कथेला ' अनुष्टुभ'चे ' रेऊ पारितोषिक ' मिळाले, ते सार्थ वाटावे.

प्रेमळ व ध्येयवादी शिक्षकाने लिहिलेल्या या कथा वाटतात. ' सालूची शाळा ' मध्ये मारकुट्या मास्तरांनी तर प्रेमळ पित्यासमान नव्या आलेल्या गुरुजींनी सालूच्या मनात निर्माण केलेला विश्वास चित्रित झाला आहे. मातील सालूचे

बालमन, त्याची हुरहुर, शाळेबद्दल खोलात वाटणारी माराची अनामिक भीती, बापाचा मार, आईची वत्सल माया यांचे दर्शन घडते. एखाद्या शालेय पाठ्यपुस्तकात शोभावी अशी ही कथा उतरली आहे. 'भरलेली पोकळी' या कथेत निवृत्तीनंतर आपल्या गावातील आदर्श शिक्षकांना नवी शाळा काढून त्यावर देखरेख व सल्लागार म्हणून नियुक्ती करणारे गाववाले भेटतात. गुरुजींच्या घराचाही प्रश्न ते सोडवतात. यातून कोकणची गावाबद्दलची भक्ती आणि अस्मिता सूचित होते.

'जुगार' ही कथाही बालमन चित्रित करते. वालावलीच्या नारायणाची जत्रा म्हणजे मुलांना मजा करण्याची एक पर्वणी. यातील जत्रेचे वर्णन आणि वातावरण मुलाच्या दृष्टिकोनातून चितारले आहे. या जत्रेचा नायक वडिलांच्या कडक शिस्तीखाली वाढणारा ब्राह्मण मुलगा आहे. त्याने तीन पत्त्यांचा जुगार खेळणे ही एक त्याच्या दृष्टीने क्रांतीच होय. खाऊसाठी दिलेले पैसे हा जुगारात तीन पानांवर लावतो. हरतो. हा पूर्ण हरला असता तर कथेला टोक आले असते. ती अधिक गहिरी झाली असती. कोकणातील उनाडपणा करणारे त्याचे बालमित्र, दशावतारी धैयकालेवाला आणि त्याचे रंगिले शब्दचित्र खास लक्षणीय उतरले आहे. आठलेकरांची सूक्ष्म निरीक्षणशक्ती आणि नर्म विनोदी शैली इथे दिसावी.

नग ही कथा व्यक्तिप्रधान आहे. 'न्हानू न्हयबागकर' ही मालवणी मातीतली एक वल्ली. जावयापासून व मित्रापर्यंत सर्वांना टोपी घालण्यात पटाईत असलेला. या कथेतील संवादलेखन सुरेख. शाली–माली बहिणी, जावई व रेवडेकर यांची शब्दचित्रे संवादातून उभी होतात. शब्दापलीकडील हा न्हानू न्हयबागकर 'नग' या कथेच्या नावात नेमका चित्रित होतो.

आंबटशौक किंवा वासूपणा करणाऱ्या काही प्रातिनिधिक शिक्षकांची उपहासात्मक शोकांतिकाच म्हणजे बोळा ही कथाच. 'विठू मास्तर'चे अक्कडबाज, वासूपण करणारे शब्दचित्र खास आले आहेच. पण लेखकाचे मित्र, गाववाले, पेमला, 'बोडकी बामीण' यांच्या शब्दचित्रांनी ही कथा लक्षणीय ठरते. लेखकाच्या विनोदनिर्मितीचे मासले कळतात. हा विनोद प्रसंगनिष्ठ आहे. त्यामुळे त्याची खुमारी अधिक. बोडकी बामणीच्या पेमल्याने विठू मास्तराच्या गालाला घेतलेला चावा लक्षात राहील. कथेचे निवेदन विद्यार्थी मुलगा करतो आहे. त्यामुळे त्याला त्याच्या भाषेची एक वेगळी चव येते. उदा. 'पेटल्यान खो दिसता कोणाक !' इ.

कुडाळी किंवा मालवणीचे अनेक नमुने इथे पहायला मिळतील. इथल्या ब्राह्मण मंडळींची म्हणून जी कोकणी आहे तिचा वापर आठलेकरांनी खास केला आहे. त्यामुळे संग्रहाला एक पृथगात्मता प्राप्त होते. तिच्या उच्चारातील खास नजाकत वेगळी. खास ठसका व जिवंतपणा वेगळा. या दृष्टीने लेखकाचे या पुस्तकातील संवाद मुळातून वाचावेत. न्हानू न्हयबागकराची बोली वेगळी. ती शिरोडा परिसरात

भंडारी वा गाबित समाज वापरतो तशी आहे. तसेच सालूची आई जी बोली बोलते ती वेगळी. ती ख्रिस्ती समाजाची आहे. अशा सर्व आडवळणी गावागावांतून शाळेतील बदल्या करीत आठलेकरांनी जीवनाची पायवाट तुडवली तिचा हा फायदा आहे असे म्हणता येईल. त्यामुळे या लेखनाला इथल्या लालमातीचा खास वास येतो.

इथल्या निसर्गाची प्रत्ययकारी वर्णने अनेक कथांत येतात. पृ. ५ वरील कोकणात जाणारा रस्ता व लेखकाचे मन. पृ. १५/१६ वरील 'रेणू' कथेतील डोहाचे वर्णन; कातर संध्याकाळ, 'तथास्तु'मधील वादळवर्णन, 'नानू चणेकर'मधील गाडगे गाव अशा प्रत्ययात्मक वर्णनांची एक यादीच देता येईल. इथली लालमाती, सागर, डोंगर, पायवाटा खेडोपाडीचे जीवन आठलेकरांच्या लेखनाचे स्फूर्तिस्थान आहे.

कोकणातील 'भटपणा'चा उल्लेख या कथांना ग्रामीण कथेचा रंग आणणारा वाटेल. या 'भटपणा'चा उपहास व विनोदासाठी लेखकाने केलेला उपयोग त्याच्या सहिष्णुतेचा द्योतक वाटेल. कारण लेखक स्वतः ब्राह्मण आहे.

प्रामुख्याने माणसांच्या अंगाने जशा या कथा सुचतात, तशाच त्या त्यांच्या अंतरंगातील माणुसकीच्या दंवाने भिजलेल्या वाटतात. या माणसांचा पिंड इथल्या मातीने आणि निसर्गाने घडवला आहे असे वाटते. विशेषतः कोकणपट्टीमधील 'खलाटी'चा भाग – असा इथे उल्लेख होतो त्या – 'खलाटी'चा – सागरपट्टी-वरील किनाऱ्याच्या – जीवनाचा प्रत्यय या कथांतून अधिक येतो. गाबित, भंडारी, इ. मराठी साहित्याला बऱ्याच प्रमाणात अज्ञात राहिलेल्या समाजस्तरीय जीवनाचे पडसाद हा या 'तथास्तु' संग्रहाचा एक विशेष म्हणता येईल.

एक प्राथमिक शिक्षक म्हणून ही इथली माती आठलेकरांनी आयुष्यभर तुडवली. त्यांच्यांत एक लेखक आहे ही गोष्टही त्यांना कुठेतरी उशिरा उमगली. प्रसिद्धीच्या सर्व साधनांपासून दूर राहून, निवृत्तीला आल्यावर त्यांच्या लेखनाला फुटलेली ही पालवी पाहून लेखनशक्तीची व तिच्याद्वारे होणाऱ्या अभिव्यक्तीची अपरिहार्यता पटावी. सामान्यतः एखादा प्राथमिक शिक्षक निवृत्तीनंतर इथली संस्कृत पाठशाळा चालवतो. 'चंपक'सारख्या मासिकांतून भाषांतरे करतो. इतकेच काय ? हिंदी भाषेत स्वतंत्र कथालेखन करू शकतो ही सुद्धा एक लक्षणीय बाब वाटते. 'नग', 'बोळा', 'रेणू', 'नानू चणेकर' या त्यांच्या लक्षणीय कथा होत.

(तथास्तु : हरिहर आठलेकर)

---

## कला

- रंगअंतरंग – रंगभूमी विकास प्रकल्प, प्रका. नॅशनल सेंटर फॉर परफॉर्मिंग आर्टस, नरीमन पॉइंट, मुंबई.



अनुक्रमणिका

# मुक्त संगीत संवाद : सं. डॉ. संगोराम

## विद्यमान संगीतविश्वाचे विराट दर्शन

नीलकंठ वासुदेव देशपांडे

शास्त्रोक्त संगीताच्या प्रत्यक्ष गायनाइतकेच त्याच्या समीक्षेचे, तांत्रिक बाबींचे विवरण कलाकारांना ज्ञात असणे आवश्यक आहे. संगीत वाद्ये आपण पहातो, काहीजण ती वाजवितातही, पण त्या वाद्याची सखोल माहिती कितीजणांना असते ? तद्वतच निरनिराळे 'राग' आपण कंठसंगीत अगर वाद्यांद्वारे ऐकतो पण त्याचे वर्गीकरण, बंदिश आणि राग यांचा संबंध, राग आणि समय इ. तांत्रिक बाबतीत आपण पूर्णांशाने अनभिज्ञ असतो. कोणत्याही कलेस प्रात्यक्षिक व तंत्र यांच्यामधील समतोल ज्ञानाशिवाय पूर्णत्व येत नाही. या सूत्रास मनापुढे ठेवून मुक्त संगीत संवाद या ग्रंथाची रचना केली आहे. संगीतक्षेत्रातील मान्यवर व्यक्तींचे लेख यात समाविष्ट केल्यामुळे तो संग्राह्य झाला आहे.

श्री. अरविंद गजेंद्रगडकर व श्री. बर्वे यांच्यातील प्रश्नोत्तररूपी राग वर्गीकरणाचा विचार अत्यंत महत्त्वपूर्ण आहे. भारतीय शास्त्रोक्त संगीतातील राग, त्यांचा गानसमय, त्यांचे थाट पद्धतीनुसार वर्गीकरण या सर्वच घटकांना अत्यंत भरभक्कम अशी बैठक असल्याने इष्ट तो परिणाम साधण्यात ते यशस्वी होतात. एकच स्वर, पण निरनिराळ्या थाटाच्या रागांमध्ये तो वापरला असता, कसा वेगळा वाटतो, हे बर्वे यांनी सोदाहरण दाखवून दिले आहे. त्याचप्रमाणे साथीला घ्यावयाच्या वाद्यांबाबतही बर्वे यांनी आपले मत निर्भीडपणे मांडले आहे. त्यांच्या मते हार्मोनियम हे वाद्य मुळातच भारतीय नाही. ते साथीस घेणे अयोग्य आहे.

इतर ललित कलांप्रमाणे संगीतकलेतही जुन्या व नवीन पिढीचा रियाज, कार्यक्रमांची पद्धत, श्रोत्यांशी संबंध या बाबतीत जनरेशन गॅप आढळते. या 'जनरेशन गॅप'वर दत्तोपंत देशपांडे, हिराबाई बडोदेकर इ. नामवंतांनी प्रकाश टाकला आहे. गुरुगृही जाऊन, गुरूंची सेवा, शागिर्दी करून संगीतकला आत्मसात करण्याचे दिवस मागे पडून त्याच्याऐवजी 'गांधर्व महाविद्यालय अशा स्वरूपाच्या संस्था अखिल भारतीय पातळीवर उदयास आल्या. त्यामुळे ही विद्या पूर्वीइतकी कष्टसाध्य राहिली नाही. याचे श्रेय पलुस्कर, पं. विनायकबुवा पटवर्धन इ. धुरीणांकडे जाते. ही विद्यालये व त्यांच्या उपकेंद्रांतून विद्यार्थ्यांना संगीताच्या

तांत्रिक व प्रात्यक्षिकांचं समतोल शिक्षण मिळते, त्यांच्या परीक्षा घेतल्या जातात, त्यामुळे कलाकार चांगला तयार होतो. संगीताच्या रियाझासाठी देण्यात येणाऱ्या वेळेबावत या तज्ञांनी मनोरंजक चर्चा केली आहे. पूर्वी गुरुगृही या विद्येचे संपादन हा एकच उद्योग होता. आता मात्र आपला शालेय अभ्यास करावयाचा असल्याने वेळेवर बंधने, मर्यादा पडल्या हे सत्य सर्वांनीच खुल्या दिलाने मान्य केले आहे. त्यावरोबरच मागील पिढीतील कलाकारांपेक्षा सध्याच्या कलाकारांमध्ये कलेची व्यापकता व सैद्धांतिक ज्ञान या गोष्टी अधिक आढळतात, हे स्पष्ट केले आहे. संगीत मैफलींचे रसग्रहण, समीक्षा यांवरील लेखांना स्थान मिळू लागल्याने संगीतातील अनभिज्ञ व्यक्तींनाही त्याचा आस्वाद घेणे सुकर झाले आहे.

या ग्रंथांचे संपादक डॉ. संगोराम यांनी अतिशय परिश्रम घेतल्याचे दिसून येते. नवीन पिढीतील अरविंद थत्ते इ. कलाकारांचे लेख समाविष्ट करून समतोल साधला आहे.

(मुक्त संगीत संवाद, संपादक– डॉ. श्रीरंग संगोराम, गोवर्धन प्रेस, पुणे ३०, पृष्ठे ४००. शंभर रुपये)

नीळकंठ वासुदेव देशपांडे
पुणे ४४

---

# रंग आणि गंध : डॉ. हिरेमठ

## माहिती खूप पण सदोष विवेचन

**प्रा. अविनाश वि. कांबळे,** श्रीरामपूर

डॉ. राजशेखर हिरेमठ यांच्या 'गझल, रंग आणि गंध' हृया ८० पृष्ठांच्या पुस्तकातील तीन प्रकरणांपैकी पहिल्या दोन प्रकरणात 'गझल'ची वैशिष्ट्ये विशद केलेली आहेत, तर शेवटच्या प्रकरणात मराठी गझलपरंपरेचा परामर्श घेतला आहे.

'गझल : रंग : वृत्तविश्लेषण' ह्या प्रकरणात गझलेचे वृत्त, काफिया–रदीफ हे यमकप्रकार, द्विपदी (शेर), शब्दयोजना, विषय वगैरे बाह्यांगाची चर्चा आहे. ह्यातील वृत्तचर्चा ही वरवरची व सदोष आहे. 'उर्दूमध्ये गझलसाठी पंधराहून अधिक वृत्ते वापरण्यात येतात' (पृष्ठ ११) हे विधान वस्तुस्थितीला धरून

नाही, कारण प्रत्यक्षात ही संख्या ६० च्या पुढे आढळते. ' गझलला मराठी जातिवृत्तात बसविण्याचा त्यांनी ( माधवराव पटवर्धन ह्यांनी ) प्रयत्न केला; हे विधानही गैरसमजातून आलेले आहे. पटवर्धनांनी गझल अक्षरगणवृत्तामध्ये बसवलेली आहे. ' गज्जलांजली 'चा पुरावा येथे देता येईल.

( अरबी वृत्तांना ) पूर्णपणे जातिरूप दिल्यास रचना सुकर होईल, पण लगक्रमाच्या वैशिष्टयामुळे म्हणण्याला जे आपोआप वळण येते, ते नष्ट होईल, असा स्पष्ट इशाराही माधव ज्युलियन यांनी गज्जलांजलीच्या प्रस्तावनेत दिला आहे. एवढे मात्र खरे की, अरबी वृत्तांना पूर्णपणे जातिरूप देण्याऐवजी त्यातील काही वृत्तांना मर्यादित जातिरूप देण्यालाच ते अनुकूल होते. तसे त्यांनी काही अक्षरगणवृत्तांना मर्यादित प्रमाणात जातिरूप दिलेले ' गज्जलांजली 'तील १, २८ ते ३३ व ५१ ह्या क्रमांकाच्या कवितांवरून स्पष्ट होते. परंतु ह्याचा अर्थ त्यांनी गझल मराठी जातिवृत्तात बसवण्याचा प्रयत्न केला, असा होत नाही, असे मला वाटते.

पटवर्धनांच्या मते वासंतउषा, देवप्रिया, सोमप्रिया, वियद्‌गंगा, जीवनप्रभा, मरीचिका, वैशाख, मेनका, आनंदकंद, प्रसूनांगी, सुरनिम्नगा, व्योमगंगा, भ्रांत, शुभकामी, प्रियशिष्या, विद्युल्लता, भुजंगप्रयात, सौदामिनी अशा जवळजवळ पंधरा जातिवृत्तांत गझलरचना करता येते. " हे विधान सु. रा. चुनेकर यांच्या ' माधवराव पटवर्धन वाङ्मयदर्शन ' ह्या ग्रंथात पृ. ८३ वर असल्याचे डॉ. हिरेमठ यांनी तळटीपेत नमूद केले आहे. परंतु प्रत्यक्षात हे किंवा अशा प्रकारचे विधान त्या ग्रंथात पृ. ८३ वर आढळत नाही. शिवाय ह्या विधानात नमूद केलेले ' वासंतउषा ' हे जातिवृत्त मुळात अस्तित्वातच नाही. तर ते ' गज्जलांजली 'तील १०८ व्या क्रमांकाच्या कवितेचे शीर्षक आहे व त्या कवितेत पटवर्धनांनी ' देवप्रिया ' व ' तोटक ' ह्या अक्षरगणवृत्तांमधून आलटून पालटून द्विपदी लिहून वृत्तांच्या संमिश्रणाचा प्रयोग करून पाहिला आहे. वरील विधानात नमूद केलेली इतर बहुतेक वृत्ते ही जातिवृत्ते नसून ती अक्षरगणवृत्ते आहेत. थोडक्यात, अक्षरगणवृत्ताऐवजी जातिवृत्त हा शब्द वापरून डॉ. हिरेमठ यांनी बरीच गल्लत केलेली आहे.

ह्याच प्रकरणात गझलेच्या विषयासंदर्भात डॉ. हिरेमठ ह्यांनी केलेली चर्चाही गोंधळात टाकते. गझलेमधील सर्व द्विपदींमध्ये एकच विषय हाताळलेला असेल किंवा नसेलही; परंतु तो भावगीताप्रमाणे सलग उलगडत गेलेला नसतो व तिच्यातील प्रत्येक द्विपदी वेगळी काढली तरी मागचापुढचा संदर्भ न पाहताही ती स्वतंत्र, संपूर्ण कविता वाटते, हे गझलेचे महत्त्वाचे लक्षण असते, असे सुरेश भट, सुधीर रसाळ इ. मानतात. डॉ. हिरेमठांनी मात्र त्याचा विपर्यास केलेला आहे.

तिसऱ्या प्रकरणात मराठी गझलपरंपरेचा परामर्श घेतलेला आहे. पुरेशा

अभ्यासाअभावी तो सूक्ष्म, सखोल मात्र झालेला नाही.

ह्या प्रकरणाच्या प्रारंभी डॉ. हिरेमठ म्हणतात, "मराठी गझलचा आरंभ मोरोपंतांपासून मानला जातो." (पृ. ५१). वस्तुतः हे मत केव्हाच कालबाह्य झालेले आहे. मोरोपंतांच्या अगोदर अमृतराय ह्यांच्यापासून मराठी गझलेला आरंभ झाल्याचे नवे मत कै. ना. ग. जोशी ह्यांनी १९६८ सालीच 'तुलनात्मक छंदोरचना' या ग्रंथात सप्रमाण मांडले आहे. तसेच त्यांच्याही आधी (१९२७ सालीच) पटवर्धनांनी 'छंदोरचना' ह्या आपल्या ग्रंथांत अमृतरायांच्या गझलेचा जाता जाता का होईना, उल्लेख केलेला आहे. "त्यामुळे मोरोपंतांच्या गझले-मुळे सुमारे एक हजार वर्षांपूर्वी मराठीत गझलकाव्याला सुरुवात झाली, असे म्हणावयाला हरकत नाही." (पृ.५१), हे विधान म्हणजे तर कमालच झाली. अमृतराय (१६९८–१७५३) व मोरोपंत (१७२९–१७९४) ह्यांची कारकीर्द होऊन आत्ता कुठे दोनशे–अडीचशे वर्षे होत आहेत. हजार वर्षे नाहीत.

संगीत नाटकांच्या पदांमधील गझलरचनेच्या संदर्भात डॉ. हिरेमठ म्हणतात, "त्यानंतर (अमृतराय–मोरोपंतांनंतर) गझलचे दर्शन घडते ते मराठी नाटकाच्या आरंभकाळी म्हणजे १८४० ते १९०० च्या दरम्यान" (पृ. ५२). हे विधान मोघम स्वरूपाचे आहे व ते प्रबंधात्मक स्वरूपाच्या लेखनात खटकणारे आहे. नोव्हेंबर १८४३ मध्ये सांगली येथील रंगभूमीवर आलेले विष्णुदास भावे ह्यांचे 'सीतास्वयंवर' नाटक हा मराठी नाटकांचा आरंभ मानला जातो. आणि मराठी नाट्यवाङ्मयाचा खऱ्या अर्थाने आरंभ १८६० च्या सुमारास झाला, असे मानले जाते. तसेच किर्लोस्करांच्या 'शाकुंतल'च्या रूपाने १८८० मध्ये मराठी संगीत नाटकाचा आरंभ झाला असे मानले जाते. १८४३ ते १८६२ ह्या मधल्या काळा-तील एकाही नाटकात गझल आढळत नाही. विनायकशास्त्री नातू ह्यांच्या १८६२ मधील 'नल' ह्या नाटकात मात्र एकूण पदांमध्ये दोन गझला आढळतात. पुढे किर्लोस्करांच्या १८८० मधील 'शाकुंतल' ह्या संगीत नाटकातही दोन गझला आढळतात. तात्पर्य असे की, १८६२ मध्ये मराठी नाटकात पहिल्यांदा गझल दिसते व तिची सलग परंपरा मात्र १८८० पासून सुरू झालेली दिसते.

माधव जूलियनांच्या गझलांबद्दल बोलताना डॉ. हिरेमठ म्हणतात, "इ. स. १९१९ ते १९२२ च्या दरम्यान त्यांनी 'गज्जलांजली'तील गझलांचे लेखन करून मराठीत गझलांचे दालन सजविले." (पृ. ५२). वस्तुतः 'गज्जलांजली'तील सर्वच १०८ कविता गझल ह्या काव्यप्रकारातील नाहीत. तसेच १९१९ ते १९२२ ह्या कालावधीतील फक्त चाळीसच कविता 'गज्जलांजली'त आहेत व राहि-लेल्या अजून ६८ कविता १९२३ ते १९३३ ह्या कालावधीतील आहेत. ह्या एकूण १०८ कवितांमध्ये गझलांबरोबरच मुस्तझाद् (दिडक्या रचनेचा प्रकार), कसीदा

(स्तुतिकाव्य), रुबाई, सुनीत, नाट्यगीत अशा इतरही काव्यप्रकारांमधील कविता आहेत.

पुढे मराठीतील काही गझलकारांचा व त्यांच्या गझलांचा परामर्श घेतला आहे. माधव जूलियन, सुरेश भट ह्यांच्याशिवाय संजीव, अनिल, मंगेश पाडगावकर, विंदा करंदीकर, वसंत बापट, नारायण सुर्वे, आरती प्रभू ह्यांचा निर्देश केलेला आहे. हिमांशु कुलकर्णी, गंगाधर महांबरे व खावर ह्या तीन कवींचाही परामर्श घेतला.

माधव जूलियनांबद्दल पुढील चुकीची विधाने डॉ. हिरेमठ यांनी केली आहेत. "त्यांनी मात्रावृत्तात गझल बसवून त्यांना (गझलांना) भावगीतसदृश रूप दिले." "...रदीफ–काफिया यांची त्यांना सूक्ष्म जाणीव होती असे वाटत नाही." (दोन्ही विधाने पृ. ५३ वर). वस्तुतः माधव जूलियन ह्यांनी गझल मात्रावृत्तात बसविलेली नसून अक्षरगणवृत्तात बसवलेली आहे. ह्या संदर्भात अधिक चर्चा पूर्वी केली आहेच. तसेच त्यांना रदीफ–काफियाची सूक्ष्म जाणीव होती, हेच त्यांच्या 'गज्जलांजली'तील ७, १३, ४७ व ५६ ह्या क्रमांकाच्या ४ गझलांवरून स्पष्टपणे दिसून येते. पुढे डॉ. हिरेमठ ह्यांनी 'कवी अनिल : उर्दू गझलांचा मराठी अवतार' ह्या शीर्षकाखाली कवी अनिल यांच्या दशपदीला त्यांनी उर्दू गझलांचा मराठी अवतार म्हटले आहे. खरे पाहता आपल्या समीक्षकांनी अनिलांच्या दशपदींना मारूनमुटकून गझलेमध्ये बसवण्याचा जो प्रयत्न चालविला आहे, तो तितकासा योग्य नाही. स्वतः अनिलांचाही ह्या समीक्षकांवर तसा आक्षेप आहे.[१] प्रा. निशिकांत ठकार[२], प्रा. डॉ. सुधीर रसाळ[३], प्रा. डॉ. अक्षयकुमार काळे[४] व आता डॉ. हिरेमठ हे अनिलांच्या दशपदींमध्ये रदीफ–काफिया हे यमकप्रकार आहेत, नाट्यात्म विरोधन्यास आहे, गझलवृत्तीचा आविष्कार आहे, असे सांगून त्यांच्या दशपदींना मराठी गझलेचाच एक उपप्रकार, गझलेचा मराठी साक्षात्कार, उर्दू गझलांचा मराठी अवतार अशी संबोधने लावतात. गझलेचे हे विशेष अनिलांच्या

---

१. मला आलेले अनिलांचे १० व १२ एप्रिल ८२ रोजीचे सविस्तर पत्र (म. सा. पत्रिका, एप्रिल–जून १९८९ अंक.)

२. प्रा. निशिकांत ठकार, 'मराठी कविता : स्वरूप आणि विवेचन', पहिली आवृत्ती. पुणे, इ. स. १९७७, पृ. १७३, १७४ व ३१०

३. सुधीर रसाळ, 'गझल : एक कविता प्रकार आणि मराठी गझल', मराठवाडा दिवाळी अंक १९८०, औरंगाबाद, पृ. १६५

४. डॉ. अक्षयकुमार काळे, 'अनिल : प्रयोग आणि मर्यादा', "सूक्तसंदर्भ", पहिली आवृत्ती, नागपूर, इ. स. १९८५, पृ. ६५

' दशपदी ' संग्रहातील सर्व ३९ दशपदींमध्ये नाहीत, तर केवळ शेवटच्या ५ दशपदीं- मध्येच आहेत. ह्या ५ दशपदींना स्वत: अनिलांनी गझल म्हटले असले, तरी त्यांनीच त्यांमधील मर्यादा लक्षात घेऊन गझलेपेक्षा त्या दशपदीच आहेत, असेही स्पष्टपणे म्हटलेले आहे.[५] हे सर्व लक्षात घेता डॉ. हिरेमठ ह्यांनी केलेली अनिलांच्या दश- पदींची चर्चा वादग्रस्त ठरते.

विंदा करंदीकरांच्या ' जातक 'च्या १९६८ च्या पहिल्या आवृत्तीतील १८ गझ- लांचाच विचार केलेला दिसतो. ' जातक 'च्या १९८३ मधील सुधारित दुसऱ्या आवृत्तीत करंदीकरांनी नव्याने ७ गझलांचा अंतर्भाव केलेला आहे, त्यांचाही विचार होणे आवश्यक होते.

" करंदीकरांनी ' जातकमध्ये केलेला गझलप्रयोग समर्थ व यशस्वी आहे. पण एकदाच गझल लिहून त्यांनी लेखन का थांबवावे ते समजत नाही. " (पृ. ६३) हे त्यांचे विधान त्यामुळे अर्थहीन ठरते.

डॉ. हिरेमठ म्हणतात, " विशेषत: स्त्रियांचे मनोगत त्यांनी शब्दबद्ध केले आहे. उर्दू–फारसीमध्ये ते दिसत नाही. म्हणून करंदीकरांनी नवीन प्रयोग केला असे म्हणायला हरकत नाही. " (पृ. ६२). अधिक खोलात जाऊन विचार केला तर असे दिसते की, गझल हा एक आत्मनिष्ठ काव्यप्रकार असून त्यातून कवी स्वत:चे अनुभव व्यक्त करीत असतो; तर नाट्यगीत हा वस्तुनिष्ठ काव्यप्रकार असून त्यातून कवी परकाया/परचित्त प्रवेश करून दुसऱ्याचे अनुभव आपल्या शब्दांमधून व्यक्त करीत असतो. त्यामुळे करंदीकरांनी ' जातक'मध्ये स्त्रियांची मनोगते ज्या कवितांमधून व्यक्त केलेली आहेत, त्या कविता वस्तुत: नाट्यगीतेच होत. मात्र ही नाट्यगीते गझलेचा केवळ आकृतिबंध वापरून लिहिलेली आहेत. परंतु म्हणून त्यांना गझला म्हणणे योग्य होणार नाही. उलट गझलेच्या दृष्टीने तो दोषच म्हणावा लागेल. त्यातूनही क्षणभर गृहीत धरले की हा एक नवीन प्रयोग आहे, तरीही तो मराठीत फक्त करंदीकरांनीच व तोही सर्वात प्रथम केलेला आहे, असे म्हणता येत नाही. स्त्रियांची मनोगते व्यक्त करण्याचा हा तथाकथित प्रयोग करंदी- करांच्या अगोदर माधव जूलियनांनी केलेला आहे, हे त्यांच्या ' गज्जलांजली'तील ४०, ६५, ७०, ७४, ७५, ८७, ८८, ८९ व १०५ ह्या ९ कवितांवरून स्पष्ट होते. करंदीकरांच्या इतरही गझलांपैकी बऱ्याचशा गझला खऱ्या अर्थाने गझला म्हणता येत नाहीत. सलगपणे आशय उलगडत नेणाऱ्या त्या गझलेच्या आकृतिबंधातील भावकविताच वाटतात.

---

५. अनिल, ' पदचर्या ', " दशपदी ", पहिली आवृत्ती, मुंबई, इ. स. १९७६, पृ. ४६

'गझल, गंध व वृत्तिविश्लेषण ' हे प्रकरण मुळातून वाचण्याजोगे उतरलेले आहे. ते निश्चितच सर्वात उत्तम आहे. गझल ही एक वृत्ती आहे व तिच्यात आत्मप्रेम, जीवनप्रेम, संघर्षप्रियता, सौंदर्यप्रेम, प्रेम व शृंगार ह्यांची धुंदी, विफलतेतील उदात्तता, मदिरासक्ती, चिंतनशील भाष्य, नाट्यात्मकता ह्या घटकांचा अंतर्भाव होतो, हे उर्दू व मराठी गझलांमधील द्विपदी उद्धृत करून स्पष्ट केलेले आहे. तसेच 'रोमँटिसिझम'च्या धर्तीवर ह्या वृत्तीला 'गझलीझम ' असे नाव देऊन तो एक कवितेतील वेगळा संप्रदाय मानावा, असा महत्त्वाचा विचार त्यांनी मांडला आहे. गझल हा काव्यप्रकार हाताळताना अनेक मराठी कवींना अपयश का आले, हे ते नेमकेपणाने सांगतात. " अनेक मराठी कवींच्या बाबतीत असे झालेले आढळते की गझलचे वृत्त किंवा वृत्ती यांपैकी एकाची तरी त्यांनी उपेक्षा केल्याने त्यांच्या गझलांना खरे गझलरूप प्राप्त होऊ शकले नाही. " (पृ. २३) पुस्तकाच्या शेवटीही गझल मराठीत का रुजू शकली नाही, ह्याची समीक्षकांनी केलेली मीमांसा उद्धृत करून त्यावर मार्मिक मल्लीनाथी केली आहे. हा भाग अभ्यासपूर्ण व तर्कशुद्ध वाटतो. पुस्तकाचा ढळलेला तोल ह्या शेवटच्या विवेचनाने सावरलेला आहे.

(गझल : रंग आणि गंध : प्रा. डॉ. राजशेखर हिरेमठ, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, प्रथमावृत्ती १९८९, पृष्ठे ८०, किंमत २५ रु.)

---

# गजलदर्पण : डॉ. वाईकर

**१५६ गजला आणि १००० शेर**

---

**रंजना गोडांबे**

---

नागपूरचे सुप्रसिद्ध डॉ. विनय वाईकर ह्यांनी वैद्यकीय शास्त्रामध्ये जशी प्रगती केली आहे तसेच साहित्यक्षेत्रातही. विशेषत: गजल हा त्यांचा आवडता विषय.

वास्तविक गजल हा उर्दूमधला काव्यप्रकार परंतु वाईकरांनी जीव ओतून त्यातले मर्म सहज सोपे करून दाखवले आहे. त्यांचा नवा कोशग्रंथ 'गजलदर्पण' उत्तम सजावट, सुबक छपाईने प्रसिद्ध झाला आहे. प्रस्तुत ग्रंथाच्या आभार प्रकटनामध्ये गजलदर्पणच्या रचनेमधली नागपुरी वृत्ती जाणवते. त्यांचा हा ग्रंथ उर्दू गजल संग्रहाचा असला तरी त्याचे नमन केले आहे वैदिक मंत्राने. 'मर्ता अमर्तस्य ते भूरि नाम मनामहे '. ग्रंथामध्ये १५६ गजल आणि हजार शेर समाविष्ट केलेले आहेत.

उर्दू कवि इंशा, अलिवेग, नाजनी, रंगीन, मीर, मोमीन, दाग, गालिब, मंसूर इलाहाबादी, इकबाल, जॉकपासून ते जिगर मुरादाबादी, शकील बदायुनी, फैज अहमद फैज, जाँ निसार अख्तर, कतील शिफाई, सुदर्शन फकीर अशा सुमारे ५० विख्यात शायरांच्या गजला आणि शेर आहेत.

डॉ. वाईकरांनी ह्या कोशग्रंथामध्ये गजलांचे दोन प्रकार केले आहेत. पहिला प्रकार म्हणजे 'गैर मुसलसिल' ह्या प्रकारात एका शेराचा दुसऱ्या शेराशी संबंध असायलाच पाहिजे असे बंधन नाही. प्रत्येक शेर एक स्वतंत्र काव्य असते. हे शेर विविध विषयांवरचे असतात. ते केवळ वृत्त, उपांत्य आणि अंत्य यमक ह्यांनी बांधलेले असतात. गजलांचा दुसरा प्रकार 'मुसलसिल' ह्या गजलातील शेर (द्विपद) एकमेकांशी एकाच विषयाने किंवा भाववृत्तीने बद्ध असतात. मुसलसिल गजला फार कमी प्रमाणात आढळतात. ह्याचे कारण म्हणजे एकच सूत्र, एकच रस, एकच भाववृत्ती स्थिर ठेवून चढत्या रंगतीने शेरांची रंगत ठेवणे अधिक अवघड तसेच कौशल्याचे काम आहे. गैरमुसलसिल गजलांमध्ये प्रत्येक शेरा (द्विपदी) मध्ये भावना बदलत असतात आणि मुसलसिल गजलांमध्ये संपूर्ण एकच भावना ओत-प्रोत भरलेली असते. वाईकरांनी गजलांमधून अगदी सूक्ष्मपणे हे बारकावे स्पष्ट केले आहेत. संग्रहातील प्रत्येक गजल आवडेल असे नाही. गालिबची पहिलीच शब्द–प्रचुर बोजड गजल आहे – 'नकश फिरयादि' परंतु वाईकरांनी क्लिष्ट गजलचे भाषांतर व्यवस्थित केले आहे. लता मंगेशकरांनी ह्या गजलचा पहिलाच शेर ध्वनिमुद्रिकेसाठी वापरला आहे. गजल म्हणजे काय ह्याची व्याख्या वाईकरांनी सहजतेने सांगितली आहे. त्यांच्या कसोटीवर ह्या गजलांची रुची चाखायची आहे. ह्या गजलांमध्ये उत्तम, चांगली, मध्यम अशी आखणी करता येते. गजल ह्या प्रकाराचा अर्थ स्त्रियांबद्दल किंवा स्त्रियांचे सूक्ष्म वर्णन करणारी काव्यपंक्ती असा आहे. त्यातूनच मग गजलांमध्ये प्रेमभावना जागृत झाली. आणि गजलाला प्रेम-गीताचे स्वरूप प्राप्त झाले. प्रेमाची विविध रूपे गजलांमधून प्रतिबिंबित झालेली दिसतात.

शायरी क्या है ? दिली जजबातका इजहार है ।
दिल अगर बेकार है, तो शायरी बेकार है ॥

ह्या संग्रहातील शायरीत उत्कट भावनांचा विलास आहे. शायरी करताना शायरच्या हृदयात तळमळ असावी लागते. तरच शायरीमध्ये भावनांचा उत्कट परिपाक निर्माण होतो. भावनांचा उत्कट परिपाक शायर आपल्या समर्थ प्रतिभेतून साकार करतात. उर्दू शब्दसंपदेविषयी डॉक्टरांनी लिहिले आहे की उर्दूमध्ये अरेबिक, पर्शियन, चिनी, तुर्की भाषेतून शब्द आलेले आहेत. गजल करताना व्याकरणाचे नियमही सांगितले आहेत. उर्दूमध्ये लांबलचक समास आहेत. पण त्या समासांचा

विग्रह करणे अवघड नाही. उर्दू काव्यात काही विशिष्ट प्रकारचे संकेत आहेत. (शमा–परवाना म्हणजे दीप–ज्योत) ह्या संग्रहातील गजलांमधून, शेरांमधून असे दिसून येते की उर्दू शायरी ही संकेतबद्ध आहे. प्रत्येक शायरीत संकेत दिसून येतो. डॉ. वाईकरांनी विशिष्ट शब्दांची सूची तयार केली आहे. त्यामुळे शेर समजणे अधिक सुलभ झाले आहे.

गजलामध्ये आत्मनिष्ठ भावना अगदी उत्कट असते आणि हीच उत्कटता 'गजलदर्पण 'मध्ये प्रतिबिंबित झालेली दिसते. गजलांचे भावानुवाद त्यांच्या भाषा कौशल्याची साक्ष देतात.

काही गजल आणि शेर अपवाद सोडले तर डॉ. वाईकरांनी निवडलेले शेर नि गजला दिलचस्प आहेत. रसिकांना 'गजलदर्पण' हा संग्रह गजल शायरींचे रंजक दर्शन घडवितो.

(गजलदर्पण : डॉ. विनय वाईकर, अमित प्रकाशन, रामदास पेठ, नागपूर, पृ १८२, पासष्ट रुपये)

---

# 'उष:काल' : उषाकिरण

## चित्रपटातील भानगडींपेक्षा घरगुती आठवणीत रंगलेली आत्मकथा

सौ. वसुंधरा बनहट्टी

---

मराठी व हिंदी पडद्यावरील, आणि मराठी रंगभूमीवरील उषाकिरण ह्या एक अभिनयकुशल अभिनेत्री. नटी. तेव्हा त्यांच्या आत्मचरित्रात, काही चटकदार, बिनधास्त हकीकती वाचायला मिळतील, या अपेक्षेने कोणी हे पुस्तक वाचायला घेतले तर त्याची साफ निराशा होईल.

उषाकिरण ह्या माहेरच्या उषा मराठे आणि सासरच्या उषा खेर. कोकणस्थ ब्राह्मण. मध्यमवर्गीय खानदानी व्यक्तित्व. केवळ वडिलांमुळे आणि दैवयोगाने अभिनय क्षेत्रात प्रवेश झाला त्यामुळे वेगळे जीवन घडले. एरव्ही ही उषा चारचौघी-सारखी, साधीसुधी गृहिणी बनून सुखवस्तू फ्लॅटमधे आपल्याशी गप्पा मारीत बसली असती, असे हे चरित्र वाचताना वाटत राहते.

वय वर्षे आठ ते वय वर्षे साठ या काळात, स्वत: काय कमावलं याचा शोध घेण्याच्या निमित्ताने केलेले हे निवेदन. पहिल्या चार पानातच उषाबाईंनी आपल्या



अनुक्रमणिका

संसारचित्राची बाह्यरेषा – आउटलाईन आपल्यासमोर मांडली आहे. साफल्याचे समाधान व्यक्त करून ' मला संसारात आणखी काय पाहिजे ?' असा प्रश्न विचारून या साठाउत्तराच्या कहाणीचा आरंभ केला आहे

हिंदू स्त्रीला, लहानपणी वडिलांचा, तरुणपणी नवऱ्याचा आणि म्हातारपणी मुलाचा आधार असतो असे म्हणतात. लहानपणी उषाताई वडिलांच्या इच्छेप्रमाणे वागल्या. इतकेच नव्हे, तर त्यांच्या इच्छेच्या तालावर अक्षरश: नाचल्या. त्यांच्या वडिलांनी लहानपणीच नृत्य, अभिनय, सिनेमा, नाटक ह्या क्षेत्रांत घातले. " सुरुवातीच्या काळात, बापूंच्या (वडील) हट्टामुळे म्हणा किंवा त्यांच्या महत्त्वाकांक्षेपोटी म्हणा, नको वाटत असताना नाटक–सिनेमातून काम करावं लागलं " असं त्या म्हणतात. काही काळाने वडिलांशी असहकार पुकारून त्यांनी डॉ मनोहर खेर यांच्याशी लग्न केले. अभिनयक्षेत्रात बरेच नाव कमावले. पैसा मिळवला पण व्यक्ती म्हणून स्वतंत्र असूनही मुळात एक अस्सल संसारी स्त्री म्हणूनच त्या वावरल्या. एकीकडे संसार करीत असता दुसरीकडे सिनेमात काम केले. पण त्यांच्या मनातली आर्य हिंदू स्त्री मात्र जागृत होती. हे अधूनमधून आपल्याला जाणवतें. " त्याची ( देव आनंदची ) सीट नेमकी माझ्या आणि मनोहरच्या शेजारचीच होती... माझे आणि देव आनंदचे लव्हसीन त्या काळच्या मानाने फार ' इंटिमेट ' होतें. मला दुसऱ्याच्या बाहुपाशात बघताना, मनोहरना काय वाटत असेल, या विचारानेच मी भांबावून गेले होते. " उषाकिरण ह्या व्यक्तीच्या कर्तबगारीची आणि अभिनयाची वेल जरी स्वतंत्रपणे फुलली बहरली असली, तरी तिची वाढ मात्र संसारवृक्षाच्याच आधाराने होत होती.

म्हणूनच सिनेमाक्षेत्रातल्या आठवणी फार सांगत न बसता, त्यांनी आपले खाजगी आयुष्य आणि अगदी जवळचे नातेवाईक यांच्याबद्दलच्याच आठवणी अधिक दिल्या आहेत. अमिया चक्रवर्ती आणि त्यांचे प्रेमसंबंधदेखील, दिग्दर्शक आणि नटी यांचे न वाटता केवळ ' दोन प्रेमिक दोन प्रेमी जीव ' याच नात्याचे वाटतात. नटनटींच्या खाजगी भानगडी सांगण्यात त्यांना रस नाही.

आपल्या माणसाचे वाईट वर्तन एखाद्या वाक्यात सुचवून बोलणे खुंटवले आहे. वडिलांना दारूचे व्यसन होते हे एकदाच स्पष्ट लिहिले आहे. " काही वेळा तर पिक्चरसाठी पैसा गोळा करण्याच्या आमिषात मला व ताईला पैसेवाल्या लोकांसमोर नाचही करावा लागत असे. ते शेट लोक दारू पिऊन पिऊन धुंद होत असत. आमच्याशी लगट करण्याचा प्रयत्न करीत. पण आमच्या नशिबानंच आम्ही आमचा बचाव करू शकलो. " असे त्यांनी म्हटले आहे.

अशा अस्थिर माणसाच्या बायकोची जी परिस्थिती असते तीच उषाताईंच्या आईची आहे. उषाताईंना आपल्या आईच्या संसारातल्या कुचंबणेची जाणीव आहे.

आपण घरातली कर्ती मुलगी आहोत या भावनेने उषाबाईंनी माहेरी आणि सासरीही आपली कर्तव्ये पार पाडली. अमिया चक्रवर्तीसारख्या संसारी माणसाशी असलेले आपले प्रेमसंबंधही समरसून प्रामाणिकतेनें सांगितले आहेत. " मनात बोचणं होतं की एक ना एक दिवस मला चक्रवर्तींना सोडावं लागणार आहे. हे कळत असूनसुद्धा जितकं त्यांच्या सान्निध्यात रहायला मिळेल तितकं राहायचा मी प्रयत्न करीत होते. " म्हणूनच, कालान्तराने या प्रेमगाठी, त्या तोडून टाकू शकल्या.

उषाताईंच्या जीवनकालाचे काही कालखण्ड या चरित्रात पडलेले दिसतात. आजोबांकडचे दिवस सुखाचे शैशवात बागडण्याचे होते. वडलांकडचे दिवस कठ-पुतळीसारखे, स्वतःच्या इच्छा आकांक्षा दूर ठेवून, सर्व सहन करण्याचें होते. नंतर स्वतःचे स्वतः ठामपणे निर्णय घेऊन, प्रसंगी विरोध सहन करून वागण्याचे दिवस, नंतर पुन्हा पतिसहवासाचे सुखद दिवस, आणि आता उतार वयात मुलांसमवेत साफल्य उपभोगण्याचे दिवस.

आपल्या डॉक्टर पतीबरोबर केलेल्या परदेश दौऱ्याची हकीकत वाचताना आपण मध्येच एखादे प्रवासवर्णनच वाचतो आहोत असा भास होतो.

नंतर जाणवते ती उषाताईंमधली आई: मुलीने नाव कमावून मोठे व्हावे म्हणून तिच्या करिअरला पुश् करणारी आई, लता मंगेशकरने तिला आशीर्वाद दिले हे कौतुकाने सांगणारी आई, मुलीने परमधर्मीयाशी लग्न केले म्हणून दुःखी होणारी, मुलीला ॲवॉर्ड मिळाले म्हणून सुखी होणारी आई. मुलगा प्रेमभंगाने दुःखी झाला म्हणून चिंता करणारी आणि नंतर त्याचे लग्न लावून देऊन सुनेचीही आई बनलेली आई.

या पुस्तकावर एक प्रकारची ब्राह्मणी छाप सर्वत्र दिसते. कर्मठ कोकणस्थ ब्राह्मणाच्या मुलींच्या मानाने वेगळी वाट चोखाळावी लागली तरी रक्तातला अस्सल ब्राह्मणीपणा एकूण शैलीवर दिसतो. सासरच्या लोकांचे आणि आपले मतभेद चवीने चघळत न बसण्यात दिसतो. परक्याबरोबर लव्हसीन, पती पाहतो याचा संकोच जाणवतो. लेकीचे लग्न हौसेने झाले नाही म्हणून खंत वाटते तर लेकीची जागा सुनेने घेतली म्हणून सुखही होते.

प्रस्तावनेत उषाताईंनी म्हटले आहे की ' लेखनाशी संबंध नसताना आपण लेखणी हातात धरली. ' पण लेखनाचा संबंध लेखणीशी नसून प्रत्यक्ष मनाशी असतो. उषाताईंजवळ अभिनयकुशलतेबरोबरच सुसंस्कृत मन आहे म्हणून हे आत्मचरित्र वाचनीय झाले आहे.

(' उषःकाल ' : उषाकिरण, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठे १८८, पासष्ट रु.)

# प्रवासवर्णन : डॉ. वसंत सावंत

## मराठीतील प्रवासवर्णनांचा उद्बोधक आढावा

शंकर सारडा

डॉ. वसंत सावंत यांनी पीएच. डी.साठी लिहिलेल्या आपल्या प्रवासवर्णनावरील प्रबंधाचे पुनर्लेखन करून सिद्ध केलेले 'प्रवासवर्णन – एक वाङ्मयप्रकार' हे साडेचारशे पृष्ठांचे पुस्तक महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने प्रसिद्ध केले आहे. वसंत सावंत हे कवी म्हणून प्रसिद्ध आहेत; अधूनमधून समीक्षात्मक लेखनही ते हौसेने करतात. सातआठ वर्षे खपून प्रवासवर्णनावरचा प्रबंध त्यांनी हातावेगळा केला; त्यासाठी मराठीतील १८०० सालापासून प्रसिद्ध झालेल्या मराठी प्रवासवर्णनपर सत्तरावर पुस्तकांची जमवाजमव त्यांनी केली; आणि ऐंशी संदर्भग्रंथाचाही उपयोग त्यांनी केला. प्राचीन मराठीतील प्रवासवर्णनावर एक परिशिष्ट जोडून त्यात स्थानपोथी, सह्याद्री वर्णन आणि ऋद्धिपूरवर्णन या महानुभाव ग्रंथांपासून ते स्थानमहिमा व्यक्त करणाऱ्या लावण्यांपर्यंतचा फेरफटका केला. साहजिकच प्रवासवर्णनपर साहित्याच्या अभ्यासकांना हे पुस्तक उपयुक्त ठरेल.

पीएच. डी. चा प्रबंध म्हटला की काही पथ्ये पाळावी लागतात. निवडलेल्या विषयाच्या मूळाशी जावे लागते. वसंत सावंत यांनी त्या दृष्टीने भारतीय संस्कृतीत व साहित्यात प्रवासविषयक जी भूमिका आढळते तिच्यापासून आरंभ केला आहे. माणसाचा माणूसपणा सिद्ध करणाऱ्या अनेक गोष्टींपैकी मन ही एक प्रमुख गोष्ट असून या मनाच्या पाठीमागे वावरणारी संचरणशीलता त्याला प्रवासाला उद्युक्त करते हे काका कालेलकरांचे वचन सावंत उद्धृत करतात. प्राचीन भारतीयांच्या वैश्विक वृत्तीला प्रवासाचे कोड होते; पण पुढे यात्र प्रवासाची भीती हिंदूवर्गात निर्माण झाली त्यामुळे सिंधूबंदीची बेडी पडली. हिंदूंची साहसशक्ती लोपली. समुद्र-पर्यटन निषिद्ध मानले गेले. ज्या संस्कृत सुभाषितांमध्ये प्रवासाचे फायदे सांगण्यात आले आहेत त्यांची नोंद करून मोरोपंतांच्या 'केल्याने देशाटन पंडित मैत्री सभेत संचार, शास्त्रग्रंथविलोकन मनुजा चातुर्य येतसे फार' किंवा 'साधु चलता भला' वगैरे उक्तींचा समाचार घेतला गेला आहे. प्रवासाची कारणे वा उद्देश म्हणून २१ गोष्टींची यादीही सावंत देतात.

प्रवास आणि वर्णन या शब्दांची उकल करून, प्रवासवर्णन हा शब्दप्रयोग का



अनुक्रमणिका

पसंत करावा याचीही थोडीशी चर्चा दुसऱ्या प्रकरणात येते. प्रवासवर्णन म्हणजे प्रवासात पाहिलेल्या किंवा घडलेल्या गोष्टींचा वृत्तान्त अथवा प्रवासपर सचित्र भाषण वा व्याख्यान असे दोन अर्थ सावंत देतात; प्रवास करणारा कोणीतरी प्रवासी असल्याशिवाय प्रवास घडणे शक्य नाही आणि प्रवाशाने आपला प्रवासाविषयी वा प्रवासातील अनुभवाविषयी काही बोलल्याविना प्रवासवर्णन शक्य नाही हे या प्रकरणात सांगण्यात येते.

तिसऱ्या प्रकरणात प्रवासवर्णनाचे काही मूलभूत घटक स्पष्ट करताना लौकिक मी व कलात्मक मी निवेदक (प्रवासी), प्रवास व प्रदेश ही घटकतत्त्वे, वस्तुनिष्ठ प्रदेशचित्र, भूप्रदेशाचे व्यक्तिमत्त्व, यांचा विचार करण्यात आला आहे. प्रवासवर्णनाला निवेदकाच्या प्रतिभेने जिवंतपणा कसा येतो आणि प्रवासवर्णन हा वेगळा वाङ्मयप्रकार मानता येईल का याची चर्चा पुढच्या दोन प्रकरणात आली आहे. प्रवासवर्णन व तत्सदृश निबंध, ललित लेख, भूगोल, इतिहास, समाजशास्त्र, स्थलवर्णन, दैनंदिनी व पत्ररूप प्रवासवर्णने यांच्यातील संबंध तपासण्यात आले आहेत. प्रवासवर्णन हा वेगळा ललित वाङ्मयप्रकार मानावा असे सावंत यांचे मत आहे. स्थलवर्णन म्हणजे प्रवासवर्णन नव्हे, (स्थळाचे वर्णन हे वस्तुनिष्ठ; प्रवासवर्णन हे प्रवाशाच्या संस्काराचे व्यक्तिमत्त्वाचे रंग घेऊन येणारे वर्णन), आत्मचरित्रातील प्रवासाचे उल्लेख म्हणजे प्रवासवर्णन नव्हे, (प्रवासवर्णनावर प्रवास या घटकाची हुकुमत चालते तशी आत्मचरित्रात चालत नाही), लघुनिबंध वा ललितनिबंध म्हणजे प्रवासवर्णन नव्हे (लघुनिबंधाचे विषय अनेक; त्यात प्रवासविषय हवाच असे बंधन नाही.) अशी तर्कमालिका सावंत पेश करतात. प्रवासवर्णन हा लवचिक ललित लेखनप्रकार आहे. ऐतिहासिक कादंबरीत इतिहासाला महत्त्व किती आणि कल्पनेला किती हा प्रश्न जसा जटिल तसाच प्रवासवर्णनात स्थलवर्णनाला महत्त्व किती आणि ते स्थल पाहणाऱ्या व्यक्तीच्या कल्पनाचमत्कृतीला किती हा न सुटणारा पेच आहे.

इ. स. १८०० ते १९६५ मधील सुमारे १३० प्रवासपर ग्रंथ मराठीत आढळतात. इंग्लंड देशाचे वर्णन (१८३५), काशीप्रकाश (१८५२), गोकर्ण महाबळेश्वराचे यात्रेप्रकरणी वृत्तान्त (१८६३), काशीयात्रा (१८७२) या पहिल्या टप्प्यातील पुस्तकांत स्थलवर्णनाला महत्त्व आहे.

गोडसेकृत माझा प्रवास (१८८३), पंडिता रमाबाईंचे इंग्लंडचा प्रवास (१८८३), पावगींचे विलायतचा प्रवास (१८८९), गोविंद बाबाजी जोशी यांचे लाहोरचा प्रवास (१८९५), लोकमान्य टिळककृत मद्रास, सिलोन व ब्रह्मदेश येथील प्रवास (१९०९) हे वृत्तान्तवजा लेखन आहे. पंडिता रमाबाईंची पुस्तके ही मात्र त्यात वेगळेपणाने उठून दिसतात. त्यात रमाबाईंच्या व्यक्तिमत्त्वाचे व चिंतनाचे रंग

मिसळलेले आहेत. गोडसेभटजींच्या पुस्तकात आत्मचरित्रात्मक आणि ऐतिहासिक तपशील अधिक येतात. लोकमान्यांनी आपल्या प्रवासाची माहिती एका व्याख्यानात दिली. त्याचेच पुस्तक छापले गेले.

अनंत काणेकरांच्या धुक्यातून लाल ताऱ्याकडे (१९४०) या पुस्तकाने ललित प्रवासवर्णनाचा नवा जमाना सुरू झाला; त्याचा विस्तृत ऊहापोह सावंतांनी केला आहे. आचार्य कालेलकर, रा. भि. जोशी, गंगाधर गाडगीळ, पु. ल. देशपांडे, प्रभाकर पाध्ये यांनी प्रवासवर्णनाला आपापल्या व्यक्तिमत्त्वाच्या रंगाची डूब देऊन संपन्न बनवले. १९६५ ते १९८० दरम्यानच्या दिलीप चित्रे, वसंत बापट, माधव गडकरी, रवींद्र पिंगे, रमेश मंत्री, व्यंकटेश माडगूळकर यांच्या प्रवासवर्णनांचेही रसग्रहण सावंत उदारपणे करतात. १९४० ते ६५ हा कालखंड डौलदार प्रवास वर्णनांचा आहे. पुलंनी विनोदाची जोड त्याला दिली. १९६५ नंतरच्या कालखंडात प्रवासवर्णनांना अधिक व्यापक भूप्रदेश लाभला. त्यांचा आशय विस्तारला. जंगलातले जीवन, पदयात्रा, पक्षी निरीक्षण, अभयारण्ये वगैरेंकडे लक्ष जाऊ लागले, असे उपसंहारादाखल सावंत लिहितात. पीएचडीच्या प्रबंधाच्या दृष्टीने सावंत यांनी काम चोख बजावले आहे असेच म्हणावे लागेल. भरपूर अवतरणे, भरपूर तळटीपा, यामुळे या विषयावरचा मराठीतला हा पहिलाच प्रबंध वजनदार झाला आहे.

[प्रवासवर्णन : डॉ. वसंत सावंत. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई, पृष्ठे ४४९. पन्नास रुपये]

---

# स्त्रीसूक्त : सौ. अश्विनी धोंगडे

## विकणे आहे एक तरुण उत्साही देखणे यंत्र

**सुजाता शिरवळकर महाजन**

---

मी आहे ब्रह्मांडाची अधीश्वरी
... मी सर्वस्वतंत्र आहे
माझ्यावर कोणाचेही प्रभुत्व नाही...

हे ऋग्वेदातील वागाभृणीक सूक्त आणि प्रस्तुत स्त्रीसूक्त यात जमीन अस्मानाचे अंतर आहे. वागाभृणी सूक्तात वर्णन केलेले स्त्रीचे अर्थपूर्ण अस्तित्व आज उरलेले नाही. आजची स्त्री उरलीय फक्त एक यंत्र म्हणून. तडजोड हा तिचा अनेक



अनुक्रमणिका








युगांपासून चालत आलेला धर्म आहे पण या युगातली तिची तडजोड तिचे व्यक्तिमत्त्व दुभंगून टाकणारी आहे.

मुळात वाङ्मयातून होणारे स्त्रीचे दर्शन अवास्तव आहे. त्यामुळे या कवयित्रीची 'फिर्याद' आहे. 'प्रेम' नावाच्या भाकड कल्पनेला पोकळ अलंकारांनी सजविणाऱ्या, आयुष्याचे उघडे नागडे वास्तव स्वप्नांच्या काठावरच्या वस्त्रांनी झाकून ठेवणाऱ्या स्वतःलाच फसवत भावकवितेच्या नावाने मिरवत राहणाऱ्या कवितेबद्दल तिची तक्रार आहे.

या संग्रहात आपल्याला भावकविता भेटत नाही. स्त्रीचे खरेखुरे आयुष्य, खरेखुरे स्वरूप येथे दिसते.

तथाकथित उच्च मध्यमवर्गीय, केवळ पैशांनी विकत घेता येणाऱ्या गोष्टीत रमणारी स्त्री आणि चाकोरीबद्ध, वेतून दिलेले आयुष्य खालमानेने, वहिवाटीने जगणारी स्त्री या दोन्ही रूपांची कवयित्रीला चीड येते. स्त्रीमुक्ती म्हणजे काय हे नक्की जिला समजलेलं नाही, जे कळलंय ते वळलेले नाही, आणि सारे आयुष्य वेचूनही जिच्या हाती काहीच उरलेले नाही अशी स्त्रीही भेटते.

दागिने, साडया, सौंदर्यप्रसाधने यातच बुडून जाणाऱ्या उच्चभ्रू स्त्रीवर टीका करताना ही कविता कडवट उपहासाचे शस्त्र धारण करते. साडयांचे कपाट, सौंदर्यप्रसाधनांचे ढीग, चपला सँडल्सचे दुकान, टीचभर गॅलरीमध्ये तरंगत्या कुंड्यातील कॅक्टसचें वेड इंग्रजी–मराठीचे मिक्स्ड कॉकटेल, पार्ट्या, बॉन्साय, नर्सरी, श्वानप्रदर्शन, आर्ट गॅलरी, असे जिच्या आयुष्याचे रस्ते पैशांच्या मापाने उंचावत जातात काहीही करून तारुण्य टिकविण्याचा आटोकाट प्रयत्न करणाऱ्या या स्त्रीच्या आयुष्याचेच, वयाची उंची कापता कापता 'बॉन्साय' झाले आहे.

या संग्रहात आढळणारी दुसरी स्त्री वहिवाटीने जगणारी; शिक्षण, लग्न, मुलंबाळं, त्यांची शिक्षणं, त्यांची लग्नं, नातवंडं आणि म्हातारपण अशा चाकोरीतच जगते. तिला कसलेही प्रश्न पडत नाहीत आणि कुठलीही उत्तरे शोधण्यासाठी तिच्या जिवाची घालमेल होत नाही. वेगळ्या वाटा शोधण्याची तिला गरज भासत नाही. ही स्त्री ऑफिसमधील क्लार्क असो, लेक्चरर असो, डॉक्टर असो वा फॅक्टरीत असो. ती आपली नोकरी संपली कीं लिंबाचे लोणचे घालायचे की सुरळीच्या वड्या करायच्या यातच गुंतून पडते. उरला वेळ तर झोप व शेजारणीशी फालतू गप्पा आहेतच.

आणखी एक स्त्रीचे रूप बघायला मिळते ते म्हणजे वाढत्या महागाईच्या काळात पुरुषाच्या खांद्याला खांदा लावून, यंत्रासारखी राबणारी, स्वतःलाच हरवून बसणारी स्त्री. संसाराच्या दोन्ही स्कूटर्स एकदम चालवण्याची कसरत करणारी स्त्री.

'सुशिक्षिता', 'स्त्रीमुक्ती', 'फिर्याद' सारख्या कविता स्पष्टीकरण करणाऱ्या,

विटंबना, 'रुपकंवर', 'विमुक्त' 'काल आणि आज 'सारख्या भाषण देणाऱ्या, 'दिल्या घरी तू 'सारखी उपदेश करणारी सुद्धा ! 'स्टॅण्डर्ड', 'गरजा', 'शेम ऑन हूर', 'अवलंबिता' 'प्लॅटमध्ये', 'बॉन्सॉय', 'प्रसिद्धी', 'कॅक्टस'सारख्या कविता तिखट उपरोधिक तर 'ती एक मिनी कॉम्प्युटर', 'अवलंबिता'सारख्यात संवादात्मक शैली... अशी विविधताही आहे.

मिश्कील, खेळकर शैलीत काही कविता मर्म सांगून जातात —

तांदूळ ५ किलो
गहू १० किलो
... किती वर्षानुवर्षं करायची तीच तीच यादी !
कंटाळा १ किलो
वैताग २ किलो (यादी)

काही कवितात जाहिरात आणि बातम्यांच्या भाषाशैलीचा प्रभावी वापर केलेला दिसतो.

विकणे आहे एक उत्साही, कामसू, देखणे
जिवंत तरुण यंत्र
त्वरा करा
आपली ऑर्डर आजच नोंदवा (यंत्र)

किंवा

विवाहित महिलेला जबरीने टेम्पोतून नेऊन विनयभंग
महिलेचा पेटवून खून
नवरा आणि सासूची
पुराव्याअभावी मुक्तता (बातम्या)

या सगळ्यांहून निराळी पण सर्वात प्रभावी अशी छोटया छोटया भावकवितांची शैली पकड घेणारी आहे.

तू कोण बाई ? मी इकडची जाई
तू कोण बाई ? मी दोन मुलांची आई
तू कोण बाई ? मी सासूसासऱ्यांची दाई
तू कोण बाई ? माझं मलाच ठाऊक नाही

या संग्रहात इंग्रजी शब्दांचा फार मोठया प्रमाणावर वापर झाला आहे, शब्द-समुच्चय, वाक्प्रयोगांचाही. ब्युटी पार्लर व त्या संदर्भातील फेशल क्रीम बेस रुज,

हेअर सेट डाय, मेकप, आयब्रोज, नेलपेंटस्, बॉबकट, लिपस्टिक, पावडर्स, शाम्पू, फाउण्डेशन, स्वयंपाकघरातील – गॅस, ओव्हन, मिक्सर, स्लाईसर, लाईट, आईस्क्रीम, केक ई.

प्रेमकवितांचे पीक येत असताना स्त्रीविश्वाचे बारीकसारीक पापुद्रे उकलून दाखवणारा हा एक लक्षणीय काव्यसंग्रह होय.

(स्त्रीसूक्त : अश्विनी घोंगडे, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, वीस रुपये)

---

## साभार स्वीकार

### विज्ञान

● बहुगुणी वृक्ष – डॉ. बी. पी. वांगीकर, साकेत प्रका., ११५ म. गांधीनगर, स्टेशन रोड, औरंगाबाद; ५, १–१९८९, ४० रु.

### नाटक

● कैकयी – वि. वा. शिरवाडकर, पॉप्युलर प्रका. ३५ सी. पं. मालवीय मार्ग, ताडदेव मुंबई ३४, १–१९८९, २० रु.

● पाच ग्रामीण नाटिका – बोराडे रा. रं., साकेत प्रका. ११५ म. गांधीनगर, औरंगाबाद, ५–१–१९८७, २० रु.

● मिठू मिठू पोपट आणि सुतक – दिलीप चित्रे, साकेत प्रका., ११५ म. गांधीनगर, औरंगाबाद, ५–१–१९८९, ३५ रु.

### धर्म

● श्री दत्तनाथ उज्जैनीकर – संपा. डॉ. बाळकृष्ण ना. मुंडी, प्रका. सौ. लीलावती मुंडी, ६५ वररूचि मार्ग, माधवनगर, उज्जैनी ४५६००१, १–१९८९, २० रु.

● पुणे प्रवचन – संपा. सभा मंत्री, वैदिक सेवा आश्रम, वाजेगाव, नांदेड, २० रु.

### इतिहास

● शिवाजी मल्लमाजी समशेत्सव – शेषोश्रीनिवास, मुंबई विद्यापीठ, कन्नड विभाग, १–१९८९, ३२ रु.

### भाषाशास्त्र

● मराठी भाषा व्यवस्था आणि अध्यापन – चं. द. इंदापूरकर, कॉन्टिनेन्टल प्रका., विजयनगर पुणे ३०, १–१९८९, ८५ रु.

● साहित्याची भाषा – डॉ. भालचंद्र नेमाडे, प्रका., साकेत प्रका. ११५ महात्मा गांधीनगर, औरंगाबाद ५, १–१९८८, ३० रु.

---

# १९८९ मधील मराठी पुस्तके

## जुलै ८९ अखेर प्रसिद्ध झालेल्या निवडक पुस्तकांची सूची

### कादंबऱ्या

आमदार सौभाग्यवती : रा. रं. बोराडे
चतुरा मीच तव चंद्रिका : निर्मला दाते
लवंग लतिका, चिकन सूपची चिकनी कहाणी : निर्मला दाते
लोकाभिराम : डॉ. म. वि. गोविलकर
आषाढातलं चांदणं ; विशाखा पुरंदरे
कॉम्रेड : भानु काळे
ब्लॅक सस्पेन्स गँग : जयंत रानडे
चिपाड : उत्तम बंडू तुपे
भन्नाट : सुहास शिरवळकर
मात : जनार्दन ओक
शोधयात्रा : अरुण साधू
गीता : सुमती क्षेत्रमाडे
शलाका : ललिता बापट
अग्निपुष्प : रेखा बैजल
फाळणीचे दिवस : गोविंद कुलकर्णी
पिकल्या पाताळा : किशोरी पै
सप्तरंग सात सूर : शैला लोहिया
अग्निशिखा : डॉ. धारूरकर
वारुळ : मधु मंगेश कर्णिक
कंट्रीबार, मोनालिसा, आय पी सी : श्रीकांत सिनकर
बळी. महाठक, अंत विरहाचा : चिंतामणी लागू
न्याय : अनंत तिबिले
कर्मबळी : आनंद हांडे
ओतप्रोत मीरा : प्र. न. जोशी

कथा

कोण्या एका स्वप्नकाळी : आशा दामले
शेवाट : प्र. श्री नेरूरकर
लांडगा : राजेंद्र बनहट्टी
नराधम : बा. सो. अष्टीकर
नाही चिराग नाही पणती : नीलकंठ देशमुख
रॅट रेस : पंकज कुरुलकर
नीहारिका : मुकुंद बापट
तोनापीही : नीता गद्रे
रंगसावल्या : अनंत मनोहर
कथेला जेव्हा जाग येते : आनंद गोगटे
आता कोठे धावे मन : मंदाकिनी जहागिरदार
गोतावळा : अज्ञान बाबू
परिपूर्ती : मालती जोशी
कथा पौर्णिमा : सुहास शिरवळकर
वाटा : व्यंकटेश माडगूळकर
आवर्त : विठ्ठल ठाकूर
इस्पितळ आणि पतंग उडवणारा माणूस : सुकन्या आगाशे
कुसुमगुंजा : जी. ए. कुलकर्णी
बेधडक : प्रमोद नवलकर

## काव्य

इंग्लंडच्या कविता : शंतनु चिंधडे
अनुचित्र : शिरीष पै
फॉलम : विलास शेळके
घरटं : विजय शेंडगे
रेमंथ : डॉ. शेजवलकर
शोध (नाट्यकाव्ये) : अरुणा चौधरी
हुंकार वादळांचे : भाऊ पंचभाई
मावळते शब्द : वा. रा. कांत
मंझधार : अनुराधा पोतदार
निशिदिनी बरसत : राघवेंद्र पगडी
तुझे गीत गाण्यासाठी : मंगेश पाडगावकर
पारंब्या : कुमार अनिल सपकाळ

नवोदय : अरुण बोऱ्हाडे
समंध रडतो पिंपळावर : अमीर आठवले

## ललित-विनोदी

एकपानी : शांता शेळके
पुन्हा झुळूक : मंगला गोडबोले
शतरंग : सुहासिनी मुळगावकर
आनंदाची फुले : रवींद्र पिंगे
बडबड : वि. आ. बुवा
खुसरफुसर : इंद्रायणी सावकार
हंसोळी : पुष्पाग्रज
चेष्टिका : वा. रा. सोनार
निमित्त : व. पु. काळे
फँटसी – एक प्रेयसी : व. पु. काळे
उपद्व्याप : श्रीनिवास भणगे
चंद्रबनातल्या सावल्या : चंद्रकुमार नलगे

## समीक्षा

रंगयात्रा : वि. भा. देशपांडे
संत साहित्याची संकल्पना : व. दि. कुलकर्णी
नाटककार अत्रे : वसुंधरा देवस्थळी
कॉडवेलचा कलाविचार : अशोक जोशी
कुसुमाग्रज – एक शोध : दत्तात्रय पुंडे
नाटककार अत्रे : वसुंधरा देवस्थळी
दलित साहित्य चिंतन : यशवंत मनोहर
निबंधकार डॉ. आंबेडकर : यशवंत मनोहर
रामायणीय : स्मिता कापसे
रुची अभिरुची : शं. रा. राजे
नव्या वाटा नवी वळणे : बी. रंगराव
मराठी कॉमेडी/ट्रॅजेडी : माधव मनोहर
मराठी गोळण : वसंत स. जोशी
कथाकार शांताराम : रा. भा. पाटणकर
मिथक आणि नाटक : तारा भवाळकर

मराठी कादंबरीचा इतिहास : बांदिवडेकर
संत कवयित्री जनाबाई : भिंगारकर
स्वगत स्वागत : मधुकर वेदान्ते
प्राचीन म. साहित्यातील लोकतत्त्व : अनिता मुजुमदार

## नाटके – एकांकिका

कथा व्यथा या भिंतीच्या : लीला पटेल
मिठू मिठू पोपट आणि सुतक : दिलीप पुरुषोत्तम चित्रे
आकाश कोसळताना : रमेश पवार
कैकयी : वि. वा शिरवाडकर
कहाणी : दिलीप परदेशी
जिनिअस : प्रल्हाद जाधव
दीपस्तंभ : प्र. ल. मयेकर
सामाना : बी. के. पाटील

## प्रवासवर्णने

आडवाटेवरचा महाराष्ट्र : प्र. के. घाणेकर
हवाई दैनंदिनी : व्ही. सु. राजश्री
संगमरवरी प्रदेश : रमेश मंत्री
बहुरंगी बँकॉक, रम्य ते सिंगापूर, हसरे हाँगकाँग : मंगला दास्ताने

## आत्मचरित्रे–चरित्रे–व्यक्तिचित्रे

आगळीवेगळी माणसे : एस. एम. जोशी
एक चिरस्मरणीय मामा : गंगाधर महांबरे
स्वातंत्र्यवीर सावरकर : एक रहस्य : डॉ. द. न. गोखले
कर्तृत्वाचा महामेरू : डॉ. हेडगेवार : शशिकांत देशपांडे
राजश्री शाहू : जयसिंग पवार
गुरुदत्त : इसाक मुजावर
वेध व्यक्तित्वाचा : ज्योती दाते
आत्मकथा : पेनिश ते गोवामुक्ती : प्रफुल्ल गायतोंडे
अण्णासाहेब लठ्ठे : य. दि. फडके
मी एक खलाशी : माधवी कुंटे
मी एक न्यायाधीश : प्रताप ना. बेहेरे

खंडो बल्लाळ चिटणीस : व. भ. कर्णिक
माझ्या संगीत जीवनाची वाटचाल : मालती पांडे–बर्वे
महाराष्ट्राचे वाल्मीकी : राजा मंगळवेढेकर
हरवलेले दिवस : प्रभाकर ऊर्ध्वरेषे
नाळ : वसंत पोतदार
केल्याने पर्यटन : राजा पाटील
वेडया मना तळमळसी : वामनराव कुलकर्णी
बेनझीर भुट्टो : मुंदरगी

## इतर

संगीताचे मानसशास्त्र : डॉ. प्रेमला काळे
शिक्षण, मते आणि विचार : अनंत कालेलकर
रामायणीय : स्मिता कापसे
महाभारत : माधव कानिटकर
आरसा : (मानसशास्त्रीय प्रश्नसंच) : आशा परुळेकर
कथा वनवासींच्या : गांगल
पश्चिम घाट बचाओ मोहीम : जगदीश गोडबोले
व्यवस्थापन व मानवी संपदेचा शोध : भालेराव
विज्ञान मानव व मानव विज्ञान : कुमुदिनी दांडेकर
शोध : अरुणा चौधरी
आरोग्य : समज आणि गैरसमज : विठ्ठल प्रभू
रशियन राज्यक्रांती : वि. गो. दिघे
पोलीस आणि समज : वि. द. वागळे
काश्मीर – एक ज्वालामुखी : सेतु माधवराव पगडी
आत्मोल्लास : विमला ठकार
वनवासी राजा : डॉ. जाधव
गाजलेले विदेशी चित्रपट : शांता शेळके
नैतिक आध्यात्मिक शिक्षण : अ. स. जोशी
सत्यशोधनाची वाटचाल : बाबा आढाव
भटक्या विमुक्तांचे अंतरंग : रामनाथ चव्हाण
विसाव्या शतकातील महाराष्ट्र : य. दि. फडके
एक वारी नाना परी : सीताराम मेणजोगे
लोक रंगकला आणि नागर रंगभूमी : प्रभाकर मांडे

लोक नागर रंगभूमी : तारा भवाळकर
विज्ञान आणि अंधश्रद्धा : प. रा. आर्डे
डॉ. आंबेडकरांचा बुद्धधर्म : यशवंत मनोहर
लोकाभिराम : डॉ. गोविलकर
तिमिरभेद : अंजली सोमण
महात्मा फुल्यांची बदनामी : हरी नरके
पंजाब–रक्त आणि अश्रू : चंद्रशेखर म्हमाणे
तुमचे कामजीवन : जीवन मोहाडीकर
बहुरूपी महाराष्ट्र : रामचंद्र देखणे
गाजलेल्या प्रस्तावना : सं. वि. ग. कानिटकर
महाराष्ट्रातील समाजपरिवर्तनाच्या दिशा : सं. रमेश पानसे
पाकिस्तानचे जन्मरहस्य : व्ही. व्ही. नगरकर
स्वातंत्र्याचे भय (अनुवाद) : डॉ. आ. ह. साळुंखे
पोर्तुगीज मराठा संबंध : स. शं. देसाई
आमनेसामने : केशव मेश्राम
चौफेर–भाग २/३ : माधव गडकरी
सावरकरांचे आठवावे विचार : सुधाकर देशपांडे
शतरंग : सुहासिनी मुळगावकर

---

## साभार स्वीकार

### लेख

- काही जुने काही नवे – डॉ. गोविलकर लीला, मिहीरा प्रकाशन प्रो. कॉलनी सावेडी रोड, अहमदनगर, १–१९८८, २० रु.
- मैत्र – पु. ल. देशपांडे, मौज प्रका. खटाववाडी, मुंबई ४,१–१९८९, ६० रु.
- पोत आणि पदर – प्र. ई. सोनकांबळे, साकेत प्रका., ११५ म. गांधीनगर, औरंगाबाद ५, १–१९८९, ५० रु.
- चौफेर भा. ३ – माधव गडकरी, श्री विद्या प्रका.,२५० शनिवार पेठ, पुणे ३०, १–१९८९, ८५ रु.

---

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषद

## टिळक रस्ता, पुणे ४११०३०

### वार्षिक साधारण सभेची सूचना

दिनांक १ सप्टेंबर १९८९

स. न. वि. वि.

महाराष्ट्र साहित्य परिषदेची वार्षिक साधारण सभा रविवार दिनांक २४ सप्टेंबर १९८९ रोजी पुणे येथे माधवराव पटवर्धन सभागृहात सायंकाळी ४-३० वाजता भरणार आहे. या सभेला सभासदांनी उपस्थित राहून सहकार्य करावे, अशी विनंती आहे.

या सभेत खालीलप्रमाणे कामकाज होईल.

**सभेत करावयाची कामे**

१) श्रद्धांजली

२) मागील सभेचे कार्यवृत्त वाचून संमत करणे.

३) १९८८-८९ या वर्षाचे कार्यवृत्त संमत करणे.

४) १९८९-८९ चे उत्पन्न-खर्चपत्रक आणि ताळेबंद संमत करणे.

५) १९८९-९० चा अर्थसंकल्प संमत करणे.

६) १९८९-९० करिता हिशोब तपासनीसांची नेमणूक करणे.

७) मा. अध्यक्षांच्या संमतीने येणारे आयत्या वेळचे विषय.

आपले

| | | |
|---|---|---|
| म. वि. गोखले | राजेन्द्र बनहट्टी | ग. प्र. प्रधान |
| कोषाध्यक्ष | कार्याध्यक्ष | अध्यक्ष |
| गं. ना. जोगळेकर | राजा फडणीस | चिं. शं. जोशी |
| कार्यवाह | कार्यवाह | कार्यवाह |

**विशेष सूचना :** १) पुरेशी गणसंख्या नसल्यास सभा १५ मिनिटे स्थगित करण्यात येईल व नंतर ती रीतसर सुरू होईल. अशा वेळी गणसंख्येचे बंधन असणार नाही.

२) वरील कामकाजासंबंधी मतदार सभासदांस काही सूचना करावयाच्या असतील वा माहिती पाहिजे असेल, अगर ठराव मांडायचा असेल तर लेखी स्वरूपात तसे १६ सप्टेंबर १९८९ पर्यंत कळवावे.

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ३०

(वर्ष ८३ वे, नोंदणी क्रमांक ४०९)

## वार्षिक कार्यवृत्त १९८८-८९

(१ जुलै १९८८ ते ३१ मार्च १९८९)

महाराष्ट्र साहित्य परिषदेचा वर्षकाल १ जुलै ते ३० जून असा आहे. तथापि शासकीय नवीन निबंधानुसार १ एप्रिल ते ३१ मार्च असे हिशोबाचे वर्ष गृहीत धरून १ जुलै १९८८ ते ३१ मार्च १९८९ या कालावधीतील कार्यवृत्त सादर करीत आहोत. (१ एप्रिल ८९ ते ३० जून ८९ या कालावधीचे कार्यवृत्त स्वतंत्रपणे दिले आहे.)

**सभासद संख्या**

वर्षारंभी वार्षिक साधारण ४२९२ आणि आजीव २४७० अशी एकूण ६७६२ सभासदे-संख्या होती. साधारण सभासदांची आपली वार्षिक वर्गणी न भरल्यामुळे त्यांचे सभासदत्व रद्द करण्यात आले. ३१।३।८९ अखेर वार्षिक वर्गणी भरलेले फक्त ६५८ साधारण सभासद होते. १।७।८८ ते ३१।३।८९ या कालावधीत नव्याने एकूण २१६ आजीव सभासद झाले. ३१।३।८९ रोजी आजीव सभासद २६८६ व साधारण सभासद ६५८ अशी एकूण ३३५४ सभासद संख्या झाली आहे.

**कार्यालयीन सभा**

वृतांत कालावधीत कार्यकारी मंडळाच्या एकूण ३ सभा झाल्या. या सभांना पुढीलप्रमाणे उपस्थिती होती.

| | सभा | | सभा | | सभा |
|---|---|---|---|---|---|
| राजेंद्र बनहट्टी – | ३ | राजा फडणीस – | ३ | गं. ना. जोगळेकर – | ३ |
| म. श्री. दीक्षित – | ३ | चिं. शं. जोशी – | २ | वीणा देव – | ३ |
| ललिता कुंभोजकर – | ३ | प्र. ल. गावडे – | ३ | शंकर सारडा – | ३ |
| ब. दि. कुलकर्णी – | १ | चंद्रकुमार नलगे – | २ | लीला गोविलकर – | ३ |
| वसंत सावंत – | ३ | पुरुषोत्तम पाटील – | ३ | ज्योत्स्ना देवधर – | २ |

कार्यकारी मंडळाच्या सभांतून मान्य झालेली महत्त्वाची कामे पुढील प्रमाणे : इंग्रजी व हिंदी भाषेत मराठी वाङ्मयाचा एका खंडात इतिहास प्रकाशित करणे, परि-

षदेच्या वाङ्मयेतिहास योजनेतील ६ व्या खंडाचा दुसरा भाग प्रकाशित करणे, वाङ्मयकोशाचे काम पूर्ण करणे, साहित्यिक साहाय्य निधीत लक्षणीय वाढ करणे, भाषा व साहित्य : संशोधन खंड ३ प्रकाशित करणे इत्यादी.

दिनांक २५।९।८८ रोजी वार्षिक साधारण सभा घेण्यात आली. या सभेत १९८७–८८ चे कार्यवृत्त, हिशोबपत्रे आणि १९८८–८९ चा अर्थसंकल्प यांना मान्यता देण्यात आली. परिषदेच्या दीर्घकाल सेवेत असणारे कार्यालय–प्रमुख श्री. जि. व्यं. देशपांडे हे सेवानिवृत्त झाल्यामुळे प्रा. ग. प्र. प्रधान यांच्या हस्ते त्यांचा या वेळी सत्कार करण्यात आला.

## साहित्यिक व सांस्कृतिक कार्यक्रम

५ जुलै – र. वा. दिघे स्मृतिदिन, व्याख्यात्या डॉ. रेखा इनामदार–साने, विषय 'कादंबरी : प्रादेशिक–ग्रामीण–दलित'.

२० जुलै – वा. म. जोशी स्मृतिदिन, व्याख्यात्या डॉ. अश्विनी धोंगडे, विषय 'स्मृतिलहरीतील वामन मल्हार'.

२२ जुलै – ग. ल. ठोकळ स्मृतिदिन. व्याख्यात्या डॉ. सुप्रिया अत्रे, विषय 'ग्रामीण कादंबरीकार ग. ल. ठोकळ'

११ व १२ ऑगस्ट – संत सावता महाराज यांच्या स्मृत्यर्थ व्याख्याने. वक्ते डॉ. अशोक कामत, विषय : 'संत नामदेव यांचे वेगळेपण' आणि 'गुरुनानक यांचे वाङ्मय'.

१७ ऑगस्ट – पु. भा. भावे स्मृत्यर्थ, डॉ. निर्मलकुमार फडकुले यांचे व्याख्यान. विषय – 'साहित्यिक पु. भा. भावे'. याच प्रसंगी विश्वास गाडे दिग्दर्शित नाट्यदर्शन. सहभाग : पुष्पगंधा मोघे आणि नंदकुमार केतकर.

१३ व १४ सप्टेंबर – बालकवी यांच्या स्मृत्यर्थ दोन व्याख्याने, व्याख्याते डॉ. सुधीर रसाळ, विषय – बालकवींची कविता.

६ ऑक्टोबर – द. वा. पोतदार स्मृतिदिन, व्याख्यान – डॉ. गो. त्र्यं. कुलकर्णी, विषय – 'शिवाजी महाराजांची आग्र्याहून सुटका : समज व गैरसमज.' याप्रसंगी रु. २५१ चे पोतदार ग्रंथपारितोषिक श्री. अनंतराव भालेराव यांच्या 'हैद्राबादचा मुक्तिसंग्राम आणि मराठवाडा' या ग्रंथास जाहीर करण्यात आले. प्रा. सदाशिव आठवले आणि प्रा. राजा दीक्षित यांनी परीक्षक म्हणून काम पाहिले. दि. १८ ऑक्टोबर रोजी श्री. अनंतराव भालेराव यांचा पुणे येथे मुक्काम असताना अध्यक्ष प्रा. ग. प्र. प्रधान आणि कोषाध्यक्ष म. श्री. दीक्षित यांनी त्यांची भेट घेऊ सत्कार केला व पारितोषिक दिले. श्री. भालेराव यांनी पारितोषिक रकमेत ५० रु. भर

घालून परिषदेच्या साहित्यिक साहाय्य निधीला ३०१ रु. ची देणगी दिली.

२५–२६ ऑक्टोबर – व. ह. गोळे यांच्या स्मृत्यर्थ दोन व्याख्याने, (१) व्याख्याते – डॉ. वि. भा. देशपांडे, विषय – ' रंगभूमी नाटककारांच्या आणि प्रेक्षकांच्या शोधात ' (२) व्याख्यात्या – डॉ. वीणा देव, विषय – ' कथा–कादंबऱ्यांची नाट्यरूपांतरे '

२७ नोव्हेंबर – आहिताग्नि राजवाडे यांच्या स्मृतिदिनी, डॉ. रा. शं. वाळिंबे यांचे व्याख्यान, विषय – ' आहिताग्नि राजवाडे : जीवन आणि कार्य '

२९ नोव्हेंबर – माधव जूलियन स्मृतिदिनी कवयित्री–संमेलन, सहभाग – संजीवनी मराठे, सरिता पदकी, विमल लिमये, अश्विनी धोंगडे, मंदा खांडगे, संगीता जोशी, पटवर्धन, आसावरी काकडे. संचालन – लीला दीक्षित.

१८ जानेवारी – वि. द. घाटे स्मृतिदिन, मधुकर टिल्लू यांचा ' जिंदा–दिल अर्थात शेरोशायरी ' हा कार्यक्रम.

१९ जानेवारी – चिं. वि. जोशी स्मृत्यर्थ, कॉन्टिनेंटल प्रकाशन पुरस्कृत विनोदी पुस्तकाच्या लेखकाला रु. १२०० चे व प्रकाशकाला रु. ९०० चे अशी पारितोषिके दिली गेली. अध्यक्ष – श्री. ना. सं. इनामदार यांच्या हस्ते प्रा. वसंत मिरासदार यांना त्यांच्या ' हास्य–त्रयोदशी ' या ग्रंथाबद्दल आणि प्रकाशक श्री. अशोक कोठावळे, मॅजेस्टिक प्रकाशन, यांना प्रकाशनाबद्दल पारितोषिके देण्यात आली. ही निवड प्राचार्य बाळ गाडगीळ, डॉ. म. वि. गोखले आणि डॉ. वीणा देव (निमंत्रक) यांच्या परीक्षक–समितीने केली. समारंभाच्या प्रसंगी परीक्षकांतर्फे प्रा. बाळ गाडगीळ यांचे, लेखक प्रा. मिरासदार यांचे आणि अध्यक्ष श्री. ना. सं. इनामदार यांचे अशी समयोचित भाषणे झाली.

११ फेब्रुवारी – नरहर कुरुंदकर यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ डॉ. भा. ग. महामुनी यांचे ' कुरुंदकर – जीवन आणि कर्तृत्व ' या विषयावर व्याख्यान झाले.

५ मार्च– ना. गो. चापेकर स्मृतिदिन–व्याख्यान दक्ते : म. विं. सोवनी, विषय ' महाराष्ट्रातील दागदागिन्यांची वैशिष्ट्ये ' याप्रसंगी श्री. सोवनी यांनी परिषदेला एक नक्षीदार तबक भेटीदाखल दिले.

८ मार्च– महाराष्ट्रकवी यशवंत स्मृत्यर्थ ' राजघाट ' या कवितासंग्रहाचे कवी अरुण शेवते यांना ५०० रु. चा यशवंत–पुरस्कार. हस्ते–संजीवनी मराठे आणि व्याख्यान डॉ. अरविंद कामत कुलकर्णी, श्री. जयंत वष्ट आणि डॉ. अरविंद वा. कुलकर्णी यांनी परीक्षक म्हणून काम पाहिले.

२० मार्च – बा. सी. मर्ढेकर स्मृतिदिन, व्याख्यात्या – प्रा. निर्मला मोने. विषय – ' मराठी कवितेतील एकाकीपण. '

का. र. मित्र व्याख्यानमाला– ' मासिक मनोरंजन ' कर्ते का. र. मित्र यांच्या

स्मृत्यर्थ दरवर्षीप्रमाणे यंदा दहा व्याख्याने आयोजित केली होती. भारताच्या स्वातंत्र्यलढयात ज्यांनी विशेष भाग घेतला अशा काही थोरांच्या आत्मकथा हा मालेचा विषय होता. ५ डिसेंबर ते १५ डिसेंबर १९८८ – या अवधीत प्रस्तुत मालेत पुढील दहा आत्मकथांवर व्याख्याने झाली– डॉ. आंबेडकरांची आत्मकथा– संपादन शंकरराव खरात (भालचंद्र फडके), पथिक– न. वि. गाडगीळ ( शं. ना. नवलगुंदकर ), कृष्णाकाठ – यशवंतराव चव्हाण (ग. प्र. प्रधान), मी एस. एम. (म. वि. गोखले), माझी जीवनगाथा – गंगाधरराव देशपांडे (बा. रं. सुंठणकर), माझी जन्मठेप–सावरकर (राम कापसे), डोंगरीच्या तुरुंगातील १०१ दिवस– आगरकर (विद्याधर गोखले), हैद्राबाद स्वातंत्र्यसंग्रामाच्या आठवणी–रामानंद तीर्थ (स. मा. गर्गे), जीवनप्रवाह–माधवराव बागल (शंकर पाटील), पण ऐकतं कोण ? –उषाताई डांगे (पुष्पा भावे).

**कविवर्य कुसुमाग्रज पुरस्कार**– कॉंटिनेंटल प्रकाशनचा, परिषदेमार्फत दरवर्षी देण्यात येणारा रु. १२०० चा पुरस्कार २७ फेब्रुवारीला प्रा. अश्विनी धोंगडे यांना त्यांच्या ' स्त्रीसूक्त ' या कवितासंग्रहाबद्दल देण्यात आला. संग्रहाचे प्रकाशक श्रीविद्या प्रकाशनाचे श्री. मधुकाका कुलकर्णी यांनाही रु. ९०० चा पुरस्कार देण्यात आला. डॉ. आनंद यादव यांच्या हस्ते हे दोन्ही पुरस्कार देण्यात आले. डॉ. अरविंद वा. कुलकर्णी आणि श्री. जयंत वष्ट यांनी परीक्षक म्हणून काम पाहिले.

**श्री. लक्ष्मण गायकवाड यांचा सत्कार** – ' उचल्या ' या आत्मकथात्मक पुस्तकाला साहित्य–अकादमीचा पुरस्कार लाभल्यावद्दल लेखक श्री. लक्ष्मण गायकवाड यांचा ७ मार्च रोजी प्रा. ग. प्र. प्रधान यांच्या अध्यक्षतेखाली प्रकट सत्कार करण्यात आला. याप्रसंगी श्री. चंद्रकांत घोरपडे आणि डॉ. अंजली सोमण यांची समयोचित भाषणे झाली.

**श्री. शंकर पाटील कथा–कादंबरी पारितोषिक** – १८८७ मधील उत्कृष्ट कादंबरीचे रु. २००० चे प्रस्तुत पारितोषिक आणि मानचिन्ह यंदा ' अमृकचे स्वातंत्र्य 'चे लेखक श्री. शशांक ओक यांना ८ ऑगस्ट रोजी प्रा. ग. प्र. प्रधान यांच्या हस्ते देण्यात आल. परीक्षकांतर्फे डॉ.. चंद्रशेखर बर्वे यांचे भाषण झाले.

**द. र. कवठेकर छायाचित्र अनावरण**– सुप्रसिद्ध कादंबरीकार कै. दत्त रघुनाथ कवठेकर यांच्या कुटुंबियांनी परिषदेस दिलेल्या छायाचित्राचे अनावरण श्री. श्री. ज. जोशी यांच्या हस्ते १६ ऑगस्ट रोजी (कवठेकरांच्या स्मृतिदिनी) करण्यात आले.

**शाखासभा मेळावा**– परिषदेच्या काही शाखासभांचे प्रतिनिधी आणि परिषदेचे










पदाधिकारी यांचा एक संयुक्त मेळावा पुणे येथे २३ ऑक्टोबरला आयोजित करण्यात आला होता. केंद्रसंस्था आणि शाखा यांचे परस्परसंबंध आणि शाखांच्या कार्याचा विस्तार या दोन बाबींबाबत प्रस्तुत मेळाव्यात मनमोकळेपणे चर्चा करण्यात आली व सर्व शाखांसाठी एक समान नियमावली समितीमार्फत करण्यात यावी असे ठरले. मेळाव्याला परिषदेतर्फे सर्वश्री राजेंद्र बनहट्टी, म. श्री. दीक्षित गं. ना. जोगळेकर, शंकर सारडा, चिंतामण जोशी, राजा फडणीस (निमंत्रक) हे पदाधिकारी आणि शाखांतर्फे सर्वश्री कुसुमाकर शिंपी ( धुळे ), श्रीपाद जोशी (जत), प्रभाकर चौधरी (जळगाव), चिंतामण जोशी (ठाणे), शशिकला महाडेश्वर (कोल्हापूर), सुमति लांडे (श्रीरामपूर), श्रीकांत बागूल (कोपरगाव), विजय कसबेकर (श्रीरामपूर), अशोक गोवंडे व वैशाली नायकवडे (इचलकरंजी), म. ग. पातकर (कोल्हापूर), म. दं. हातकणंगलेकर (सांगली), अ. ना. सहस्रबुद्धे (नगर) असे तेरा प्रतिनिधी उपस्थित होते.

**दिवाळी अंक स्पर्धा–** १९८८ मधील पुढील तीन उत्कृष्ट दिवाळी अंकांना प्रत्येकी रु. १०१ चे पुरस्कार देण्यात आले. 'श्रीवत्स' संपादक राम शेवाळकर (विविध ज्ञानविस्तारकर्ते रावसाहेब मोरमकर पुरस्कार), 'घरदार' संपादक : ह. मो. मराठे (मा. मनोरंजनकार का. र. मित्र पुरस्कार), 'मराठवाडा' संपादक पन्नालाल सुराणा आणि यदुनाथ थत्ते (शं. वा. किर्लोस्कर पुरस्कार) या पुरस्कारांबरोबरच दिवाळी अंकांमधील उत्कृष्ट ललितलेखास कै. प्रा. अनंत काणेकर पुरस्कार (रु. २००) श्रीमती मंगला गोडबोले यांना त्यांच्या 'माहेर'मधील 'निरोप' या लेखाबद्दल देण्यात आला. पुरस्कार निवडीचे काम राजेंद्र बनहट्टी, म. श्री. दीक्षित, गं. ना. जोगळेकर आणि राजा फडणीस (निमंत्रक) यांच्या समितीने केले.

**संमेलनाध्यक्षांचा सत्कार–** अमरावती येथील अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे नियोजित अध्यक्ष– प्रा. के. ज. पुरोहित तथा 'शांताराम' यांचा परिषदेतर्फे पहिला प्रकट सत्कार ३ जानेवारीला प्रा. ग. प्र. प्रधान यांच्या अध्यक्षतेखाली झाला. याप्रसंगी डॉ. विलास खोले आणि डॉ. भालचंद्र फडके यांची समयोचित भाषणे झाली. पुण्यातील साहित्यप्रेमी भगिनी मंडळ, वसंत मिरासदार, रवींद्र कुलकर्णी इ. संस्था व व्यक्तींतर्फेही श्री. शांताराम यांचा यावेळी सत्कार करण्यात आला.

**कविसंमेलन –** पिंपरी–चिंचवड येथील परिषदेच्या शाखांकार्याला नव्याने गती देण्याच्या हेतूने शाखेतर्फे जुन्यानव्या कवींचे एक संमेलन २८ ऑगस्टला आयोजित करण्यात आले होते. डॉ. श्री. श्री. घारे, रामचंद्र देखणे, स्नेहसुधा कुलकर्णी यांच्या

पुढाकाराने भरलेल्या या संमेलनात ४०-५० कवींनी भाग घेतला. परिषदेतर्फे ग. प्र. प्रधान, म. श्री. दीक्षित, गं. ना. जोगळेकर संमेलनाला उपस्थित होते. या संमेलनात शाखेच्या पुनरुज्जीवनाची औपचारिक घोषणा करण्यात आली.

**श्रद्धांजली–** विख्यात विचारवंत साहित्यिक आणि भूतपूर्व संमेलनाध्यक्ष प्रा. गं. बा. सरदार यांचे २ डिसेंबर रोजी निधन झाले. त्यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी दुसरे दिवशी प्रा. प्र. ग. प्रधान यांच्या अध्यक्षतेखाली सभा भरली होती. सभेत सर्वश्री बाबा आढाव, हे. वि. इनामदार, ह. श्री. शेणोलीकर, लक्ष्मण माने आणि गं. ना. जोगळेकर यांची भाषणे झाली व शेवटी ठरावरूपाने श्रद्धांजली वाहण्यात आली.

परिषदेचे माजी कार्याध्यक्ष, समीक्षक आणि वक्ते डॉ. रा. शं. वाळिंबे यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी १३ फेब्रुवारी रोजी डॉ. हेमंत इनामदार यांच्या अध्यक्षतेखाली सभा भरली होती. सर्वश्री मु. श्री. कानडे, चंद्रशेखर बर्वे, न. म. जोशी, सुहास मेहेंदळे, दि. ब. केरूर, कल्याणी दिवेकर आणि गं. ना. जोगळेकर यांची भाषणे झाल्यावर शेवटी डॉ. वाळिंबे यांना ठरावरूपाने श्रद्धांजली वाहण्यात आली.

**भेटीगाठी–** वृत्तांतकाळात पुढील व्यक्तींनी परिषदेला भेटी दिल्या– श्री. माधव गडकरी (२३ ऑगस्ट), महापौर श्री. अंकुशराव काकडे (१६ सप्टेंबर), मॉरिशसमधील मराठी समाजाचे कार्यकर्ते श्री. देवजी पाडिया आणि होमराजेन गौरिया (४ जानेवारी), परिषदेतर्फे त्यांचा सत्कार करण्यात आला. याप्रसंगी परिषदेचे पदाधिकारी आणि निमंत्रितांसमवेत पाहुण्यांशी गप्पागोष्टी झाल्या.

**काही ठळक देणग्या–** परिषदेला या वर्षी पुढील व्यक्ती व संस्थांच्यातर्फे देणग्या मिळाल्या– श्री. कृष्णकुमार ग. ठोकळ रु. १२,००० (ग्रामीण साहित्य पुरस्कारार्थ), डॉ. य. वि. देशमुख रु. १०,००० (लोकहितवादी स्मृत्यर्थ सामाजिक-वैचारिक ग्रंथास पारितोषिक देण्यासाठी), श्री. पु. रा. राजवाडे रु. १०,००० (आहिताग्नि राजवाडे यांच्या स्मृत्यर्थ व्याख्यानासाठी), नातू फौंडेशन चॅरिटेबल ट्रस्ट रु. १०,००० (श्रीमंत रा. ना. नातू ग्रंथपुरस्कारार्थ).

परिषद या देणगीदारांची फार आभारी आहे.

**संदर्भ ग्रंथालय –**

परिषदेच्या वा. गो. आपटे संदर्भ ग्रंथालयाचा लाभ सुमारे ७५० च्या वर वर्गणीदार सभासद घेत असतात. वर्षारंभी ग्रंथसंख्या २४४४९ होती. तीत खरेदी केलेली ६६, पत्रिकेकडे अभिप्रायार्थ आलेली विविध ११२, बक्षिसासाठी आलेली १२६ व भेटी दाखल आलेली ३४ पुस्तकें अशा एकूण ३३८ पुस्तकांची भर पडून

मार्च ८९ अखेर ग्रंथसंख्या – २४७८७ झालेली आहे.

या वर्षी प्रथमच दिवाळी अंक सभासदांना उपलब्ध करून देण्यात आले. त्याचा फायदा सुमारे १०० सभासदांनी घेतला.

म. सा. पत्रिका – महाराष्ट्र साहित्य पत्रिका या परिषदेच्या वाङ्मयीन त्रैमासिकाचे वृत्तांत कालावधीत एकूण ३ अंक प्रसिद्ध झाले. दीपावली अंक 'वाङ्मयीन ऋणानुबंध विशेषांक' म्हणून प्रसिद्ध झाला. अंकाचा आकार व बदललेले आकर्षक स्वरूप सभासदांना आवडले.

**परीक्षा कार्य –**

जानेवारी १९८९ मध्ये झालेल्या मराठीच्या परीक्षांची एकूण केंद्रे ३८ होती. या परीक्षांना बसलेले परीक्षावार उमेदवार पुढीलप्रमाणे – प्रथमा – १३४८, प्रवेश – ३५७, प्राज्ञ – १९, विशारद – ७. गोमंतक मराठी अकादमीने मराठीच्या अभ्यासास चालना देण्यासाठी योजनाबद्ध प्रयत्न केल्यामुळे प्रथमा परीक्षेसाठी गोमंतकातून मोठ्या प्रमाणावर प्रतिसाद मिळाला. (१८ केन्द्रे, ७४६ उमेदवार) याउलट, महाविद्यालयीन प्राध्यापकांच्या संपामुळे प्राज्ञ–विशारद परीक्षांच्या तयारीचे वर्ग होऊ न शकल्याने या परीक्षांच्या उमेदवारांची संख्या घटली.

प्रथमा व प्रवेश परीक्षांमध्ये यशस्वी झालेले गुणानुक्रमे पहिले तीन उमेदवार पुढील प्रमाणे –

प्रथमा – १) सहस्रबुद्धे शुभदा हेरंब, किर्लोस्करवाडी, ९१ टक्के
२) गोसावी श्वेता सोपान, सारडा कन्याविद्यामंदिर, नाशिक, ८८ टक्के
३) करंदीकर श्रीकृष्ण नारायण, ज्ञानप्रबोधिनी पुणे, ८७ टक्के
निमकर पल्लवी प्रभाकर, सारडा कन्याविद्यामंदिर, नाशिक, ८७ टक्के
देशपांडे स्वप्ना जयंत, टिळकनगर विद्यामंदिर, डोंबिवली, ८७ टक्के
पराडकर सुप्रिया शशिकांत, टिळकनगर विद्यामंदिर, डोंबिवली, ८७ टक्के

प्रवेश – १) तावडे निवेदिता मधुकर, सरस्वती सेकंडरी स्कूल ठाणे, ८५ टक्के
२) मुळे प्रगती जयंत, टिळकनगर विद्यामंदिर, डोंबिवली, ८४ टक्के
३) पिंपळखरे आरती शशिकांत सरस्वती सेकंडरी स्कूल, ठाणे, ८३ टक्के

डॉ. गं. ना. जोगळेकर आणि डॉ. प्र. ल. गावडे यांच्या मार्गदर्शनाखाली या वर्षीचे परीक्षाकार्य सुरळीतपणे पार पडले.

डॉ. कल्याणी दिवेकर, प्रा. मधुरा कोरान्ने, डॉ. व. न. कुबेर, डॉ. श्रीलेखा साने, प्रा. शशिकला कांबळे, डॉ. सुप्रिया अत्रे, डॉ. माधवी वैद्य, डॉ. मंजिरी नेऊरगावकर, डॉ. ललिता कुंभोजकर, डॉ. अंजली कान्हेरे, डॉ. शैला काळकर, डॉ. विनया डोंगरे,

प्रा. जयवंत अहिवळे, श्री. श्री. वा. कुलकर्णी, सौ. शुभांगी भट, सौ. मालती लिमये, श्री. शरद अनवलीकर, सौ. लीला होनप या सर्वांनी या वर्षीच्या परीक्षाकार्यात आत्मीयतेने सहकार्य केले.

परीक्षा-केंद्रांचे संचालक, मुख्याध्यापक, वर्गाची तयारी करून घेणारे शिक्षक या सर्वांचे आम्ही आभारी आहोत.

परीक्षेबाबतची विशेष उल्लेखनीय गोष्ट म्हणजे या वर्षी मॉरिशस येथे 'मॉरिशस मराठी मंडळी फेडरेशन' या संस्थेच्या मागणीवरून 'प्राज्ञ' परीक्षा घेण्यात आली. या परीक्षेस १२ विद्यार्थी बसले व त्यातील ९ उत्तीर्ण झाले. या परीक्षेसंबंधी सर्व कामे डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी पार पाडली.

**वाङ्मयकोश —**

म. सा. प. कडे असलेले काम दोन तृतीयांश पूर्ण झाले आणि प्रमुख संपादक प्रा. के. ज. पुरोहित यांनी राजीनामा दिल्याने पुढील काम थांबले आहे. तरीही नोंदीचे काम चालू असून पुढील कार्यवाहीसंबंधी साहित्य संस्कृती मंडळाकडून सूचनांची प्रतीक्षा आहे.

**ग्रंथ पारितोषिके –**

महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे दरवर्षी देण्यात येणाऱ्या विविध पारितोषिकांसाठी १९८८ सालाकरिता खालील पुस्तकांची निवड करण्यात आली.

१. हरि नारायण आपटे पारितोषिक (कादं.) रु. १०१/–
झेलझपाट – मधुकर वाकोडे (प्रकाशक : देशमुख आणि कं., पुणे)

२. वा. म. जोशी पारितोषिक (कादं.) रु. १०००/–
पानिपत – विश्वास पाटील (राजहंस प्रकाशन, पुणे)

३. ह. स. गोखले पारितोषिक (कविता) रु. ३००/–
कॅनव्हस – विलास गावडे (नयना पब्लिकेशन्स, ठाणे २)

४ आनंदीबाई शिर्के पारितोषिक (कथा) रु. १०००/–
अवेळ – विजया वाड (चंद्रकला प्रकाशन, पुणे)

५. नी. स. गोखले पारितोषिक (कथा) रु. ३००/–
प्रस्थान – ज्ञानेश्वर नाडकर्णी (मॅजेस्टिक प्रकाशन, पुणे)

६. अ. स. गोखले पारितोषिक (उत्कृष्ट ग्रंथनिर्मिती) रु. ३००/–
कल्याणी – काळ, व्यक्ती व दर्शन (शंकरराव देशपांडे,– गतिमान प्रकाशन, पुणे)

७. गिरिजा गंगाधर जांभेकर पारितोषिक (संपादित ग्रंथ)
महाराष्ट्रातील जाती संस्थाविषयक विचार – यशवंत सुमंत – डॉ. द. दि. पुंडे, संपादित (प्रतिभा प्रकाशन, पुणे)

८. ह. श्री. शेणोलीकर पारितोषिक (समीक्षा) रु. ५००/
रसमयी – दुर्गा भागवत – (वरदा बुक्स, पुणे)

९. तुळशीराम वाघ पारितोषिक (संतवाङ्मय) रु. २५०/–
साक्षात्कार मार्ग – संदीप हळदणकर (मार्ग प्रकाशन, पुणे १)

१०. सुशील प्रधान पारितोषिक (कुमार वाङ्मय) रु. २००/–
टोला – आशा भाजेकर (राजा प्रकाशन, माहीम मुंबई १६)

११ विनायक कोंडदेव ओक पारितोषिक (कुमारवाङ्मय) रु. १००/–
सरदार भगतसिंग – दा. वि. कुलकर्णी (मीनल प्रकाशन, कोल्हापूर)

ललितेतर वैचारिक ग्रंथ :

१२. शि. म. परांजपे पारितोषिक रु. २५०/–
गोखले नवदर्शन – मु. गो. देशपांडे (परिमघा प्रकाशन)

१३. ना. गो. चापेकर पारितोषिक रु. २५०/–
बाईमाणूस – सरोजा परुळकर (श्री विद्या प्रकाशन, पुणे)

१४. विश्वनाथ पार्वती गोखले पारितोषिक रु. १५०/–
ओलांडताना – लीला पाटील (श्री विद्या प्रकाशन, पुणे)

१५. श्री. शां. हुणमंते पारितोषिक रु. ३५०/–
रंगयात्रा – वि. भा देशपांडे संपा. (नाट्यसंपदा प्रकाशन, दादर)

१६. कै. लोकहितवादी उर्फ गोपाळ हरी देशमुख पुरस्कार रु. ७५१/–
सावरकरांचा बुद्धिवाद – एक चिकित्सक अभ्यास – प्रा. शेषराव मोरे (निर्मल प्रकाशन, नांदेड) (सामाजिक वैचारिक प्रयास)

पारितोषिकाचा निर्णय करण्यासाठी परीक्षक म्हणून खालील व्यक्तींनी काम केले :

डॉ. हे. वि. इनामदार, प्रा. म. ना. अदवंत, डॉ. अ. रा. तोरो, डॉ. ललिता कुंभोजकर, डॉ. चंद्रशेखर बर्वे, डॉ. गं. ना. जोगळेकर, श्री. म. श्री. दीक्षित, डॉ. अरविंद वामन कुलकर्णी, डॉ. जयंत वष्ट, डॉ. रेखा इनामदार–साने, डॉ. विलास खोले, श्री. राजा फडणीस, श्री. र. ग. मोदी, सौ. लीलावती भागवत, डॉ. शैला काळकर, डॉ. कल्याणी दिवेकर, श्री. सदा डुंबरे, श्री. शंकर सारडा, डॉ. लीला गोविलकर आणि डॉ. वीणा देव (निमंत्रक)

## शाखावृत्त :

**पिंपरी–चिंचवड :**

पिंपरी–चिंचवड या परिसरातील परिषदेची शाखा दि. २८ ऑगस्ट १९८८ रोजी पुनरुज्जीवित झाली. या उद्‌घाटनाच्या कार्यक्रमास म. सा. प. चे अध्यक्ष मा. ग. प्र. प्रधान, डॉ. वि. म. कुलकर्णी, प्रा. म. ना. अदवंत, डॉ. गं. ना. जोगळेकर, श्री. म. श्री. दीक्षित, प्रा. शांता शेळके. प्रा. भालचंद्र खांडेकर, डॉ. अरुणा ढेरे, डॉ. कल्याण इनामदार, श्री. अनिल कांबळे. डॉ. द. दि. पुंडे आदि साहित्यिक, कवी आणि साहित्यप्रेमी उपस्थित होते.

या शाखेचे अध्यक्ष म्हणून डॉ. रामचंद्र देखणे यांची आणि कार्यवाह म्हणून श्री. विजय जाधव यांची निवड करण्यात आली. प्रा. ग. प्र. प्रधान यांनी पिंपरी–चिंचवड शाखेचे उद्‌घाटन केले.

पुढील तीन वर्षांसाठी शाखेची खालीलप्रमाणे कार्यकारिणी निवडण्यात आली.

१) अध्यक्ष – डॉ. रामचंद्र देखणे
२) कार्यवाह – श्री. विजय जाधव
३) कोषाध्यक्ष – श्री. अमृत पऱ्हाड
४) सदस्य – सौ. मनाली गाडगीळ
५) ,, – दिलीप फलटणकर
६) ,, – श्री. मधू जोशी
७) ,, – श्री. अरुण जाखडे
८) ,, – श्री. तात्या चिंचवडे
९) ,, – प्रा शरद देव
१०) ,, – सौ. वीणा गर्भे
११) ,, – श्री. रमेश डोळस
१२) ,, – सौ. माधुरी ओक
१३) ,, – श्री. जयराम सोनवणे
१४) ,, – श्री. अजीत किशोर

**१) भोसरी येथे कवि–संमेलन :–**

म. सा. प. पिंपरी–चिंचवड शाखा आणि राष्ट्रप्रेम तरुण मंडळ भोसरी यांच्या संयुक्त विद्यमाने २० ऑक्टो. १९८० रोजी कवि–संमेलन आणि कथा–कथन आयोजित करण्यात आले. डॉ. रामचंद्र देखणे यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या या



अनुक्रमणिका

कार्यक्रमात ६५ कवींनी भाग घेतला. श्री. अमृत पऱ्हाड, श्री. मधू जोशी यांनी सूत्र-संचालन केले. सात लेखकांनी कथाकथन केले.

२) प्राधिकरण 'निगडी' येथील कवि-संमेलन

३० डिसेंबर १९८८ रोजी डॉ. रामचंद्र देखणे, सुधाकर नेर्लेकर व डॉ. श्री. घारे यांच्या उपस्थितीत झालेल्या कविसंमेलनात दिलीप वेदपाठक, श्री. वाकनीस, प्रा. शरद देव, मधू जोशी, अरुण जाखडे, सौ. स्नेहसुधा कुलकर्णी, मनोहर सोनवणे, लोंढे इत्यादी कवींनी भाग घेतला.

३) लोकसाहित्य दर्शन

दि. २३ फेब्रु. ८९ या दिवशी चिंचवड येथे लोकसाहित्याच्या संशोधक व लेखिका डॉ. सरोजिनी बाबर आणि साहित्य संमेलनाचे माजी अध्यक्ष श्री. शंकरराव खरात यांच्या उपस्थितीत 'लोकसाहित्य' या विषयावर कार्यक्रम झाला. या वेळी डॉ. रामचंद्र देखणे यांच्या 'बहुरंगी भारूड' या पुस्तकाचे प्रकाशन डॉ. बाबर यांच्या हस्ते झाले.

४) पिंपरी येथील – पुस्तक प्रकाशन–कवि–संमेलन :–

दि. ६ मे १९८९ या दिवशी म. सा. प. पिंपरी–चिंचवड शाखा व सुवीर प्रकाशन यांच्या वतीने 'नवोदय' ह्या नवकवींच्या प्रातिनिधिक कविता-संग्रहाचे प्रकाशन उपमहापौर (पिंपरी–चिंचवड महानगरपालिका) श्री. मधुकर पवळे यांच्या हस्ते करण्यात आले. यावेळी श्री. जयंत भिडे यांच्या सूत्रसंचालनाखाली झालेल्या कवि–संमेलनात ६० कवींनी भाग घेतला.

अहमदनगर :

१ २२–७–८८ कै. ग. ल. ठोकळ स्मृतिदिनानिमित्त डॉ. अनुराधा पोतदार यांचे 'ठोकळ व ग्रामीण कथा' या विषयावर व्याख्यान.
(कार्यक्रमात सहभाग – ह. कि. तोडमल, लीला गोविलकर)

२ २१–१२–८८ गं. बा. सरदार यांना श्रद्धांजली सभा.
(सहभाग – ह. कि. कोडमल, डॉ. सहस्रबुद्धे, डॉ. सौ. कवडे)

३ २४–१२–८८ साने गुरुजी जन्मदिनानिमित्त श्री. महावीर जोंधळे यांचे व्याख्यान

४ प्रसिद्ध लेखक श्री. सुहास शिरवळकर यांच्या प्रकट मुलाखतीचा कार्यक्रम. मुलाखतकार – सौ. सुजाता महाजन

५ १ मे ८९ – श्री. सोनग्रा यांची महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे उपाध्यक्ष म्हणून नेमणूक झाल्याबद्दल सत्कार.

६ १९ मे ८९ – साहित्य संस्कृती मंडळाचे अध्यक्ष डॉ. यशवंत मनोहर यांचा सत्कार. ( सहभाग – प्रा. जवाहर मुथा, डॉ. सहस्रबुद्धे. )

७ २२ जुलै ८९ – कै. ग. ल. ठोकळ स्मृतिदिन. डॉ. अरविंद वामन कुलकर्णी यांचे व्याख्यान.

डॉ. लीला गोविलकर
अध्यक्ष, मसाप नगर शाखा

**सोलापूर :**

१) दि. १८।८।८८ रोजी प्राचार्य राम शेवाळकर, वणी, यांचे स्व. पु. भा. भावे यांच्या स्मृत्यर्थ पु. भा. भावे 'साहित्यिक व साहित्य' या विषयावर व्याख्यान.

२) दि. २८।८।८८ रोजी कविवर्य संजीवांच्या ७५ व्या वर्धापनदिनानिमित्त दै. लोकसत्ताचे संपादक श्री. माधव गडकरी यांच्या हस्ते मा. ना. श्री. सुशीलकुमार शिंदे यांच्या अध्यक्षतेखाली श्री. बाळ सामंत यांच्या उपस्थितीत कविवर्यांचा सत्कार व गौरव.

३) १२।९।८८ 'रंगश्री' प्रकाशनने डॉ. निर्मलकुमार फडकुले यांच्या 'आनंदाची डहाळी' या पुस्तकाचे प्रकाशन केले. याप्रसंगी मा. ना. श्री. सुशीलकुमारजी शिंदे यांच्या हस्ते प्रकाशन. लेखक व प्रकाशकांचा सत्कार.

४) २२।१२।८८ स्व. कवी कुंजविहारी काव्यस्पर्धेचे आयोजन व बक्षीस वितरण समारंभ.

५) ९।३।८९ प्रा. सौ. शकुंतला पाटील यांच्या 'हळवा वारा' या काव्यसंग्रहाचे प्रकाशन डॉ. निर्मलकुमार फडकुले यांच्या हस्ते, प्रा. सौ. कमल ठकार यांच्या उपस्थितीत.

६) येथील काव्यरसिक विधिज्ञ श्री. विलासजी शहा यांचे 'कवी व कविता' या विषयावर व्याख्यान. अध्यक्ष–डॉ. निर्मलकुमार फडकुले.

७) २४ व २५ एप्रिल रोजी प्रा. उत्तम कानिटकर, जबलपूर यांची '२१ व्या शतकाच्या उंबरठ्यावर भारत' आणि 'मुलांची उद्याची शिदोरी' या विषयांवर दोन व्याख्याने.

८) ३।६।८९ पिंपरी–चिंचवड येथील विभागीय साहित्य संमेलनात कार्याध्यक्ष श्री. रा. त्र्यं. छत्रपती यांचा सत्कार.

९) २०।६।८९ मु. मोहोळ येथे भाई विश्वासराव फाटे, शाखा उपाध्यक्ष, यांच्या सहकार्याने काव्यवाचन व डॉ. निर्मलकुमार फडकुले यांचे व्याख्यान.

१०) श्री. ज. जोशी, ग. वा. बेहेरे, रा. शं. वाळिंबे, सुधाकरराव चौधरी यांना श्रद्धांजली वाहण्यात आली.

जळगाव जिल्हा :

१) दि. २५–१०–८८ रोजी झालेल्या कार्यकारी मंडळाच्या सभेत नगरचे अशोक थोरे, तसेच, श्री. गजानन जागीरदार, दत्त कुलकर्णी यांना श्रद्धांजली वाहण्यात आली.

२) जळगाव जिल्ह्यातील नवोदित कवी व प्रथितयश कवी यांचे कविसंमेलन दि. ४।१२।८८ रोजी झाले. सर्वश्री माधव ओं. भालेराव, भगवान नन्नवरे, मधुकर पुं. घोडके, शि. सं. पाटील, वसंत चव्हाण, मालतीकांत, वासुदेव वाघुळदे, रमाकांत भोलाणे, ना. स. बडगुजर यांचा यात सहभाग होता.

३) २४।३।८९ ला शाखेतर्फे 'पु. शं. पतके, श्री. ज. जोशी, रा. शं. वाळिंबे, माधव वाटवे, जैनेंद्रकुमार, गं. बा. सरदार, वसंतदादा पाटील' या दिवंगत साहित्यिकांना श्रद्धांजली अर्पण करण्यात आली.

श्री. हो. पं. चौधरी, प्रा. आ. भू. पाटील, प्रा. रा. वा. पाटील, प्रा. दि. व. पाटील, प्रा. ना. श. पाटील यांची यावेळी भाषणे झाली.

४) जळगावच्या काही प्राध्यापकांनी मराठी व हिंदी या विषयात डॉक्टरेट पदवी मिळविल्याबद्दल त्यांचा सत्कार दि. २९–३–८९ रोजी आदरणीय अण्णासाहेब जी. डी. बेंडाळे यांच्या शुभहस्ते करण्यात आला. अध्यक्ष प्रा. रा. वा. पाटील होते. सत्कारार्थींमध्ये डॉ. बी. एन्. पाटील (मराठी); डॉ. सौ. उर्मिला पाटील, डॉ. आर. एम्. देशमुख व डॉ. एन. डी. पाटील (हिंदी) यांचा समावेश होता. दि. व. पाटील, प्रा. शा. नं. पाटील, प्रा. राजा महाजन यांची यावेळी भाषण झाली.

श्री. ग. वा. बेहरे यांना दि. ३१–३–८९ ला श्रद्धांजली वाहण्यात आली. ठाकूरदेसाई व्याख्यानमालेतील एक व्याख्यान प्रा. कुसुमाकर शिंपी यांनी 'मराठी संतवाणी आजही जीवनाशी सुसंगत आहे' या विषयावर दिले.

ठाणे :

वर्षाच्या सुरुवातीला आजीव सभासदांची संख्या १२० व साधारण सभासदांची संख्या १० होती. वर्षअखेर शाखेचे आजीव सभासद १३० असून साधारण सभासद २८ आहेत.

साहित्यिक व सांस्कृतिक कार्यक्रम

१) २७ ऑगस्ट ८८ रोजी, कै. पु. भा. भावे यांच्या ८ व्या पुण्यतिथीनिमित्त, प्रा. राम शेवाळकर यांचे 'पु. भा. भावे – व्यक्ती आणि वाङ्मय' या विषयावर व्याख्यान झाले.

२) २४ ऑगस्ट ८८ रोजी, श्री. स. बा. यशवंत. पुणे यांचे 'कहाणी टोपण

नावांची ' या विषयावर मनोरंजक व्याख्यान झाले.

३) २८ सप्टेंबर १९८८ रोजी प्रा. म. वि. फाटक यांच्या प्रथम स्मृतिदिना-निमित्त, त्यांच्या कुटुंबियांनी दिलेल्या देणगीतून 'प्रा. म. वि. फाटक स्मृतिपुष्प' गुंफण्यात आले. या वेळी सुप्रसिद्ध साहित्यिक सौ. गिरिजा कीर यांचे 'मला भेटलेली माणसे' या विषयावर व्याख्यान झाले. याचवेळी 'प्रा. म. वि. फाटक स्मृति–सुगंध' या ग्रंथाचे प्रकाशन प्राचार्य म. द. नाडकर्णी यांच्या हस्ते झाले. यावेळी प्रा. म. ना. अदवंत, प्रा. मुरलीधर सायनेकर, श्री. वि. र. भूमकर ह्यांची भाषणे झाली.

४) १६ ऑक्टोबर ८८ या दिवशी, सुप्रसिद्ध पत्रकार श्री. माधव गडकरी यांच्या षठ्यब्दिपूर्तीनिमित्त झालेल्या सत्कारात ठाणे शाखा सहभागी झाली.

५) ११ जाने. १९८९ रोजी, ६२ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष प्रा. के. ज. पुरोहित उर्फ शांताराम यांचा ठाणे नगरवाचन मंदिर या संस्थेच्या सहकार्याने सत्कार करण्यात आला.

६) २८ जानेवारी ८९ रोजी सुप्रसिद्ध संशोधक प्राचार्य डॉ. हेमंत वि. इनामदार यांचे 'ज्ञानदेवे रचिला पाया' या विषयावर मराठी ग्रंथसंग्रहालय ठाणे यांच्या सहकार्याने व्याख्यान झाले.

७) १३ मार्च ८९ रोजी 'आईना–ए–गजल'कार डॉ. विनय वाईकर, यांचे 'उर्दू गजल–एक ओळख' या विषयावर व्याख्यान झाले.

८) २९ एप्रिल ८९ रोजी, जनकवी पी. सावळाराम यांच्या झालेल्या सत्कार समारंभात शाखेनें भाग घेतला.

९) २८ मे ८९ रोजी ठाणे जिल्ह्यातील साहित्य रसिकांसाठी एक दिवसाचा मेळावा आयोजित केला होता. त्यावेळी 'कलेने साहित्याला काय दिले ?' या विषयावर, तसेच 'लेखिकांनी स्त्रियांच्या प्रश्नांना न्याय दिला आहे का ?' विषयांवर दोन परिसंवाद आयोजित केले होते. या परिसंवादांमध्ये पुढील व्यक्तींचा सहभाग उल्लेखनीय होता. (१) श्री. बी. विठ्ठल, विद्याधर व्यास, बाबूराव सडवेलकर, सौ. मंजिरी देव, (२) प्रा. सौ. माधवी चाफेकर, नयना आचार्य, संजीवनी खेर, प्रा. ज्योतिका ओझरकर, शीला मराठे.

दुपारच्या वेळी काव्यस्पर्धा आयोजित केली होती. अध्यक्षस्थानी कवी पी. सावळाराम होते. सुमारे ३५ कवींनी स्पर्धेत भाग घेतला होता. विजयी तीन स्पर्धक अनुक्रमे प्रा. सौ. विजया पंडितराव, प्रवीण दामले आणि श्रीनिवास गडकरी. कवि-संमेलनाचे सूत्रसंचालन श्री. पद्माकर शिरवाडकर यांनी केले, तर परीक्षक म्हणून श्री. म. पां. भावे, सौ. पद्मिनी बिनीवाले व प्रा. सौ. ज्योतिका ओझरकर यांनी काम केले.

१०) १८ जून १९८९ रोजी, शाखेचा २० वा वर्धापनदिन प्रा. डॉ. म. वि. गोखले यांच्या 'साहित्यातील वारकरी आणि धारकरी' या व्याख्यानाने साजरा झाला.

पिंपरी चिंचवड येथे झालेल्या (३।४ जून ८९) ६ व्या विभागीय साहित्य संमेलनात सर्वश्री चिं. शं. जोशी, म. पां. भावे, श्रीहरी भिडे, पद्माकर शिरवाडकर व व्ही. सिन्नरकर उपस्थित होते. चिंतामण जोशी यांनी एका परिसंवादात तर म. पां. भावे यांनी निमंत्रितांच्या कविसंमेलनात भाग घेतला होता.

शाखेच्या वतीने म. सा. प. चे प्रवेश-परीक्षेचे वर्गही घेण्यात आले.

**कोल्हापूर :**

१) **प्रा. ग. प्र. प्रधान यांच्या 'साहित्यिक गप्पागोष्टी'**

दि. २२ ऑगस्ट, ८८ रोजी म. सा. प. कोल्हापूर शाखा व करवीर नगर वाचन-मंदिर यांच्या वतीने म. सा. प. चे नूतन अध्यक्ष प्रा. ग. प्र. प्रधान यांच्या 'साहित्यिक गप्पां'चा कार्यक्रम योजिला होता. या कार्यक्रमात पुढील व्यक्तींचा सहभाग होता — श्री. चिं. ह. भाटवडेकर, श्री. शशिकांत महाडेश्वर, श्री. शेवडे गुरुजी, प्रा. मु. बा. जगताप, प्रा. म. अ. कुलकर्णी, प्रा. ए. जी. भोसले, श्री. मराठे, श्री. श्रीपाद देशपांडे. पा. प्रधान यांचा व कोल्हापूर–सोलापूर जिल्ह्याचे कार्यकारी मंडळावरील नवनिर्वाचित प्रतिनिधी डॉ. चंद्रकुमार नलगे यांचा यावेळी सत्कार करण्यात आला.

२) **वि. स. खांडेकर स्मृतिदिन व कथास्पर्धा पारितोषिक वितरण :** दि. २० सप्टेंबर ८८ रोजी पद्मभूषण वि. स. खांडेकर यांचा स्मृतिदिन प्रा. पां. ना. कुलकर्णी यांच्या अध्यक्षतेखाली साजरा करण्यात आला.

३) **श्री. गणेशसरस्वती ठाकूरदेसाई व्याख्यान मालेतील व्याख्यान :** दि. ३० सप्टेंबर, ८८ रोजी डॉ. व्यं. वि. द्रवीड यांचे 'संतवाङ्मय' या विषयावरील व्याख्यान डॉ. बापूजी संकपाळ यांच्या अध्यक्षतेखाली झाले.

४) **'रुपेरी पडदा' पुस्तक प्रकाशन :** दि. ८ ऑक्टोबर ८८ रोजी मॅजेस्टिक प्रकाशन व म. सा. प. शाखेच्या वतीने सुप्रसिद्ध दिग्दर्शक व लेखक मा. दिनकर द. पाटील यांच्या 'रुपेरी पडदा या पुस्तकाचा प्रकाशन समारंभ मा. व्ही. टी. पाटील यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झाला.

५) **'लेपर' कथासंह प्रकाशन :** दि. १ डिसेंबर ८८, रोजी डॉ. पी. जी. कुलकर्णी लिखित 'लेपर' या कथासंग्रहाचा प्रकाशन समारंभ प्राचार्य म. द. हातकणंगलेकर यांच्या अध्यक्षतेखाली डॉ. अ. रा. तोरो यांच्या हस्ते झाला.

**सत्कार सहभाग :** सुप्रसिद्ध साहित्यिक मा. रणजित देसाई यांच्या एकषष्ठी-बद्दल, २) प्रा. के. ज. पुरोहित यांची अ. भा. मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी

निवड झाल्याबद्दल आणि 'उचल्या'कार लक्ष्मण गायकवाड यांना साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळाल्याबद्दल झालेल्या सत्कार समारंभात शाखा सहभागी झाली.

**दुखवटा :** म. सा. प. कोल्हापूर शाखेचे भूतपूर्व कार्याध्यक्ष माधव पातकर, सुप्रसिद्ध साहित्यसमीक्षक आणि विचारवंत प्रा. गं. बा. सरदार, कथाकार श्री. ज. जोशी आदींच्या निधनाबद्दल दुखवटा व्यक्त करण्यात आला.

**अभिनंदन :** कवी कुसुमाग्रजांना ज्ञानपीठ पुरस्कार मिळाल्याबद्दल, डॉ. आनंद यादवांना 'झोंबी' कादंबरीस प्रियदर्शिनी पुरस्कार मिळाल्याबद्दल, शशिकांत महाडेश्वर आणि प्रा. अनिल पाटील यांच्या अनुक्रमे 'ग्रामीण शिक्षक : कथा नि व्यथा' व 'बैलं' या पुस्तकांना साहित्य संस्कृती मंडळाचा 'यशवंतराव चव्हाण वाङ्मय पुरस्कार' लाभल्याबद्दल, डॉ. चंद्रकुमार नलगे यांची साहित्य संस्कृती मंडळाचे सदस्य म्हणून नियुक्ती झाल्याबद्दल, डॉ. बापूजी संकपाळ यांची अ. भा. महानुभाव परिषदेवर प्रतिनिधी म्हणून निवड झाल्याबद्दल या सर्वांचे शाखतर्फे अभिनंदन करण्यात आले.

**नवे सदस्य :** चालू वर्षी ८ आजीव सभासदांची आणि १७ साधारण सभासदांची शाखा सभासदांत भर पडली.

**इचलकरंजी :**

सोमवार दि. ८ ऑगस्ट १९८८ पासून सायंकाळी ६-०० वाजता आपटे वाचन मंदिर येथे साहित्यिकांची व साहित्यप्रेमिकांची साप्ताहिक बैठक सुरू करण्यात आली. सोमवार दि. ८-८-८८ च्या बैठकीत इचलकरंजीतील नवोदित साहित्यिक व 'अमृतगामी' या संभाजी महाराजाच्या जीवनावरील ग्रंथाचे लेखक श्री. रमेश भिवरे यांची प्रकट मुलाखत शाखेचे कार्याध्यक्ष पा. अशोक दास यांनी घेतली.

दि. १५ ऑगस्ट १९८८ रोजी झालेल्या बैठकीत प्रा. अशोक दास यांनी इचलकरंजीतील ज्येष्ठ कवी श्री. शरद बेडेकर यांची मुलाखत घेतली. यावेळी उपस्थितांनीही श्री. बेडेकर यांना प्रश्न विचारले.

दि. २२ ऑगस्ट १९८८ रोजी झालेल्या बैठकीत 'हाडवैर' व 'रक्ताचं नातं' या कथासंग्रहाचे लेखक श्री. आ. क. कुरुंदवाडे यांना निमंत्रित केले होते. या बैठकीत त्यांनी आपल्या लेखनाच्या प्रेरणा सांगून नवोदित लेखकांना उपयुक्त असे मार्गदर्शन केले.

दि. २१ ऑगस्ट १९८८ रोजी शाखेच्या वतीने आपटे वाचन मंदिर येथे महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणेचे अध्यक्ष प्रा. ग. प्र. प्रधान यांच्या प्रकट मुलाखतीचा कार्यक्रम आयोजित करण्यात आलेला होता. त्यांची मुलाखत घेण्यासाठी

सांगली आकाशवाणीचे निवेदक वामन काळे व प्रा. वैजनाथ महाजन सांगली हे उपस्थित होते. या कार्यक्रमाचे अध्यक्ष म. सा. प. चे कार्यकारी मंडळ सदस्य प्रा. चंद्रकुमार नलगे होते.

शाखेच्या दि. २९-८-८८ च्या बैठकीत शहरातील नगरसेवक, 'स्वराज्याच्या सीमेवर'चे नाटककार श्री. गुलाब नदाफ यांच्या मुलाखतीचा कार्यक्रम झाला.

धुळे :

१) थोर साहित्यिक व म. सा. प. चे माजी अध्यक्ष माननीय अण्णासाहेब गं. बा. सरदार यांच्या दुःखद निधनानिमित्त येथील बर्वेस्मृती छात्रालयाच्या इमारतीत एक शोकसभा आयोजित करून कै. प्रा. सरदारांना हार्दिक श्रद्धांजली अर्पण करण्यात आली.

२) हैद्राबाद येथील उस्मानिया विद्यापीठातील माजी मराठी विभागप्रमुख व बृहन्महाराष्ट्रातील एक थोर व्यासंगी साहित्यिक प्रा. डॉ. श्री. रं. कुलकर्णी यांचे 'संतांचा भागवतधर्म' ह्या विषयावर येथील श्री. पद्मनाभस्वामींच्या मठात एक सुश्राव्य व्याख्यान आयोजित करण्यात आले होते.

३) ठाकूरदेसाई व्याख्यानमालेच्या निमित्ताने नगर येथील अतिरिक्त जिल्हा व सत्र न्यायाधीश व संत वाङ्‌मयाचे एक विद्वान व रसाळ वक्ते माननीय गोविंद मिला अस्मदसाहेब यांचे 'तुका झालासे कळस.' ह्या विषयावर श्री. तुकाराम बिजेच्या दिवशी येथील श्री. पद्मनाभस्वामींच्या मठात अभ्यासपूर्ण व्याख्यान झाले.

ऋणनिर्देश :

परिषदेच्या कार्यकारी मंडळाने केलेल्या विविध कार्यात अनेक व्यक्ती आणि संस्था यांचे सतत सहकार्य लाभले. महाराष्ट्र राज्य शिक्षण खाते, ग्रंथालय-संचालनालय, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, विश्वकोष कार्यालय, पुणे महानगरपालिका, तसेच परिषदेच्या साहित्यिक साहाय्य निधीस भरघोस देणग्या देणाऱ्या व्यक्ती व संस्था; सर्व शाखासभांचे कार्यकर्ते, वृत्तपत्रे, नियतकालिके, आकाशवाणी, नव्याने झालेले आजीव व साधारण सभासद तसेच हितचिंतक या सर्वांचे आम्ही ऋणी आहोत.

आपले,

राजा फडणीस — गं. ना. जोगळेकर, कार्यवाह — वि. शं. जोशी

# परिषद वार्ता

## ( १ एप्रिल ते ३० जून १९८९ अखेर )

**ज्ञानकोशकार डॉ. केतकर स्मृतिदिन :** १० एप्रिल रोजी सकाळी पदाधिकारी राजेंद्र बनहट्टी, म. श्री. दीक्षित, राजा फडणीस आणि गं. ना. जोगळेकर यांनी कमला नेहरू उद्यानातील डॉ. केतकर यांच्या स्मारकास पुष्पांजली वाहिली. सायंकाळी परिषदेत श्रीमती प्रतिभा रानडे यांचे 'केतकरांचे कौटुंबिक जीवन' या विषयावर व्याख्यान झाले.

**ग. वा. बेहेरे यांना श्रद्धांजली :** परिषदेचे माजी कार्याध्यक्ष 'सोबत'कार ग. वा. बेहरे यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी ५ एप्रिल रोजी प्रा. बाळ गाडगीळ यांच्या अध्यक्षतेखाली सभा भरली होती. सभेत सर्वश्री श्रीपाद जोशी, वसंत काणे, प्रभाकर ऊर्ध्वरेषे, शंकर सारडा, गं. ना. जोगळेकर यांची भाषणे झाली.

**परिषदेचा वर्धापनदिन :** महाराष्ट्र साहित्य परिषदेचा ८३ वा वर्धापनदिन २७ मे रोजी, शिक्षणशास्त्र संस्थेच्या सभागृहात महाराष्ट्राचे मुख्यमंत्री मा. श्री. शरद पवार यांच्या अध्यक्षतेखाली साजरा झाला. साहित्यक्षेत्रात प्रदीर्घ वाङ्मयसेवेबद्दल दरवर्षी दिले जाणारे महाराष्ट्र साहित्य परिषद पारितोषिक आणि मानचिन्ह कविवर्य श्री. वा. रा. कान्त यांना मुख्यमंत्र्यांच्या हस्ते देण्यात आले. तत्पूर्वी कार्याध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी यांनी प्रास्ताविक निवेदन केले आणि डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी श्री. कांत यांचा परिचय करून दिला. यानंतर साहित्यिक साहाय्य निधीतून नाटककार श्री. विनायक देवरूखकर यांना आणि कै. डॉ. भीमराव कुलकर्णी पुरस्कार श्री. म. श्री. दीक्षित यांना अध्यक्षांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. 'भाषा आणि साहित्य : संशोधन खंड ३ (संपादक डॉ. वसंत स. जोशी आणि प्रा. म. ना. अदवन्त) या ग्रंथासंबंधी डॉ. वसंत स. जोशी यांनी निवेदन केल्यानंतर अध्यक्षांच्या हस्ते त्याचे प्रकाशन झाले. डॉ. वीणा देव यांनी परिषदेतर्फे दिल्या जाणाऱ्या विविध ग्रंथपारितोषिकांसंबंधी माहिती दिली, तसेच कार्यक्रमाचे संचालन केले. अध्यक्ष श्री. शरद पवार यांचे भाषण झाल्यावर त्यांनी परिषदेच्या इमारत विस्तार योजनेसाठी एक लक्ष आणि साहित्य साहाय्यनिधीसाठी एक लक्ष – अशी एकूण दोन लक्ष रुपयांची देणगी जाहीर केली. परिषदेचे अध्यक्ष प्रा. ग. प्र. प्रधान यांनी समारोपाचे भाषण केले. (मा. पवार यांनी घोषित केलेली

दोन लक्षांची रक्कम संस्थेकडे जूनमध्येच जमा झाली आहे.)

**महामंडळ सभा :** मुंबई येथे ७ एप्रिल रोजी भरलेल्या मराठी साहित्य महामंडळाच्या सभेत महामंडळाचे कार्यालय महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे या घटक संस्थेकडे सुपूर्त करण्याचा निर्णय करण्यात आला. यावेळी श्री. राजेंद्र बनहट्टी, श्री. राजा फडणीस आणि डॉ. गं. ना. जोगळेकर यांची अनुक्रमे महामंडळाचे अध्यक्ष, कोषाध्यक्ष आणि कार्यवाह म्हणून नियुक्ती करण्यात आली. या निर्णयानुसार लगोलग महामंडळाचे कार्यालय पुणे येथे परिषदेकडे आले असून कार्यही सुरू झाले आहे.

**विभागीय साहित्य संमेलन :** परिषदेचे ६ वे विभागीय साहित्य संमेलन ३ व ४ जून रोजी पिंपरी–चिंचवड शाखेच्या वतीने प्रसिद्ध कवी प्रा. वसंत बापट यांच्या अध्यक्षतेखाली एच. ए. वसाहतीतील वेलफेअर सेंटरच्या सभागृहात यशस्वीपणे पार पडले. संमेलनाचे उद्घाटन खासदार प्रा. रामकृष्ण मोरे यांनी केले. डॉ. रामचंद्र देखणे यांच्या स्वागताध्यक्षीय भाषणानंतर श्री. शंकरराव खरात आणि डॉ. श्री. श्री. घारे यांच्या हस्ते मान्यवरांचा सत्कार करण्यात आला. श्री. विद्याधर गोखले यांनी नव्या अध्यक्षांना सूत्रप्रदान केल्यानंतर अध्यक्षांचा परिचय प्रा. ग. प्र. प्रधान यांनी करून दिला. प्रा. वसंत बापट यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात आजच्या कवितेसंबंधी अतिशय मार्मिक विवेचन केले. रात्री स्थानिक कवींचे संमेलन श्री. रवींद्र भट यांच्या अध्यक्षतेखाली भरले होते.

दुसरे दिवशी सकाळी ९ वाजता 'संत साहित्य आज कालबाह्य झाले आहे काय ?' या विषयावर डॉ. प्र. ल. गावडे यांच्या अध्यक्षतेखाली परिसंवाद झाला. त्यात डॉ. मु. श्री. कानडे, डॉ. व. दि. कुलकर्णी, डॉ. वसंत सावंत, डॉ. नरेंद्र कुंटे, डॉ. कुसुमाकर शिपी, श्री. दिलीप फलटणकर, डॉ. रामचंद्र देखणे यांनी भाग घेतला होता. सकाळी ९ ते १ या वेळेत श्री. नारायण सुर्वे यांच्या अध्यक्षतेखाली प्रथितयश कवींचे संमेलन भरले होते. संमेलनाचे सूत्रचालन डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी केले. या संमेलनात शांता शेळके, अरुणा ढेरे, अनुराधा पोतदार, वसंत सावंत, अनिल कांबळे, राजा दीक्षित, रमण रणदिवे, सुधाकर नेर्लेकर, सरिता पदकी, स्नेहसुधा कुलकर्णी, गंगाधर महांबरे, कल्याण इनामदार, अमृत पऱ्हाड, रमेश वाकनीस, शरद देव, अरुण जाखडे, राजा मंगळवेढेकर आणि वसंत बापट यांनी भाग घेतला होता.

सायंकाळी श्री. राजेंद्र बनहट्टी यांच्या अध्यक्षतेखाली 'दूरदर्शन : वाङ्मयाला शाप की वरदान ?' या विषयावर परिसंवाद झाला. त्यात लीला गोविलकर, ललिता कुंभोजकर, शंकर सारडा, सतीश देशमुख, अनिल बळेल, वीणा देव,

चिं. शं. जोशी, डॉ. श्री. श्री. घारे यांनी भाग घेतला. नंतर अध्यक्ष प्रा. वसंत बापट यांचे समारोपाचे भाषण झाले. यावेळी आवर्जून उपस्थित असलेल्या प्रा. मंगेश पाडगावकरांनी आपली एक कविता पेश करून वाहवा मिळविली. डॉ. गं. ना. जोगळेकर (म. सा. प. तर्फे) आणि श्री. विजय जाधव (शाखेतर्फे) यांची आभाराची भाषणे झाल्यावर संमेलनाचा समारोप झाला. रात्री प्रा. द. मा. मिरासदार, श्रीमती ज्योत्स्ना देवधर आणि नवोदित कथाकारांच्या कथाकथनाचा बहारदार कार्यक्रम झाला. प्रस्तुत विभागीय संमेलन यशस्वी रीतीने साजरे करण्यात डॉ. रामचंद्र देखणे, डॉ. श्री. श्री. घारे, श्री. विजय जाधव, प्रा. शरद देव, सौ. मनाली गाडगीळ इत्यादी कार्यकर्त्यांनी खूप परिश्रम केले. शाखेच्या या सर्व कार्यकर्त्यांची तसेच, महापौर श्री. कविचंद भाट आणि पिंपरी–चिंचवडच्या सर्व नगरसेवकांची परिषद फार आभारी आहे.

**नाथमाधव स्मृतिदिन :** २१ जूनला नाथमाधव यांच्या स्मृतिदिनी डॉ. वि. भा. देशपांडे यांचे 'मराठी ऐतिहासिक नाटक : काही अपेक्षा' या विषयावर व्याख्यान झाले.

**का. र. मित्र स्मृतिदिन :** २२ जूनला का. र. मित्र यांच्या स्मृतिदिनी प्रा. म. ना. अदवंत यांचे 'मासिक मनोरंजन' या विषयावरच व्याख्यान झाले.

| | | |
|---|---|---|
| **राजा फडणीस** | **गं. ना. जोगळेकर**<br>**कार्यवाह** | **चिं. शं. जोशी** |

## महाराष्ट्र साहित्य परिषद,

शेडयूल ८

दिनांक ३१ मार्च १९८९

| निधी व देणी | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|
| **विश्वस्तनिधी** | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ४,३८,२८२–४५ | ४,७९,७०७–४५ |
| आजीव सभासद (८८–८९) | ४१,४२५–०० | |
| **इतर राखीव निधी** | | |
| (अ) इमारत | | ८९,६४४–९४ |
| (ब) ग्रंथालय | | २३,५७३–१० |
| (क) वाङ्मयेतिहास योजना | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ३२,५८७–१६ | ३४,०८३–७६ |
| ८८–८९ मधील विक्री | १९,७४८–०० | |
| ३१–३–८९ चा शि. साठा | २२,२७८–९७ | |
| वजा १–७–८८ चा शि. साठा | ३१,९५८–९७ | |
| वजा ८८–८९ मधील खर्च | ८,५७१–४० | |
| (ड) पारितोषिके व स्मृतिदिन निधी | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | २,३२,१५६–०० | २,७४,१५६–०० |
| ८८–८९ मधील जमा | ४२,०००–०० | |
| प्रॉव्हिडंड फंड खाते | | |
| मागील ताळेबंदावरून | २२,३७३–८२ | २२,३७३–८२ |
| ८८–८९ मधील जमा | — | |
| साहित्यिक साहाय्य निधी | | |
| मागील ताळेबंदवरून | ९७,२५८–०० | १,३६,८५८–०० |
| ८८–८९ मधील जमा | ३९,६००–०० | |
| इतर देणी | | |
| अनामत | | ७४,७१५–३२ |
| ग्रंथालय अनामत | | १०,०००–०० |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | २९,९५२–०० | ४३,८९२–०० |
| ८८–८९ मधील जमा | १३,९४०–०० | |

पुणे ४११०३०

नियम (१) प्रमाणे

रोजीचा ताळेबंद

| जिंदगी व येणी | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|
| स्थिर जिंदगी | | ५५,०६६–६२ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ५६,४७८–५८ | |
| वजा घसारा २.५ % | १,४११–९६ | |
| गुंतवणुका | | |
| | | १,२१,५५०–०० |
| (अ) कर्जरोखे दर्शनी किंमतीचे | | |
| लोन १९४६ ३% | ५,३००–०० | |
| कन्व्हर्शन लोन | २,७००–०० | |
| (ब) शेअर्स सें. प्रा. रेल्वेज | २,३००–०० | |
| महाराष्ट्र स्टेट को. ऑ. बँक | १,२५०–०० | |
| (क) टेल्को रॉयल डिबेंचर्स | ६०,०००–०० | |
| (ड) महानगर टेलिफोन निगम | ५०,०००–०० | |
| फर्निचर व डेडस्टॉक | | ८,३९२–२४ |
| मागील ताळेबंदानुसार | ९,३२४–७१ | |
| ८८–८९ मधील खरेदी | — | |
| वजा घसारा १० टक्के | ९३२–४७ | |
| ग्रंथालय | | ३४,८६९–३३ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ३२,५४६–१० | |
| अधिक ८८–८९ मधील खरेदी | ६,१९७–६० | |
| वजा घसारा १० टक्के | ३,८७४–३७ | |
| शिल्लक साठा | | ५४,७६९–३२ |
| वाङ्मयेतिहास प्रकाशने | २२,२७८–९७ | |
| संशोधन प्रकाशने | १०,६३१–१५ | |
| मराठी फार्स | २१,८१९–२० | |

अनुक्रमणिका

| निधी व देणी | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|
| हिशेब तपासनीस | | ५००–०० |
| मराठी फार्स | | १३,४१४–४३ |
| मागील ताळेबंदावरून | १३,१८७–८३ | |
| ८८–८९ मधील विक्री | १,७६१–५० | |
| ३१–३–८९ चा शिल्लक साठा | २१,८१९–२० | |
| धजा ८८–९९ मधील खर्च | ६५३–९० | |
| वजा १–७–८८ चा शिल्लक साठा | २२,७००–२० | |
| साहित्य परिषद पारितोषिक निधी | | ३,९१४–२५ |
| संशोधन प्रकाशने | | ९,८१६–०७ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ६,१२०–२७ | |
| ८८–८९ मधील विक्री | ९,३१५–८० | |
| ३१–३–८९ चा साठा | १०,६३१–१५ | |
| वजा १–७–८८ चा साठा | १२,८५१–१५ | |
| वजा ८८–८९ चा खर्च | ३,४००–०० | |
| अखेरच्या शिलका | | |
| बँक ऑफ बडोदा (करंट) | | २९,२९५–६९ |
| बँक ऑफ महाराष्ट्र | | २८,७५४–३९ |
| विश्वस्तांकडून | | ३,०००–०० |
| | | १२,७७,६९९–२२ |

आमच्या आजच्या तारखेच्या रिपोर्टानुसार
पाटणकर अँड असोसिएटस्, चार्टर्ड अकौंटंटस् करिता

पुणे.
दिनांक १–९–८९

एन्. सी. भळगट
भागीदार

| जिंदगी व येणी | रुपये | पैसे | रुपये | पैसे |
|---|---|---|---|---|
| वीज बोर्ड अनामत | | | २६० | ०० |
| आयकर वसुली | | | ९,८७८ | ०० |
| इतर येणी | | | २८,१९० | ४० |
| ॲडव्हान्स | | | २,४३२ | ८४ |
| ठेवी – | | | ६,५८,९०० | ०० |
| अ) पारितोषिक व व्याजाचे | २५,५०० | ०० | | |
| ब) बँक ऑफ महाराष्ट्र ठेवी | २३,४०० | ०० | | |
| क) विश्वस्त ठेवी | ४,८७,५०० | ०० | | |
| ड) कार्यकारी मंडळ ठेवी | ५१,५०० | ०० | | |
| इ) स्टेट बँक ऑफ इंडिया ठेवी | ७०,००० | ०० | | |
| फ) ग्रंथालय अनामत | १,००० | ०० | | |
| प्रा. फंड ठेवी | | | २२,३७३ | ८२ |
| तूट | | | २,०८,४०५ | ४८ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | १,५६,०२९ | ७१ | | |
| ८८-८९ मधील तूट | ५२,३७५ | ७७ | | |
| अखेरच्या शिलका – | | | ७२.६५१ | १७ |
| रोख | ८४७ | ९० | | |
| स्टेट बँक (वि.) सेव्हिंग | २,४७६ | ३८ | | |
| बँक ऑफ बडोदा (वि.) सेव्हिंग | ३८,५९७ | ८२ | | |
| पुणे पीपल्स को. ऑ. बँक | ५,३२७ | ९५ | | |
| पुणे पीपल्स को. ऑ. बँक | १६,३३३ | ४० | | |
| देना बँक सेव्हिंग्ज | ४,८४३ | ७२ | | |
| देना बँक करंट | ४,२१४ | ०० | | |
| | | | १२,७७,६९९ | २२ |

| | | |
|---|---|---|
| गं. ना. जोगळेकर | म. वि. गोखले | सर्जेराव घोरपडे |
| राजा फडणीस | कोषाध्यक्ष | मधुकर परांजपे |
| चिं. शं. जोशी | | म. श्री. दीक्षित |
| कार्यवाह | | विश्वस्त |

अनुक्रमणिका

## महाराष्ट्र साहित्य परिषद,

शेड्यूल ११

दिनांक १–७–१९८८ ते

| खर्च | रुपये पैसे | रुपये पैसे |
| --- | --- | --- |
| मालमत्तेसंबंधी | | ४,१६९–७० |
| भुईभाडे, म्युनिसिपल कर | १,७६०–०० | |
| विमा (ग्रंथालय) | — | |
| जनरल मेन्टेनन्स | २,४०९–७० | |
| व्यवस्थापन | | ५९,७९५–७२ |
| पगार व प्रा. फंड | २३,६०६–८७ | |
| छपाई, टायपिंग व स्टेशनरी | १५,७२२–६० | |
| टपाल व दूरध्वनी | ५,६९०–६५ | |
| कार्यकारी मंडळ (प्रवासादी खर्च) | ४,३१४–०० | |
| प्रवास व प्रचार कार्य | ५,४४८–६० | |
| वीज | ५,०१३–०० | |
| लीगल व प्रोफेशनल फीज् | | ३००–०० |
| हिशेब तपासनीस | | १,२००–०० |
| किरकोळ खर्च | | ६,३४६–४० |
| आतिथ्य | ४,७३७–०० | |
| विश्वस्त | — | |
| इतर (किरकोळ) | १,६०९–४० | |
| घसारा | | ६,२१८–८० |
| इमारत | १,४११–९६ | |
| फर्निचर व डेडस्टॉक | ९३२–४७ | |
| ग्रंथालय | ३,८७४–३७ | |

पुणे ४११०३०

नियम (१) प्रमाणे

दिनांक ३१-३-१९८९ या कालावधीचे उत्पन्न-खर्च पत्रक.

| उत्पन्न | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|
| व्याज (सेव्हिंग्ज् व कायम ठेवीवरील) | | ६१,७६८-९३ |
| देणग्या | | ५२,७७४-१० |
| संशोधन (अनुदान) | | १२,६००-०० |
| इतर उत्पन्ने | | ३७,६५४-१७ |
| परीक्षा शुल्क | १४,८५७-२५ | |
| इतर जमा | ७२६-०० | |
| साधारण सभासद वर्गणी | ९,९९७-०० | |
| पत्रिका वर्गणी व जाहिरात | ११,९०८-९२ | |
| संलग्नसंस्था वर्गणी | ६५-०० | |
| प्रकाशने | — | |
| वीज | — | |
| साहित्य व सांस्कृतिक कार्यक्रम | १००-०० | |

अनुक्रमणिका

| खर्च | रुपये | पैसे | रुपये | पैसे |
|---|---|---|---|---|
| संस्थेच्या उद्दिष्टांकरिता | | | १,३९,१४२–३५ | |
| साहित्य व सांस्कृतिक कार्यक्रम | ८,१०१–६० | | | |
| महामंडळ (प्रवास व वर्गणी) | ३,००३–९० | | | |
| शाखा–सभा वर्गणी हिस्सा | ७,१७१–७० | | | |
| पत्रिका (कागद, छपाई, टपाल इ.) | ८०,८५९–९५ | | | |
| ग्रंथालय (वेतन व इतर खर्च) | ७,४७७–८५ | | | |
| परीक्षा | ८,२२०–४५ | | | |
| वाङ्मयकोश खर्च | ३,१३८–०० | | | |
| इतर प्रकाशने | — | | | |
| पारितोषिके व स्मृतिदिन खर्च | २०,५१८–९० | | | |
| सा. सा. निधी | ६५०–०० | | | |
| | | | २,१७,१७२–९७ | |

ग. ना. जोगळेकर
राजा फडणीस
चिं. श्रां. जोशी
कार्यवाह

म. वि. गोखले
कोषाध्यक्ष

सर्जेराव घोरपडे
मधुकर परांजपे
म. श्री. दीक्षित
विश्वस्त

अनुक्रमणिका

| उत्पन्न | रुपये | पैसे | रुपये | पैसे |
|---|---|---|---|---|
| तूट | | | ५२,३७५-७७ | |
| | | | २,१७,१७२-९७ | |

पुणे, दिनांक १-९-८९

तपासले आहे. आमच्या आजच्या तारखेच्या अहवालानुसार
पाटणकर अँड असोसिएटस् अकौंटंटस्‌करिता

एन्. सी. मळगट
भागीदार

## महाराष्ट्र साहित्य परिषद,

### अर्थसंकल्प

| खाते जमा | संकल्प ८८–८९ | प्रत्यक्ष (१।७।८८ ते ३१।३।८९) | संकल्प ८९–९० |
|---|---|---|---|
| | रुपये | रु. पैसे | रुपये |
| व्याज व डिव्हिडंड | ६५,००० | ६१,७६८–९३ | ८०,००० |
| साहित्यिक साहाय्य निधी व्याज | १४,००० | — | २२,००० |
| देणग्या (योगक्षेमार्थ) | ५०,००० | ५२,७७४–१० | ५०,००० |
| शासकीय अनुदान | १०,००० | — | १०,००० |
| पुणे महापालिका अनुदान | ५,००० | — | ५,००० |
| सा. सं. मंडळ अनुदान पत्रिका | १०,००० | — | १२,००० |
| ग्रंथालय अनुदान | २,५०० | — | २,५०० |
| पत्रिका (वर्गणी, जाहिरात इ.) | १०,००० | ११,९०८–९२ | ८,००० |
| वार्षिक सा- सभासद वर्गणी | ८,००० | ९,९९७–०० | ८,००० |
| परीक्षा शुल्क | १५,००० | १४,८५७–२५ | १०,००० |
| संलग्न संस्था वर्गणी | १०० | ६५–०० | ,१०० |
| किरकोळ (रद्दी इ.) | १,००० | ७२६–०० | १,००० |
| संशोधन अनुदान | — | १२,६००–०० | — |
| प्रकाशन | २,००० | — | ,५०० |
| विभागीय सा. संमेलन | २,००० | — | १,००० |
| ग्रंथ पारि. व स्मृतिदिन | ६,००० | १००–०० | ६,००० |
| तूट | ३८,००० | — | ३९,४०० |
| | २,३९,००० | | २,५५,५०० |

राजेंद्र बनहट्टी
कार्याध्यक्ष

म. वि. गोखले
कोषाध्यक्ष

पुणे ४११०३०

१९८९-९०

| खाते खर्च | संकल्प ८८-८९ | प्रत्यक्ष (१।७।८८ ते ३१।३।९०) | संकल्प ८९-९० |
|---|---|---|---|
| | रुपये | रु. पैसे | रुपये |
| म. न. पा. कर व भुईभाडे | १,००० | १७६०--०० | १,००० |
| इमारत (देखभाल व विमा) | ३,००० | २४०९--७० | ३,००० |
| फर्निचर व नवीन सामान | २,००० | — | ४,००० |
| पगार व प्रॉ. फंड | २५,००० | २३,६०६--८७ | २७,००० |
| छपाई व टंकलेखन, स्टेशनरी | ६,००० | १५,७२२--६० | ६,००० |
| टपाल व दूरध्वनी | १०,००० | ५,६९०--६५ | १२,००० |
| वीज | ५,००० | ५,०१३--०० | ७,५०० |
| कार्यकारी मंडळ (प्रवास) | ५,००० | ४,३१४--०० | ५,००० |
| प्रवास व प्रचारकार्य | ३,००० | ५,४४८--६० | ३,००० |
| साहि. सांस्कृत कार्यक्रम | १०,००० | ८,१०१--६० | १२,००० |
| पत्रिका-कागद, छपाई टपाल इ. | ७०,००० | ८०,८५९--९५ | ७०,००० |
| ग्रंथालय (खरेदी, वेतन इ.) | १५,००० | ७,४७७-८५ | १५,००० |
| परीक्षा | १३,००० | ८,२२०--४५ | १०,००० |
| शाखासभा (वर्गणी हिस्सा) | ८,००० | ७,१७१--७० | ६,००० |
| महामंडळ (सभा व वर्गणी) | ३,००० | ३,००३--९० | ५,००० |
| आतिथ्य | ३,००० | ४,७३७--०० | ३,००० |
| संशोधन | १,००० | — | १,००० |
| ग्रंथपरि. स्मृतिदिन इ. | ३०,००० | २०,५१८--९० | ३२,००० |
| हिशोबतपासनीस | १,००० | १,२००--०० | १,००० |
| किरकोळ | १,००० | ६,३४६--४० | १,००० |
| प्रकाशने | १,००० | — | १,००० |
| विभागीय सा. संमेलन | १,००० | ---- | १,००० |
| घसारा | ६,००० | ६,२१८--८० | ६,००० |
| विश्वस्त व्यवहार | १,००० | ---- | १,००० |
| निवडणूक | १,००० | ---- | |
| साहित्यिक साहाय्य निधी | १४,००० | ---- | २२,००० |
| | २,३९,००० | | २,५५,५०० |

| | | |
|---|---|---|
| गं. ना. जोगळेकर | राजा फडणीस | चि. शं. जोशी |
| कार्यवाह | कार्यवाह | कार्यवाह |

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे

नवे प्रकाशन

# भाषा व साहित्य : संशोधन

( खंड ३ रा )

संपादक

डॉ. वसंत स. जोशी

प्रा. म. ना. आदवंत

पृष्ठे सुमारे ३५०

( अनेक नामवंत संशोधक, लेखक यांचे, प्रबंधांची अद्ययावत् यादी, विस्तृत सूचीसह )

मूल्य ८० रुपये

संपर्क : कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद
टिळकरस्ता, पुणे ३०

(फोन : ४४२९६३)

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका